


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








४३५६

म. सा. प.

संपादक — भालचंद्र फडके

अंक १९२ जाने. -फेब्रु. -मार्च १९७५

अंक १९०-१९१ जुलै ते डिसें. १९७४

(पु. ल. देशपांडे विशेषांक)

अंक १८९ एप्रिल-मे-जून १९७४

(विष्णु कृष्ण चिपळूणकर विशेषांक)

# महाराष्ट्र - साहित्य - पत्रिका

## १९७२ : वाङ्मय समालोचन विशेषांक



मूल्य पाच रुपये

अंक : १९२
जाने. ७५ ते मार्च ७५
पौष–माघ–फाल्गुन
१८९७

प्रसिद्धी दिनांक
मे १९७५

संपादक
डॉ. भालचन्द्र फडके



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र : महाराष्ट्र-राज्य साहित्य संस्कृति मंडळ पुरस्कृत : मुद्रक व प्रकाशक : श्री. रा. ज. देशमुख, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य-परिषद, पुणे ३०, मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

वाङ्मय समालोचन १९७२ विशेषांक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक

डॉ. भालचंद्र फडके

अंक १९२

जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९७५

अनुक्रमणिका

# संपादकीय

## साहित्य अकादमीचा एक निषेधार्ह निर्णय :

कोकणी ही मराठीची बोली असल्यामुळे तिला स्वतंत्र भाषा म्हणून साहित्य अकादमीने मान्यता देऊ नये हा ठराव इचलकरंजी येथील साहित्य संमेलनात गोव्याचे श्री. जनार्दन शिंके यांनी मांडला व त्याला गोव्याचे ॲड. जयवंतराव सरदेसाई यांनी अनुमोदन दिले. त्या वेळी संमेलनाध्यक्ष श्री. पु. ल. म्हणाले, "भाषा म्हणून मान्यता देण्यासाठी साहित्य अकादमीने ज्या काही कसोट्या ठरविलेल्या आहेत त्यांना कोकणी उतरत नाही." मराठी साहित्यिकांचा कोकणीच्या विकासाला मुळीच विरोध नाही, पण ती मराठीची बोली आहे हा भाषाशास्त्रज्ञांनी मांडलेला सिद्धान्त ते स्वीकारतात. हीच भूमिका १९ मे १९७४ रोजी भरलेल्या गोमंतक मराठी भाषा परिषदेने पुरस्कारिलेली आहे हे उद्घाटक मुख्य मंत्री सौ. काकोडकर, स्वागताध्यक्ष जयवंतराव सरदेसाई आणि अध्यक्ष पंडित महादेवशास्त्री जोशी यांच्या भाषणांतून प्रत्ययास येते.

पण फेब्रुवारी १९७५ मध्ये भरलेल्या साहित्य अकादमीच्या दिल्ली येथील बैटकीत कोकणीला मराठीच्या बरोबरीने 'भाषा' म्हणून दर्जा देण्यास मान्यता देण्यात आली. या अन्यायकारक निर्णयाचा मराठी भाषिकांनी आणि कोकणीवर प्रेम करणाऱ्या लोकांनी कसून निषेध केला पाहिजे. एक प्रगल्भ भाषा म्हणून मान्यता देताना त्या भाषेची साहित्यपरंपरा विचारात घ्यावी लागते. शाळा–कॉलेजांतून विविध विषय शिकविण्यासाठी त्या भाषेत भरपूर ग्रंथसंपदा आहे की नाही हे पाहावे लागते. भाषाशास्त्रीय निकषांच्या आधारे भाषा की बोली हे ठरवावे लागते. पण उपसमितीच्या अभिप्रायाच्या आधारे डॉ. सुनीतिकुमार चटर्जी यांच्या अध्यक्षतेखाली कोकणीला स्वतंत्र भाषा म्हणून दर्जा देण्याचा निर्णय घेतलेला दिसतो. एका फ्रेंच भाषाशास्त्रज्ञाने म्हटल्याप्रमाणे भाषाशास्त्र राजकारणी लोकांची दासी होऊ शकत नाही. पण अकादमीचा निर्णय पाहिला की अनुभव उलटा आहे असे वाटते.

अनुक्रमणिका

डॉ. सुनीतिकुमार चटर्जी, डॉ. कत्रे इ. मान्यवरांनी दुर्दैवाने 'कोकणी' विषयी वस्तुनिष्ठ विचार मांडण्याचे आता सोडून दिलेले असावे. कारण 'भारत की भाषाएँ और भाषा संबंधी समस्याएँ' या आपल्या ग्रंथात ते म्हणतात,

> मराठी दक्षिण की प्रमुख आर्य भाषा है। इसका उच्च श्रेणीका
> साहित्य है। अंशतः इसे मराठी की उपभाषा कहा जा सकता है।
> गोवा के देशी रोमन काथलिक ईसाइयों में रोमन अक्षरों में
> साहित्य तैयार हो गया है। लेकिन कोकणी को मराठी की प्रतिस्पर्धी
> साहित्यिक भाषा के रूपमें खडी करनेकी चेष्टा उतनी सफल
> नहीं हुई है। इसका प्रधान कारण है बोलचाल कीं कोकणीमें
> पाच—छे रूपभेद पाये जाते हैं।

कोकणीला मराठीची उपभाषा मानणारे आणि तिला मराठीची प्रतिस्पर्धी साहित्यिक भाषा बनविण्याचे संबंधितांचे प्रयत्न सफल झालेले नाहीत असा निर्वाळा देणारे हे ज्येष्ठ भाषा शास्त्रज्ञ कसे आणि का बदलले ते ध्यानात येत नाही. मात्र फेब्रुवारी १९७४ मध्ये पणजीच्या अखिल भारतीय कोकणी साहित्यपरिषदेचे उद्घाटन करताना डॉ. कत्रे यांचा अधिकार मानून डॉ. चतर्जी म्हणाले, " Konkani is emphatically not a dialect of Marathi as many Maharashtrians ( as well as some Konkani speakers themselves ) declare or as think it to be " डॉ. चटर्जी यांनी त्यांचा अधिकार मानला त्या डॉ. कत्रे यांचा कोकणी संबंधीचा निष्कर्ष हिंदूंच्या तीन आणि ख्रिश्चनांच्या तीन अशा केवळ सहा बोलींच्या आधारे काढलेला आहे हे लक्षात घेतले पाहिजे. कोकणीतील सर्वच बोलींचे स्वरूप एकसारखे नसून स्थल आणि स्तर ( म्हणजे जात, धंदा ) यांना अनुसरून त्यामध्ये ठिकठिकाणी परिवर्तने झालेली आढळतात आणि संरचनात्मक भाषाशास्त्राच्या दृष्टीने प्रमुख कोकणीबोलीचा अभ्यास व्हावयाचा आहे असे डॉ. वि. वा. प्रभुदेसाई यांचे स्पष्ट मत आहे. डॉ. अ. का. प्रियोळकरांनी मराठीची बोली कोकणी असल्याचा निर्वाळा अनेक वेळा दिलेला आहे. प्रोव्हेंसाल ही जशी फ्रेंच भाषेची एक बोली आणि स्कॉटिश ही जशी इंग्रजी भाषेची एक बोली तशीच कोकणी ही मराठी भाषेची एक बोली होय. म्हणजे कोकणी ही भाषा आहे बोली नव्हे असे प्रतिपादन करणारी अकादमी दुर्दैवाने राजकारण्यांच्या विळख्यात तर सापडली नाही ना अशी शंका येते. अतएव साहित्य अकादमीचा कोकणी विषयक निर्णय निषेधार्ह आहे.

## प्रकांडपंडित तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांचे अभीष्टचिंतन

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे एक विश्वस्त आणि साहित्य व संस्कृतिमंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना त्यांच्या पंचाहत्तराव्या वाढदिवसानिमित्त आम्ही शुभेच्छा व्यक्त करतो आणि त्यांना दीर्घायुरारोग्य चिंततो! त्यांच्यासारखी प्रखर विद्वत्ता आता

दुर्मिळ होत चालली आहे. या विद्वत्तेबरोबरच त्यांच्या ठायी स्नेहभावाचा ओलावा आहे. विद्वत्ता सूर्यासारखी प्रखर असणेच इष्ट. ती चंद्रासारखी परप्रकाशित कधीच नसते हे लक्षात घ्यायला हवे. मानवी संस्कृतीच्या विकासात भारतीय संस्कृती हा एक अविभाज्य भाग आहे असा सिद्धान्त तर्कतीर्थांनी 'वैदिक संस्कृतीचा विकास' या ग्रंथातून मांडला. शास्त्रीजींनी जे लिहिले ते विचारांना चालना देते. धर्म, तत्त्वज्ञान, साहित्य, राजकारण, समाजकारण, इतिहास इ. विविध क्षेत्रांत शास्त्रीजींनी आपले असे एक निराळे स्थान निर्माण केले आहे. 'सोमनाथ'च्या प्राणप्रतिष्ठेचे पौरोहित्य त्यांनी कुशलतेने केले. मानवतावादी तत्त्वज्ञानाचा त्यांनी सतत पाठपुरावा केला. ज्ञानप्रसाराचे व्रत घेतलेले एक श्रेष्ठ ज्ञानोपासक असे त्यांचे वर्णन करता येईल. ज्ञानसाधन ही विशिष्ट वर्गाची मिरासदारी नव्हे तर ज्ञानाचे लोण समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत पोचविले पाहिजे अशी त्यांची भूमिका आहे. ज्ञानचक्षू हाच खरा चक्षू असे म्हणणारे शास्त्रीजी ज्ञानाची प्रक्रिया 'प्यूअर रीझन' पासून सुरू होते असे सांगतात. मानवेन्द्रनाथ रॉय यांनी शास्त्रीजींचा 'बेस्ट प्रॉडक्ट ऑफ इंडियन रेनेसान्स' असा गौरव केला आणि महात्मा गांधीजींनी त्यांचा 'ए मॅन ऑफ लर्निंग ॲन्ड स्पॉटलेस कॅरेक्टर' असा जो गौरव केला तो किती यथार्थ आहे!

## श्री. विट्ठलराव घाटे यांचे अभीष्टचिंतन

रविकिरण मंडळाचे ज्येष्ठ सदस्य आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे विश्वस्त श्री. वि. द. घाटे यांच्या वयाला नुकतीच ऐंशी वर्षे पूर्ण झाली त्यावद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन! घाट्यांचे ललित लेखन जसे प्रसन्न, टवटवीत तशी त्यांची वृत्ती प्रसन्न आणि ताजीतवानी! एखादी सभा असो की कविसंमेलन असो दादा आपल्या रसिक वृत्तीने तेथील वातावरण भारून टाकतात. जीवनावर अपार प्रेम करणारे, तेथील रस-रूप-गंधात आणि स्पर्शात रंगलेले दादा सर्वांनाच हवेहवेसे वाटतात. जीवनाच्या रागरंगात ते तृप्त आहेत.

## श्री. भाऊसाहेब माडखोलकरांचे अभीष्टचिंतन

२८ डिसेंबर १९७४ रोजी गजानन त्र्यंबक ऊर्फ भाऊसाहेब माडखोलकरांच्या वयाला पंचाहत्तर वर्षे पूर्ण झाली म्हणून त्यांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. फडके-खांडेकरांच्याप्रमाणेच ते मराठीतील एक लोकप्रिय कादंबरीकार आहेत. माडखोलकरांचे टीकालेखन मार्मिक आणि चिकित्सक असते. त्यांच्या भाषेचे सौंदर्य काही निराळेच असते. माडखोलकरांनी आपल्या संस्कृत वळणाच्या भाषेने आपले लेखन सजविले. त्यांच्या एखाद्या विधानामुळे वाङ्मयक्षेत्रात वादळ उठते. त्यांना 'वादळ' हवे असते. अशा प्रसंगी त्यांच्या लेखनाला धार येते. बेळगावच्या साहित्यसंमेलनात संयुक्त महाराष्ट्राची मागणी त्यांनी संमेलनाच्या व्यासपीठावरून प्रथम केली. आपल्याला जे वाटते, जे बुद्धीला पटलेले असते ते निर्भयपणे मांडावयाचे हा त्यांचा बाणा! त्यांना आम्ही दीर्घायुरारोग्य चिंतितो!

अनुक्रमणिका

## कुलगुरु श्री. शंकरराव खरात यांचे अभिनन्दन

महाराष्ट्र-साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य व ललितलेखक श्री. शंकरराव खरात यांची मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरु म्हणून नियुक्ती झाली यावद्दल त्यांचे आम्ही अभिनन्दन करतो. परिस्थितीशी झुंज घेत घेत शंकरराव पुढे जातात आणि हाती घेतलेल्या कार्यात यश मिळवितात असा त्यांचा लौकिक आहे. त्यांच्यासारखी निगर्वी, निःस्पृह, उद्योगशील, प्रामाणिक व्यक्ती विद्यापीठाचे नेतृत्व करीत आहे हा केवढा सुयोग आहे. जे अनुभविले, जे भोगले त्याला गोचर करणारे एक जातिवंत लेखक म्हणून श्री. शंकररावांची प्रसिद्धी आहे. तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा वैचारिक वारसा घेऊन जगणारे कार्यकर्ते अशी त्यांची ख्याती आहे. शिक्षणक्षेत्रात नव्या दृष्टिकोणातून कार्य करण्याची जी संधी त्यांना मिळाली आहे तिचा उपयोग करून श्री. शंकरराव विद्यापीठाच्या ध्येय-धोरणावर, कार्यपद्धतीवर आपला प्रभाव गाजवतील असा आम्हांस विश्वास वाटतो. त्यांना आम्हा सर्वांच्या शुभेच्छा !

## श्री. व्यंकटेश माडगूळकर यांचे अभिनन्दन

कार्यकारिणीचे सदस्य आणि 'पत्रिके'च्या 'संपादक मंडळा'तील सदस्य, सिद्धहस्त कथालेखक व्यंकटेश माडगूळकर यांना चौदाव्या गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन गौरविले आहे यावद्दल त्यांचे आम्ही मनःपूर्वक अभिनन्दन करतो. व्यंकटेश माडगूळकरांचा पिंड अस्सल कथालेखकाचा. मन भारून टाकणारी कथा लिहून जशी त्यांनी कीर्ती मिळविली तशी लोकनाट्य, नाटक, पटकथा इ. वाङ्मयक्षेत्रात देखील त्यांनी लक्षणीय कामगिरी बजावली आहे. त्यांच्या वाङ्मयसेवेचा गौरव म्हणून हे अध्यक्षपद त्यांना मिळाले आहे.

## श्री. द. वा. डावरे यांचे अभिनन्दन

परिषदेचे कार्यवाह नगरचे श्री. डावरे यांना शासनाने ऑनररी मॅजिस्ट्रेट म्हणून गौरविले. आहे. त्यांचे मनःपूर्वक अभिनन्दन !

## संपादक शं. वा. कि. यांचा अस्त

मराठी नियतकालिकांच्या इतिहासात एक कालखंड गाजविणारे श्रेष्ठ संपादक म्हणजे शं. वा. किर्लोस्कर ! मराठी वाङ्मयात विविध वाङ्मयप्रकारांना पुष्ट करण्याचे, त्यांना नवी दिशा देण्याचे कार्य मराठी नियतकालिकांनीच केले आहे. करमणूक म्हणजे हरिभाऊ, मनोरंजन म्हणजे का. र. मित्र तसे किर्लोस्कर म्हणजे शं. वा. कि. ! १९१६ पासून १९५८ पर्यंत शंकररावांनी किर्लोस्कर मासिकाचे संवर्धन केले. १९१६ त 'किर्लोस्कर खबर' चा जन्म झाला आणि साहित्य, कला, धर्म, सामाजिक सुधारणा, प्रचलित प्रश्न यांचा मोकळेपणाने परामर्श घेणारे निर्भय नियतकालिक म्हणून १९२९ पासून 'किर्लोस्कर'ची वाट-

चाल सुरू झाली. त्या पाठोपाठ १९३० मध्ये ' स्त्री'चा जन्म झाला ! उच्च प्रकारच्या कलात्मक साहित्याला वाहिलेले ' मनोहर ' मासिक नंतर अवतरले.

या तिन्ही मासिकांवर शं. वा. कि. यांचा प्रभाव होता. महाराष्ट्रात नवमतवादाची ध्वजा उभी केली ती या मासिकांनीच ! नवा आचार, नवा विचार रूढ केला तो या मासिकांनी ! मराठी माणसाला नव्या विज्ञाननिष्ठ दृष्टीची महती पटविली ती या मासिकांनीच. या मासिकांनी आपला असा खास वाचकवर्ग आणि लेखकवर्ग निर्माण केला. शब्दांना चित्राची जोड दिली तर ते अधिक प्रभावी होतात म्हणून कथांना लेखांना चित्रांची साथ देण्याची प्रथा पुनरुज्जीवित करण्याचे आणि आलेल्या मजकुराची ' वाचनीयता ' वाढविण्याचे श्रेय शं. वा. कि. यांचेच ! बुवाबाजी, ढोंग, दंभ यांवर हल्ला चढविला तो त्यांनीच !

## सत्याग्रही शंकरराव देव यांना अभिवादन !

राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या कार्यात आपले शक्तिसर्वस्व वेचणारे सत्याग्रही म्हणजे शंकरराव देव ! प्राचीन ऋषींच्या जीवनापासून वैचारिक प्रेरणा घेऊन आणि ज्ञानदेव, रामकृष्ण, विवेकानंद, अरविन्द यांच्या विचारांचा मागोवा घेत देवांनी आपली जीवितयात्रा सफल केली. देशसेवेचे व्रत घेण्याची शपथ त्यांनी शाळेतच घेतली होती. तसे त्यांचे बालपण व शालेय जीवन दारिद्र्यात आणि कष्टात गेले. पण त्यांच्या जीविताला निश्चित प्रयोजन होते. ते म्हणतात, " मला सार्वजनिक जीवनाची प्रेरणा लो. टिळकांपासून मिळाली व त्याची पद्धती म. गांधींपासून प्राप्त झाली. "

गांधीयुगात त्यांनी अनेक वेळा तुरुंगवास भोगला, छळ सोसला, उपोषणे केली. तसा त्यांचा पिंड अध्यात्मप्रवण ! प्रस्थानत्रयीचे अध्ययन केले. हे ' विचारबळ ' घेऊन त्यांनी विधायक कार्याला वाहून घेतले. टिळकयुगाचा अस्त झाल्यावर केळकरांकडे टिळकानुयायांचे पुढारीपण आले. गांधीवादी शंकररावांनी महाराष्ट्रात बहुजनसमाजला स्वातंत्र्यलढ्यात आणले. ' जेधे—गाडगीळ ' एकत्र दिसले त्याचे श्रेय शंकरराव देवांच्या प्रयत्नाला आहे. सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, सुलभ मुद्रणालय, नवभारत मासिक सासवड आश्रम या संस्था त्यांनी निर्माण केल्या आणि वाढविल्या. याशिवाय गिरणी कामगार संघटना, राष्ट्रभाषाप्रचार, खादी ग्रामोद्योग, हरिजनोद्धार, स्त्रीसंघटना, विद्यार्थी संघटना इ. किती तरी विधायक कार्यांत त्यानी आपली शक्ती वेचली. संयुक्त महाराष्ट्र निर्मितीसाठी झालेल्या चळवळीत ते अग्रभागी होते. राजकीय नेतृत्व कुशलतेने करणाऱ्या शंकररावांनी नेहमीच आपल्या समाजाला हलवावे, अस्वस्थ करावे ही इच्छा सतत मनी बाळगली. त्यांची ध्येयासक्ती जबर होती. गांधीजींच्या तत्त्वज्ञानावर त्यांची अढळ श्रद्धा होती. ते निष्काम कर्मयोगी होते. यशापयशाची क्षिती न बाळगता विधायक कार्याला वाहून घेणारे ते व्रतस्थ सत्याग्रही होते.

## कै. तात्या ऊर्फ पां. रा. ढमढेरे : श्रद्धांजली

पुण्यातील दुर्मिळ पुस्तकांचे संग्राहक आणि विक्रेते श्री. तात्या ढमढेरे २८ डिसेंबर

१९७४ रोजी कालवश झाले. ताल्या एम्. ए. होते. पण अध्यापनापेक्षा त्यांनी दुर्मिळ पुस्तके पायपीट करून वेचावीत व ती ' सुस्थळी ' विकावी हा व्यवसाय आनंदाने स्वीकारला. परिषदेच्या ग्रंथालयात त्यांनी दिलेली कितीतरी पुस्तके आहेत. ते संशोधकांचे स्नेही होते. दुर्मिळ पुस्तके मिळवून देऊन त्यांनी कितीतरी मित्र जोडले होते. त्यांच्याबरोबर गप्पा मारताना जणू आपण भूतकालाच्या गुहेत प्रवेश करीत आहोत असे वाटत असे.

## कै. ' इंटरनॅशनल ' विठ्ठलराव दीक्षित : श्रद्धांजली

२ मार्च १९७५ रोजी ' इंटरनॅशनल ' बुक डेपोचे चालक, मराठी वाङ्मयाचे भक्त रंगभूमी, संगीत आणि क्रिकेट या क्षेत्रातील एक रसिक श्री. विठ्ठलराव दीक्षित निधन पावले. पुस्तकविक्रीच्या व्यवसायाकडे त्यांनी सांस्कृतिक कार्य म्हणून पाहिले. पुण्यातील इंग्रजी पुस्तकांचे पहिले दुकान त्यांनी थाटले आणि साहित्यिकांची पाश्चात्य वाङ्मयसृष्टीत विहार करण्याची सोय झाली. पं. नेहरू, डॉ. राधाकृष्णन, डॉ. राजेंद्रप्रसाद इत्यादींनी त्यांच्या बुकडेपोला भेट दिली होती. विविध क्षेत्रातील व्यक्तींचे गणगोत त्यांनी मिळविले होते. जगातील अनेक भाषांतील दुर्मिळ व मौल्यवान ग्रंथ उपलब्ध करून देण्यात त्यांना रस वाटे. आपल्या वाचनात आलेल्या लेखनाचे ते मुक्तकंठाने कौतुक करीत. आलेल्या व्यक्तीचे हसतमुखाने स्वागत करून त्याला मदत करण्यासाठी ते नेहमी उभे ! जे. कृष्णमूर्ती, अरविंदबाबू यांच्या तत्त्वविचाराची त्यांना ओढ होती. त्यांना संगीताच्या मैफलीत आनंद लुटावा असे वाटे. प्रसन्न वृत्तीची, उमदी ' इंटरनॅशनल ' व्यक्ती म्हणजे दीक्षित.

## कै. डॉ. हरि रामचंद्र दिवेकर : श्रद्धांजली

१८ मार्च १९७५ रोजी डॉ. ह. रा. दिवेकर निधन पावले. संस्कृत वाङ्मयाचा निष्ठावंत पंडित असा त्यांचा लौकिक होता. वाराणसी येथे शिक्षण पूर्ण केल्यानंतर त्यांनी पॅरिस येथील विद्यापीठात ' डॉक्टरेट ' मिळविली. अलीकडे अथर्ववेदावरील एका मिळालेल्या ग्रंथासंबंधी संशोधन करीत होते. ९० वर्षे उलटली तरी त्यांचा व्यासंग, त्यांचे लेखन चालू होते. १९१६ ते १९३० पर्यंत स्त्री-शिक्षण संस्थेत ( हिंगणे ) त्यांनी काम केले होते. त्यांच्यामागे त्यांची स्त्रीशिक्षणकार्याविषयीची आस्था होती. आचार्य विनोबा भावे यांच्या पवनार आश्रमात, उज्जैन, वाराणसी, ग्वाल्हेर, पुणे इ. ठिकाणी त्यांनी संस्कृतचे अध्यापन केले. विद्या बाळ यांच्या ' कमलाकी ' ग्रंथाला लिहिलेली प्रस्तावना किंवा तांबे यांच्या कवितेविषयी पत्रिकेत केलेले लेखन त्यांच्या स्वतंत्र दृष्टीची साक्ष देते.

## कै. वा. ना देशपांडे : श्रद्धांजली

मराठीतील ज्येष्ठ टीकाकार, संशोधक, विदर्भ साहित्य संघाच्या ' युगवाणी ' मासिकाचे आद्य संपादक श्री. वामन नारायण देशपांडे दि. २७ फेब्रुवारी १९७५ रोजी निधन पावले. आराधना, कोरक, अनामिका, उत्तरायण, विसर्जन, पिकासोचे कबुतर या आपल्या काव्य-

अनुक्रमणिका

संग्रहांनी आणि टीकालेखांनी त्यांनी सर्वांचे लक्ष वेधून घेतले होते. ' प्रतिभा ' पाक्षिकातील ' रामशास्त्री ' नवयुग साप्ताहिकात ' द्रोणाचार्य ' अशी नावे घेऊन त्यांनी टीकालेखन केले.

## कै. प्रा. कृ. त्र्यं. पेशकार : श्रद्धांजली

- २५ डिसेंबर १९७४ रोजी इचलकरंजी येथे साहित्य संमेलनास उपस्थित राहण्यासाठी निघालेले प्रा. पेशकार वाटेतच कालवश झाले. मराठी भाषा व मराठी वाङ्मयाचा चिकित्सक वृत्तीने अभ्यास करणारे पेशकार हे उत्तम अध्यापक होते.

## प्रा. श्री. ना. बनहट्टी : श्रद्धांजली

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी अध्यक्ष प्रा. श्री. ना. बनहट्टी ता. २१ एप्रिल '७५ रोजी कालवश झाले. त्यांच्या निधनामुळे महाराष्ट्र एका विद्वान संशोधकाला मुकला आहे. अलीकडे ते ज्ञानेश्वरीची पाठशुद्ध संशोधित आवृत्ती सिद्ध करण्याच्या कार्यात मग्न होते. त्यापैकी ज्ञानेश्वरीचे एक, सात व बारा असे तीन अध्याय प्रसिद्ध केले. सर्व भारतातून पोथ्या जमवून ज्ञानेश्वरीचे संशोधन करण्यासाठी ' ज्ञानोपासना निकेतन ' ही संस्था त्यांनी सुरू केली होती. अविरत उद्योगात, अखंड ज्ञानसाधनात गढून गेलेली माणसे आता दुर्मिळ होत चालली आहेत. जुने मराठी काव्य, नाटक आणि रंगभूमी हे त्यांचे व्यासंगाचे विषय होते. ' नाट्याचार्य देवल ' या ग्रंथाला १९७० साली साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले होते. गतवर्षी विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधमालेच्या जन्मशताब्दीनिमित्त अतिशय परिश्रमपूर्वक ' विष्णुपदी ' हा निबंधसंग्रह त्यांनी तीन खंडात प्रसिद्ध केला. मराठी भाषा आणि मराठी वाङ्मय यांची व्रतस्थपणे सेवा बजावणारे ते श्रेष्ठ सरस्वतीपुत्र होते.

## ज्ञानकोशाच्या प्रस्तावना खंडाचे पुनर्मुद्रण

ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतिमंडळ, मुम्बई या संस्थेने महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या प्रस्तावना खंडाचे (पहिले पाच भाग) पुनर्मुद्रण करण्याचा संकल्प सोडला याचे मराठी भाषिकांनी स्वागत केले पाहिजे. १९६६ साली हैदराबाद येथे भरलेल्या साहित्य संमेलनाने एका ठरावाद्वारे पुनर्मुद्रणाची आवश्यकता प्रतिपादिली. या कल्पनेचा पाठपुरावा करून तिला मूर्त स्वरूप आणण्यासाठी वयोवृद्ध कार्यकर्ते श्री. रा. वा. केतकर यांनी जिद्दीने व चिकाटीने जे परिश्रम केले, त्याला तोड नाही. हे दुर्मिळ खंड उपलब्ध झाले तर अभ्यासकांची व जिज्ञासूंची सोय होईल. विद्येच्या व संस्कृतीच्या अभ्यासाची महत्त्वपूर्ण विकासावस्था दर्शविणारे हे ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशित करण्यासाठी मराठी भाषाप्रेमी जनतेने आपली धनशक्ती सिद्ध करावयास हवी.

## मराठी नियतकालिकांची सूची द्वितीय खंड भा. १

श्री. शं. ग. दाते सूचिमंडळातर्फे मराठी नियतकालिकांची सूची करण्याचे कार्य सुरू

झाले. या कार्याचा भाग म्हणून नियतकालिकांचा जीवनेतिहास सांगणारा पहिला खंड प्रसिद्ध झाला. दुसऱ्या खंडातील पाच विभागांतून विविध विषयांवरील लेखांची संदर्भसूची अभ्यासकांना उपलब्ध होणार आहे. सूची–रचनाकार्य अतिशय कष्टाचे. पण द्वितीय खंडाचा पहिला भाग वाचला की ते किती मोलाचे झाले आहे ते लक्षात येते. प्रत्यक्ष सूचिविभाग सुरू होण्यापूर्वी संपादकांनी ' साहाय्यक साहित्य विभाग ' यात जे विवरण केले आहे ते सूचिरचनेमागील भूमिका स्पष्ट करते.

## स्वागत

कागद टंचाई, अफाट मुद्रण खर्च इ. समस्यांना तोंड देत वाङ्मयीन नियतकालिके कसावसा आपला प्रवास करीत आहेत. या प्रवासात दोन नवे मित्र आले आहेत त्यांचे आम्ही स्वागत करतो. रायटर्ससेंटर, मुंबई आणि अमेय प्रकाशन, नागपूर यांच्या सहकार्यामुळे ' संदर्भ ' ह्या नव्या वाङ्मयीन नियतकालिकाचा जन्म झाला. प्रा. माणिक गोडघाटे यांनी संपादनाची जबाबदारी स्वीकारलेली आहे. ' लोकवाङ्मय ' या द्वैमासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाला हीही स्वागतार्ह घटना ! उमाकांत मोकाशी यांचे संपादन लाभलेले हे नियतकालिक प्रागतिक विचार आणि संस्कृतीला वाहिलेले आहे. या दोन्ही नियतकालिकांनी वाङ्मयीन कार्य करावे अशीच अपेक्षा आहे. या दोन्ही मित्रांना आमच्या शुभेच्छा !

## वाचकहो !

या वर्षात ' पत्रिके 'ला मनात असूनही तीनच अंक प्रसिद्ध करता आले. कागदाची टंचाई, अफाट मुद्रणखर्च इत्यादी आपत्तींना तोंड देत अंक सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. अंक वेळेवर प्रसिद्ध करण्यात याच अडचणी प्राधान्याने आल्या. केवळ पाच रुपयांच्या वार्षिक वर्गणीत अंक प्रसिद्ध करणे अशक्य होऊन बसले आहे. महाराष्ट्र-राज्य साहित्य संस्कृति मंडळाकडून येणारे अनुदान, सभासद वर्गणीतून लाभणारा अल्पहिस्सा, काही जाहिराती इ. मधून खर्चाची तोंडमिळवणी करता येत नाही. नुकसान सोसूनच परिषदेचे मुखपत्र चालवावे लागते हे वाचकांनी ध्यानात घ्यावे आणि चार ऐवजी तीन अंक निघाले आणि तेही वेळेवर निघू शकले नाहीत म्हणून आम्हांस क्षमा करावी. वाचकांचे सहकार्यच पत्रिकेला तारून नेईल. असा विश्वास वाटतो.

पुढील वर्षात ज्ञानेश्वर महाराजांच्या जन्माला सातशे वर्षे पुरी होतात तो योग साधून ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयासंबंधी आणि कार्यासंबंधी अभ्यासकांचे आणि अधिकारी व्यक्तींचे लेख समाविष्ट असलेला खास अंक प्रसिद्ध करण्याचा संकल्प आहे. वाचकांनी या वर्षातील अंकांचे मनःपूर्वक स्वागत केले त्याबद्दल आभार.

— भालचन्द्र दिनकर फडके

अनुक्रमणिका

# ' शंवाकीं 'ना श्रद्धांजली

**प्रभाकर ऊर्ध्वरेषे**



शंवाकि—आणि किस्त्रीम !

शंवाकि म्हणजे शंकरराव किर्लोस्कर ऊर्फ शंकरभाऊ, किंवा शंकरअण्णा. ' किस्त्रीम ' म्हणजे शंवाकींनी स्थापन केलेली तीन मासिके–किर्लोस्कर, स्त्री आणि मनोहर. या मासिकांच्या संपादनाची जबाबदारी शंकरभाऊंनी आपले चिरंजीव मुकुंदराव यांच्याकडे सोपविल्याला जवळजवळ तीस वर्षे लोटली. त्यानंतर ते किर्लोस्करवाडीला कारखान्याचे जनरल मॅनेजर म्हणून काम करून पूर्णपणे निवृत्त झाल्यालाही सतरा वर्षे झाली. या कालावधीत घटप्रभा येथे कर्नाटक हेल्थ इन्स्टिट्यूटच्या आवारात त्यांचे वास्तव्य होते. मासिकांचे संपादन, किर्लोस्कर उद्योगसमूह किंवा इतर कोणतीही सार्वजनिक संस्था यांच्याशी त्यांचा प्रत्यक्ष संबंध राहिला नाही. सभा–संमेलने, भाषणे, व्याख्याने यांचीही निमंत्रणे त्यांनी घेतली नाहीत. अशा रीतीने ते एक प्रकारे महाराष्ट्राच्या दृष्टिआडच होते. त्यांच्या मृत्यूच्या फक्त २५ दिवस पूर्वी ' शंवाकीय ' या त्यांच्या आत्मचरित्राचे पुण्यात प्रकाशन झाले. त्यानिमित्त महाराष्ट्राला पुनः त्यांची आठवण झाली. पण या समारंभाला सुद्धा ते स्वतः आले नाहीत.

पण अशा प्रकारे पूर्णपणे पडद्याआड गेलेले शंवाकि या वर्षाच्या पहिल्याच दिवशी, १ जानेवारी १९७५ रोजी घटप्रभा येथे अचानक मृत्यू पावल्याची वार्ता प्रसिद्ध होताच मात्र वैयक्तिक व सार्वजनिक रीत्या हजारो लोकांनी त्यांना श्रद्धांजली वाहिली. पत्रे, तारा, संस्थांचे ठराव, नियतकालिकांचे लेख व अग्रलेख, यातून शंवाकींच्या बहुरंगी व्यक्तिमत्त्वाचा व त्यांच्या कर्तबगारीचा गुणगौरव झाला. अक्षरशः शेकडो लोकांनी मोठमोठी पत्रे लिहून आपला त्यांच्याशी किती व कसा निकटचा संबंध होता, आपल्याला त्यांच्यापासून कशी प्रेरणा मिळाली, वगैरेंची हृदयस्पर्शी वर्णने केली. यापैकी बहुतेकांनी त्यांचे

अनुक्रमणिका

पत्रकार, संपादक व साहित्यिक म्हणूनच वर्णन केले. खुद्द श्री. यशवंतराव चव्हाण यांनीही त्यांचा थोर साहित्यिक म्हणूनच गौरव केला.

वस्तुतः शंवाकि हे रूढ अर्थाने साहित्यिक नव्हते. तसा त्यांचा दावाही नव्हता. कथा, कादंबरी, कविता, नाटक, ललित निबंध, असे कोणतेही ललित वाङ्मय त्यांच्या नावावर जमा नाही. हजारो पृष्ठे भरतील एवढे विपुल लेखन त्यांनी केले, पण त्या सर्वांचे विषय आर्थिक, औद्योगिक व विशेषेकरून सामाजिक. एकंदरीने सबंध देशाचा व प्रामुख्याने महाराष्ट्राचा आर्थिक, औद्योगिक व सामाजिक उत्कर्ष कसा होईल व त्यासाठी प्रत्येक व्यक्तीला स्वतःचा व पर्यायाने समाजाचा उत्कर्ष साधण्यासाठी सतत दीर्घोद्योग करून कसे पुढे जाता येईल, या दृष्टीने त्यांनी सतत चिंतन केले व तेच आपल्या संपादकीय व सामाजिक कार्याचे मुख्य सूत्र मानले. या प्रयत्नात त्यांनी स्वतः भरपूर लेखन केले, पण तरीसुद्धा वैचारिक साहित्य लिहिणाऱ्या साहित्यिकांत किंवा ग्रंथकारांत त्यांची गणना करता येणार नाही. किर्लोस्कर मासिकाच्या प्रारंभीच्या काळात, म्हणजे ते मासिक 'किर्लोस्कर खबर'च्या अवस्थेत असतानाच्या काळात 'व्यावसायिक पत्रव्यवहार', 'विक्रीची १२ सूत्रे' वगैरे लेखमाला लिहून त्या पुस्तकरूनाने त्यांनी प्रसिद्ध केल्या, पण त्या पुस्तकांना अर्थातच साहित्य म्हणता येणार नाही. नंतर, म्हणजे आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी 'यांत्रिकाची यात्रा' हे लक्ष्मणराव किर्लोस्करांचे चरित्र लिहून प्रसिद्ध केले व अगदी अलीकडे, म्हणजे मृत्यूच्या केवळ २५ दिवस आधी 'शंवाकीय' हे त्यांचे आत्मचरित्र पुस्तकरूपाने प्रकाशित झाले, परंतु याही कारणाने त्यांना साहित्यिक म्हणण्याचे कारण नाही. [कदाचित त्यांनी लिहिलेल्या संपादकीयांपैकी निवडक लेखांचा संग्रह पुढेमागे प्रसिद्ध झाला, तसा तो करावा अशी मुकुंदरावांना आग्रहाची सूचना आहे, तर वैचारिक साहित्य म्हणून त्याचे मूल्यमापन करणे शक्य होईल.]

तेव्हा रूढ अर्थाने 'शंवाकि' हे साहित्यिक नव्हते. पण साहित्याशी—ललित आणि वैचारिक अशा दोन्ही प्रकारच्या साहित्याशी—फार निकटचा संबंध असलेले, त्या साहित्याच्या प्रसिद्धीला, प्रचाराला व त्याचा प्रभाव वाढविण्याला फार मोठ्या प्रमाणावर साहाय्य करणारे व प्रेरणा देणारे थोर संपादक होते. किंबहुना १९२५ ते १९४५ या दोन दशकांत फक्त सुशिक्षित नव्हे तर समग्र साक्षर मराठी समाजात ललित व वैचारिक दोन्ही प्रकारचे साहित्य पोचविण्याची, त्या समाजाच्या प्रगतीच्या गरजा ओळखून तशा प्रकारचे प्रभावी साहित्य निर्माण करण्याची लेखकांनाही जाणीव देण्याची व जुन्या लेखकांच्या जोडीने अनेक नवे लेखक घडविण्याची कामगिरी शंवाकींनी आणि त्यांच्या किर्लोस्कर व स्त्री मासिकांनी केली, हे मराठी साहित्यावर त्यांचे फार मोठे ऋण आहे.

शंवाकि यांच्या या संपादकीय व्यक्तिमत्त्वाचा आणखी एक महत्त्वाचा पैलू होता. तो म्हणजे त्यांच्यातील चित्रकार. या क्षेत्रातही त्यांनी रूढ अर्थाने चित्रकार म्हणून नाव

मिळविले नाही. निसर्गचित्रे किंवा पोर्ट्रेट्स रंगविणे हा त्यांचा छंद त्यांना अखेरपर्यंत पुरला, पण तरी चित्रकलेच्या क्षेत्रात त्यांनी मोठी कामगिरी बजावली ती व्यंगचित्रांच्या माध्यमातून. किर्लोस्कर खबरच्या जन्मापासून सातत्याने वर्षानुवर्षेपर्यंत नियमितपणे दर महिन्याला संपादकीयाच्या जोडीने खाली 'शंवाकि' अशी आद्याक्षरे असलेले एक मार्मिक व्यंग-चित्र पाहण्याची त्यांनी मराठी वाचकाला सवय लावली होती. किंबहुना 'शंवाकि' हे त्यांचे आद्याक्षरी नाव त्या व्यंगचित्रामुळेच महाराष्ट्रात रूढ झाले. आणि या व्यंग-चित्रांनाही सतत एक अर्थ होता, एक सूत्र होते, त्यामागे एक ध्यास होता. महाराष्ट्राचा सतत उत्कर्ष झाला पाहिजे, आळस व रूढिप्रियता सोडून माणसाने उद्योगाची कास धरली पाहिजे, दैववाद व अंधश्रद्धा यांच्याविरुद्ध लढा करून विज्ञाननिष्ठेवर व बुद्धि-वादावर आधारित नव्या मूल्यांचा उत्साहाने स्वीकार केला पाहिजे, अस्पृश्यता व सामाजिक विषमता यांना मूठमाती देऊन समतेचा पुरस्कार केला पाहिजे, स्त्रियांचे दास्य व गुलामगिरी यांच्याविरुद्ध लढा उभारून स्त्रीला समाजात पुरुषांच्या बरोबरीचे व मानाचे स्थान मिळवून दिले पाहिजे, वगैरे सामाजिक विकासाची सूत्रे प्रभावीपणे सांगण्याचे एक माध्यम म्हणूनच शंवाकींनी या व्यंगचित्रकलेचा वापर केला व मराठी नियतकालिकांच्या सृष्टीत सामाजिक आशय असलेल्या व्यंगचित्रांची परंपरा रूढ केली.

आणि या क्षेत्रातही त्यांचे कर्तृत्व स्वतःच्या व्यंगचित्रांपुरते मर्यादित नव्हते. किर्लोस्कर, स्त्री व मनोहर या तिन्ही मासिकांतून त्यांनी अनेक चित्रकारांना व व्यंगचित्र-कारांना पुढे आणले व मुखपृष्ठावरील चित्रे, लेखांच्या सजावटीसाठी काढलेली चित्रे व व्यंगचित्रे यांच्याद्वारेही उद्योग, उत्साह, आत्मोन्नतीचा व नव्या सामाजिक मूल्यांचा प्रसार करण्याची कलाकारांना प्रेरणा दिली.

अशा प्रकारे साहित्य व चित्रकला, विशेषतः व्यंगचित्राचे माध्यम यांचा सामाजिक उत्कर्षासाठी वापर करण्याच्या त्यांच्या संपादकीय कौशल्यातूनच दोन अत्यंत प्रभावी ग्रंथांची निर्मिती झाली. ते ग्रंथ म्हणजे ना. धों. ताम्हणकरांचा 'दाजी' व ना. सी. फडके व शंवाकि यांची संयुक्त निर्मिती असलेल्या 'टाकांच्या फेकी'. यापैकी ताम्हण-करांच्या 'दाजी'चे लेखन हे सर्वस्वी शंवाकींच्या प्रेरणेने व सतत त्यांच्याबरोबर केलेल्या चर्चेतूनच साकार झाले व 'टाकांच्या फेकी'चे शब्दांकन फडक्यांचे असले तरी त्यातील सामाजिक आशय हा मुख्यत्वेकरून शंवाकींचा होता. आणि या दोन्ही ग्रंथांतील शब्दांच्या सामर्थ्याचे श्रेय अर्थातच ताम्हणकर व फडके यांचे असले तरी शंवाकींची रेखाचित्रे हेही त्याचे तितकेच मोठे आकर्षण होते यात शंका नाही.

अशा प्रकारे निव्वळ रूढ अर्थाने पाहिले तर शंवाकि हे साहित्यिक किंवा चित्रकारही नसले तरी शब्द आणि चित्र या दोन्ही माध्यमांचा प्रभावीपणे वापर करण्यासाठी प्रतिभा-शाली व विचारवंत लेखकांना व चित्रकारांना प्रेरणा देणारे यशस्वी व प्रतिभासंपन्न संपादक होते, इतकेच नव्हे तर साहित्याचे सामर्थ्य व मर्यादा या दोहोंची अचूक जाण

पत्रकार, संपादक व साहित्यिक म्हणूनच वर्णन केले. खुद्द श्री. यशवंतराव चव्हाण यांनीही त्यांचा थोर साहित्यिक म्हणूनच गौरव केला.

वस्तुतः शंवाकि हे रूढ अर्थाने साहित्यिक नव्हते. तसा त्यांचा दावाही नव्हता. कथा, कादंबरी, कविता, नाटक, ललित निबंध, असे कोणतेही ललित वाङ्मय त्यांच्या नावावर जमा नाही. हजारो पृष्ठे भरतील एवढे विपुल लेखन त्यांनी केले, पण त्या सर्वांचे विषय आर्थिक, औद्योगिक व विशेषेकरून सामाजिक. एकंदरीने सबंध देशाचा व प्रामुख्याने महाराष्ट्राचा आर्थिक, औद्योगिक व सामाजिक उत्कर्ष कसा होईल व त्यासाठी प्रत्येक व्यक्तीला स्वतःचा व पर्यायाने समाजाचा उत्कर्ष साधण्यासाठी सतत दीर्घोद्योग करून कसे पुढे जाता येईल, या दृष्टीने त्यांनी सतत चिंतन केले व तेच आपल्या संपादकीय व सामाजिक कार्याचे मुख्य सूत्र मानले. या प्रयत्नात त्यांनी स्वतः भरपूर लेखन केले, पण तरीसुद्धा वैचारिक साहित्य लिहिणाऱ्या साहित्यिकांत किंवा ग्रंथकारांत त्यांची गणना करता येणार नाही. किर्लोस्कर मासिकाच्या प्रारंभीच्या काळात, म्हणजे ते मासिक 'किर्लोस्कर खबर'च्या अवस्थेत असतानाच्या काळात 'व्यावसायिक पत्रव्यवहार', 'विक्रीची १२ सूत्रे' वगैरे लेखमाला लिहून त्या पुस्तकरूनाने त्यांनी प्रसिद्ध केल्या, पण त्या पुस्तकांना अर्थातच साहित्य म्हणता येणार नाही. नंतर, म्हणजे आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी 'यांत्रिकाची यात्रा' हे लक्ष्मणराव किर्लोस्करांचे चरित्र लिहून प्रसिद्ध केले व अगदी अलीकडे, म्हणजे मृत्यूच्या केवळ २५ दिवस आधी 'शंवाकीय' हे त्यांचे आत्मचरित्र पुस्तकरूपाने प्रकाशित झाले, परंतु याही कारणाने त्यांना साहित्यिक म्हणण्याचे कारण नाही. [ कदाचित त्यांनी लिहिलेल्या संपादकीयांपैकी निवडक लेखांचा संग्रह पुढेमागे प्रसिद्ध झाला, तसा तो करावा अशी मुकुंदरावांना आग्रहाची सूचना आहे, तर वैचारिक साहित्य म्हणून त्याचे मूल्यमापन करणे शक्य होईल. ]

तेव्हा रूढ अर्थाने 'शंवाकि' हे साहित्यिक नव्हते. पण साहित्याशी—ललित आणि वैचारिक अशा दोन्ही प्रकारच्या साहित्याशी—फार निकटचा संबंध असलेले, त्या साहित्याच्या प्रसिद्धीला, प्रचाराला व त्याचा प्रभाव वाढविण्याला फार मोठ्या प्रमाणावर साहाय्य करणारे व प्रेरणा देणारे थोर संपादक होते. किंबहुना १९२५ ते १९४५ या दोन दशकांत फक्त सुशिक्षित नव्हे तर समग्र साक्षर मराठी समाजात ललित व वैचारिक दोन्ही प्रकारचे साहित्य पोचविण्याची, त्या समाजाच्या प्रगतीच्या गरजा ओळखून तशा प्रकारचे प्रभावी साहित्य निर्माण करण्याची लेखकांनाही जाणीव देण्याची व जुन्या लेखकांच्या जोडीने अनेक नवे लेखक घडविण्याची कामगिरी शंवाकींनी आणि त्यांच्या किर्लोस्कर व स्त्री मासिकांनी केली, हे मराठी साहित्यावर त्यांचे फार मोठे ऋण आहे.

शंवाकि यांच्या या संपादकीय व्यक्तिमत्त्वाचा आणखी एक महत्त्वाचा पैलू होता. तो म्हणजे त्यांच्यातील चित्रकार. या क्षेत्रातही त्यांनी रूढ अर्थाने चित्रकार म्हणून नाव

मिळविले नाही. निसर्गचित्रे किंवा पोर्ट्रेट्स रंगविणे हा त्यांचा छंद त्यांना अखेरपर्यंत पुरला, पण तरी चित्रकलेच्या क्षेत्रात त्यांनी मोठी कामगिरी बजावली ती व्यंगचित्रांच्या माध्यमातून. किर्लोस्कर खबरच्या जन्मापासून सातत्याने वर्षानुवर्षेपर्यंत नियमितपणे दर महिन्याला संपादकीयाच्या जोडीने खाली 'शंवाकि' अशी आद्याक्षरे असलेले एक मार्मिक व्यंगचित्र पाहण्याची त्यांनी मराठी वाचकाला सवय लावली होती. किंबहुना 'शंवाकि' हे त्यांचे आद्याक्षरी नाव त्या व्यंगचित्रामुळेच महाराष्ट्रात रूढ झाले. आणि या व्यंगचित्रांनाही सतत एक अर्थ होता, एक सूत्र होते, त्यामागे एक ध्यास होता. महाराष्ट्राचा सतत उत्कर्ष झाला पाहिजे, आळस व रूढिप्रियता सोडून माणसाने उद्योगाची कास धरली पाहिजे, दैववाद व अंधश्रद्धा यांच्याविरुद्ध लढा करून विज्ञाननिष्ठेवर व बुद्धिवादावर आधारित नव्या मूल्यांचा उत्साहाने स्वीकार केला पाहिजे, अस्पृश्यता व सामाजिक विषमता यांना मूठमाती देऊन समतेचा पुरस्कार केला पाहिजे, स्त्रियांचे दास्य व गुलामगिरी यांच्याविरुद्ध लढा उभारून स्त्रीला समाजात पुरुषांच्या बरोबरीचे व मानाचे स्थान मिळवून दिले पाहिजे, वगैरे सामाजिक विकासाची सूत्रे प्रभावीपणे सांगण्याचे एक माध्यम म्हणूनच शंवाकिंनी या व्यंगचित्रकलेचा वापर केला व मराठी नियतकालिकांच्या सृष्टीत सामाजिक आशय असलेल्या व्यंगचित्रांची परंपरा रूढ केली.

आणि या क्षेत्रातही त्यांचे कर्तृत्व स्वतःच्या व्यंगचित्रांपुरते मर्यादित नव्हते. किर्लोस्कर, स्त्री व मनोहर या तिन्ही मासिकांतून त्यांनी अनेक चित्रकारांना व व्यंगचित्रकारांना पुढे आणले व मुखपृष्ठावरील चित्रे, लेखांच्या सजावटीसाठी काढलेली चित्रे व व्यंगचित्रे यांच्याद्वारेही उद्योग, उत्साह, आत्मोन्नतीचा व नव्या सामाजिक मूल्यांचा प्रसार करण्याची कलाकारांना प्रेरणा दिली.

अशा प्रकारे साहित्य व चित्रकला, विशेषतः व्यंगचित्राचे माध्यम यांचा सामाजिक उत्कर्षासाठी वापर करण्याच्या त्यांच्या संपादकीय कौशल्यातूनच दोन अत्यंत प्रभावी ग्रंथांची निर्मिती झाली. ते ग्रंथ म्हणजे ना. धों. ताम्हणकरांचा 'दाजी' व ना. सी. फडके व शंवाकि यांची संयुक्त निर्मिती असलेल्या 'टाकांच्या फेकी'. यांपैकी ताम्हणकरांच्या 'दाजी'चे लेखन हे सर्वस्वी शंवाकिंच्या प्रेरणेने व सतत त्यांच्याबरोबर केलेल्या चर्चेतूनच साकार झाले व 'टाकांच्या फेकी'चे शब्दांकन फडक्यांचे असले तरी त्यातील सामाजिक आशय हा मुख्यत्वेकरून शंवाकिंचा होता. आणि या दोन्ही ग्रंथांतील शब्दांच्या सामर्थ्याचे श्रेय अर्थातच ताम्हणकर व फडके यांचे असले तरी शंवाकिंची रेखाचित्रे हेही त्यांचे तितकेच मोठे आकर्षण होते यात शंका नाही.

अशा प्रकारे निव्वळ रूढ अर्थाने पाहिले तर शंवाकि हे साहित्यिक किंवा चित्रकारही नसले तरी शब्द आणि चित्र या दोन्ही माध्यमांचा प्रभावीपणे वापर करण्यासाठी प्रतिभाशाली व विचारवंत लेखकांना व चित्रकारांना प्रेरणा देणारे यशस्वी व प्रतिभासंपन्न संपादक होते, इतकेच नव्हे तर साहित्याचे सामर्थ्य व मर्यादा या दोहोंची अचूक जाण

असलेला थोर संपादक मराठीत तरी दुसरा झाला नाही हे मान्य केले पाहिजे. म्हणूनच ते ' किर्लोस्कर ' मासिकाच्या संपादकीय आसनावरून १९५९ साली निवृत्त झाले तेव्हा त्यांच्या कामगिरीचे मार्मिक विवेचन व मूल्यमापक करणारा लेख श्री. वि. स. खांडेकर यांनी लिहिला, त्या लेखाला त्यांनी मथळा दिला होता : ' संपादन ?—छे ! नांगरणी आणि पेरणी ' !

किर्लोस्कर मासिकाची सुरुवात १९२० साली किर्लोस्कर कारखान्याचे मुखपत्र म्हणून ' किर्लोस्कर खबर ' या नावाने झाली. विलायतेत विक्रीच्या आधुनिक तंत्राचा त्यांनी अभ्यास केला व अनुभव घेतला आणि त्याच दृष्टिकोणातून कारखान्याचे 'हाउस ऑर्गन' म्हणून 'खबर'चा जन्म झाला. पण अल्पावधीतच त्यांनी ओळखले की, लाकडी नांगराऐवजी लोखंडी नांगर वापरण्याला शेतकऱ्याला प्रवृत्त करण्यासाठी ज्या आधुनिक, ऐहिक जीवनाची प्रवृत्ती आवश्यक आहे, ती दृष्टी फक्त शेतीपुरती किंवा उद्योगधंद्यापुरती मर्यादित ठेवून भागणार नाही. त्यासाठी समाजमनालाच आधुनिक जीवनाची नवी दृष्टी दिली पाहिजे. म्हणून ' खबर 'चे रूपांतर संपूर्ण जीवनाचे चित्र रेखाटणाऱ्या व नवी स्वप्ने उभी करणाऱ्या मासिकात करण्याची त्यांची धडपड सुरू झाली.

या कामी लेखक, कवी व चित्रकार यांचे सहकार्य त्यांनी मिळविले व त्यांच्या साहित्याच्या व कलेच्या द्वारे उत्कर्षासाठी व आत्मोन्नतीसाठी उत्साहाने झटणाऱ्या नव्या महाराष्ट्राचे चित्र आपल्या मासिकातून उभे केले. शंवाकिंचे हे दर पहिल्या तारखेला बिनचूकपणे प्रसिद्ध होणारे किर्लोस्कर मासिक हा नव्या महाराष्ट्राला आकर्षित करून घेणारा, नव्हे दिपवून टाकणारा अभिनव प्रयोग होता. ' किर्लोस्कर 'च्या पूर्वी महाराष्ट्रात अनेक मासिके निघाली होती. त्यांपैकी काही बंद पडली होती, काही कशीबशी चालू होती. लोकमित्र, विविधज्ञानविस्तार, चित्रमयजगत, मनोरंजन यांसारखी काही मासिके दर्जेदार होती, काही प्रमाणात लोकप्रियही होती. पण त्यांचा वाचकवर्ग अत्यंत मर्यादित होता. शहरी सुशिक्षितांपैकी काही लोकांपलीकडे ती पोचली नव्हती. तसेच पहिल्या महायुद्धाच्या अखेरीपासून तो दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभीच्या काळापर्यंतच्या वीस वर्षांत लोकशिक्षण, रत्नाकर, ज्योत्स्ना, सह्याद्री, यशवंत, प्रतिभा, अभिरुची, सत्यकथा अशी काही दर्जेदार व इतरही अनेक नियतकालिके निघाली व त्यांपैकी काही दीर्घकाल चालली. काही आजही आहेत. पण त्यांच्यापैकी एकाचाही ' किर्लोस्कर 'इतका प्रभाव पडला नाही. याचे कारण त्यांना साहित्याचे सामर्थ्य व मर्यादा शंवाकींसारख्या अचूक समजल्या नाहीत व साहित्य आणि समाजजीवन यांची काळाला अनुरूप अशी सांगड घालता आली नाही.

शंवाकींनी ' किर्लोस्कर ' मासिकात परिचयलेख, आरोग्यविषयक लेख वगैरेंच्या

जोडीला जे वैचारिक व ललित साहित्य दिले त्या सर्व लेखनाचे लेखक वेगवेगळे असले व त्याचे श्रेय त्यांनाच असले तरी त्या सर्वांना एकत्र आणणारे निश्चित असे जे सूत्र होते ते सर्वस्वी शंवाकींचे स्वतःचे होते, आणि तेच त्यांच्या संपादकीय कर्तबगारीचे, त्यांच्यापूर्वी कोणाही संपादकाला न गवसलेले, वैशिष्ट्यपूर्ण रहस्य होते. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर हे त्या वेळी नुकतेच पुढे येऊ लागलेले लेखक होते व त्यांना किर्लोस्कर-ने निर्माण केले व घडविले असे जरी म्हणता येणार नाही, तरी त्यांना निव्वळ शहरी सुशिक्षितांपलीकडचा मोठा वाचकवर्ग मिळवून देण्याचे श्रेय सर्वस्वी 'किर्लोस्कर'चे होते हे नाकारता येणार नाही. फडके-खांडेकरांच्या नंतरच्या पिढीचे काणेकर, ठोकळ, र. वा. दिघे प्रभृती लेखकांच्या बाबतीतही हेच म्हणता येईल. आणि यात 'किर्लोस्कर' चा व शंवाकींचा वाटा असा की, त्यांनी फक्त फडके, खांडेकर, काणेकर, ठोकळ, दिघे यांच्या कथाच वाचकांना दिल्या नाहीत तर स्वातंत्र्यवीर सावरकर, महादेवशास्त्री दिवेकर, डॉ. वा. का. किर्लोस्कर, ह. रा. महाजनी, लालजी पेंडसे, आदींच्या अत्यंत प्रभावी व प्रक्षोभक वैचारिक लेखनाच्या जोडीने ते ललित साहित्य प्रकाशित केले म्हणूनच त्या ललितालाही वेगळा वैचारिक व सामाजिक आशय प्राप्त झाला. ना. सी. फडके यांच्या निव्वळ प्रणयकथा हासुद्धा त्या कालखंडातला व्यक्तिस्वातंत्र्याचा व बंडखोरीचा सुंदर आविष्कार होता, म्हणूनच ते साहित्य 'किर्लोस्कर' मासिकाच्या साचात चपखल बसले, इतकेच नव्हे तर मुखपृष्ठावरील चित्रातला नवा महाराष्ट्रीय तरुण व तरुणी यांतही तीच कल्पना साकार होत गेली. ना. सी. फडके यांच्या किर्लोस्करातून प्रसिद्ध झालेल्या कथा, आशा उद्धारसारख्या चालू कादंबऱ्या, 'आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न' यासारख्या लेखमालाही किर्लोस्करी संप्रदायाने निर्माण केलेल्या नव्या आनंदी, स्वतंत्र तरुणांच्या आशा-आकांक्षांना पूरक व पोषक अशाच होत्या. आणि या समसमासंयोगाचे मूर्तिमंत प्रतीक म्हणूनच शंवाकींच्या कुंचल्याने रेखाटलेली चित्रे व ना. सी. फडके यांचे शब्द मिळून निर्माण झालेल्या 'टाकांच्या फेकी' हा मराठी वाङ्मयातला अगदी अभिनव व परिणामकारक असा प्रयोग त्यांनी महाराष्ट्राला सादर केला.

पण ना. सी. फडके यांच्या लेखनाचा आशय व बाज हा सर्वस्वी सुशिक्षित व सुखवस्तू मध्यमवर्गापुरता मर्यादित होता. याउलट शंवाकींच्या किर्लोस्करची भूमिका फक्त या वर्गाच्या उद्धारापुरती संकुचित नव्हती. कारखान्यातला नवा कामगार व खेड्यातला शेतकरी यांच्या विचारात परिवर्तन घडवून आणणे, दैववाद, धर्मभोळेपणा, अंधश्रद्धा, अस्पृश्यता, जातिभेद यांच्या मगरमिठीतून समाजाची सुटका करणे, परंपरागत आळस व निरुद्योगीपणा यांच्याविरुद्ध संघर्ष करून दीर्घोद्योग, नवे ज्ञान, विज्ञान, नवे तंत्र यांच्या जोरावर उत्कर्षसोपानाच्या पायऱ्या चढत जाणे, हा संदेश समग्र समाजापर्यंत पोचविणे, यासाठी किर्लोस्करची धडपड होती. या सामाजिक उत्कर्षाच्या प्रयत्नात स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीने स्थान असले पाहिजे व त्यासाठी आधुनिक स्त्रीला शिक्षण व सामाजिक समता

मिळाली पाहिजे हेही शंवार्कींच्या विचारसरणीचे एक मुख्य सूत्र होते व त्यासाठी किर्लोस्कर मासिकाच्या जोडीला त्यांनी ' स्त्री ' मासिक सुरू केले. या दोन्ही मासिकांतून ना. सी. फडके यांच्या जोडीला कमल दीक्षित ( पुढे सौ. कमला फडके ) जशा झळकू लागल्या तसेच वि. स. खांडेकरांच्या जोडीला ग. ल. ठोकळ, शंकरराव मोरे, पु. बा. साठे, र. वा. दिघे, आनंदीबाई शिर्के, शांताबाई नाशिककर, चंद्रकला हाटे, मालतीबाई बेडेकर यांच्यासारख्या नव्या दमाच्या निव्वळ कलावादाऐवजी कला व जीवन दोन्हींचा हिरीरीने पुरस्कार करणाऱ्या लेखक-लेखिकांचे ललित व वैचारिक साहित्यही या दोन्ही मासिकांतून प्रसिद्ध होऊ लागले.

' किर्लोस्कर ' व ' स्त्री ' या दोन्ही मासिकांनी दुसऱ्या महायुद्धाच्या पूर्वीच्या दोन दशकांत महाराष्ट्राला नव्या उद्योगप्रधान संस्कृतीची, इहवादाची, व आधुनिक जीवनासाठी व ऐहिक उत्कर्षासाठी संघर्ष करण्याची जाणीव करून देण्याची सतत धडपड केली. बुवाबाजीचा दंभस्फोट, अस्पृश्यतेविरुद्ध घणाघाती प्रचार, देवभोळेपणाविरुद्ध व दैववादाविरुद्ध लढा, खेड्यातील शेतकऱ्याला नव्या जाणिवा देण्याची धडपड, ज्योतिबा फुले, आगरकर व महर्षी कर्वे यांना अभिप्रेत असलेली नवी आधुनिक स्त्री साकार करण्याचा प्रयत्न, हे सर्व नवे विचार व ते विचार लेखणीच्या द्वारे प्रभावी रीतीने व्यक्त करणारे विचारवंत यांचे व्यासपीठ हे किर्लोस्कर व स्त्री मासिकांचे त्या काळातील स्थान होते. वर म्हटल्याप्रमाणे हे सर्व लेखन करणारे लेखक हे आपापल्या परीने स्वतंत्र प्रतिभाशाली साहित्यिक व विचारवंत होते व ते किर्लोस्कर–स्त्री खेरीज इतर नियतकालिकांतूनही लेखन करीत होते, परंतु त्या सगळ्यांना एकत्र आणून व त्यांच्या लेखनाच्या द्वारे एक प्रकारची वैचारिक लढाईची आघाडी उघडून सबंध महाराष्ट्रात नवी जागृती करण्याची अजोड कामगिरी किर्लोस्कर मासिकांनी त्या कालखंडात पार पाडली व स्वतःच्या निवृत्तीनंतरही ती परंपरा चालू राहील अशी घडी बसवून दिली याचे संपूर्ण श्रेय शंवार्कांचेच होते. या संदर्भात आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी की शंवार्कींच्या या संपादकीय कामगिरीला नव्या विचारांची व आधुनिक, पुरोगामी दृष्टिकोणाची बैठक तर होतीच, पण शिवाय ते स्वतः एक प्रभावी चित्रकार व चोखंदळ रसिक होते, म्हणूनच त्यांची मासिके अत्यंत आकर्षक व लोकप्रिय होऊ शकली व त्यातून मांडलेला नवा विचार सबंध महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरच्या मराठी वाचकांच्या मनाची पकड घेऊ शकला. शंवार्कींनी स्वतः काढलेली शेकडो व्यंगचित्रे, मासिकाच्या प्रत्येक अंकाचे वैशिष्ट्यपूर्ण मुखपृष्ठ, मासिकाच्या अंकातील हास्यविनोदाचे पाझर, विविध प्रकारचे खास अंक, दिवाळी अंक, लेखांची सजावट व त्यांचे चित्रीकरण, वगैरे सर्व बाबतींत शंवार्कींनी सतत पुढे पाऊल टाकण्याची धडपड केली व आपले कौशल्य पणाला लावले, म्हणूनच मराठी नियतकालिकांच्या सृष्टीत किर्लोस्कर मासिकांना अभूतपूर्व असे स्थान प्राप्त झाले.

किर्लोस्कर व स्त्री मासिकांच्या जोडीला शंवार्कींनी पुढे ' मनोहर ' मासिक सुरू केले

व काही प्रमाणात तेही यशस्वीपणे चालू राहिले तरी त्याचा प्रभाव किर्लोस्कर-स्त्री इतका पडला नाही हे मान्य केले पाहिजे. पण त्याचेही कारण शंवाकींच्या व्यक्तिमत्त्वात व त्याचबरोबर 'मनोहर'च्या आशयात शोधावे लागेल. मनोहर मासिक काढण्यातील शंवाकींचा हेतू साहित्य, नाट्य, चित्रपट, संगीत, नृत्य, चित्रकला, आदींसंबंधींची मराठी वाचकाला गोडी लावणे, त्यांतील सौंदर्याचा आस्वाद घेण्याची जाणीव देणे, मराठी साहित्य व महाराष्ट्र यांच्यापलीकडच्या जगातील साहित्य व कलेची त्याला ओळख करून देणे, हा होता. त्यासाठी साहित्यिकांचे व कलावंतांचे परिचय, अनेक भाषांतील नव्या ग्रंथांची ओळख परभाषांतील कथांचे अनुवाद, असे विपुल साहित्य 'मनोहर'ने मराठी वाचकांना दिले व मराठीतील बहुतेक सर्व जुन्या व नव्या लेखकांनी तसे साहित्य मनोहर'ला पुरविले. परंतु निव्वळ ललित वाङ्मय व कला यांचे सामाजिक जीवनातील स्थान मर्यादित असते, विशेषतः आर्थिक, औद्योगिक व सामाजिक दृष्ट्या अविकसित देशात तर अशा प्रकारच्या साहित्याचा वाचकवर्गही मर्यादितच असतो, हेच मनोहरच्या मर्यादित यशाने स्पष्ट झाले. याशिवाय शंवाकींचा स्वतःचा पिंड साहित्यिकाचा किंवा साहित्यसमीक्षकाचा नव्हता, त्यामुळे निव्वळ साहित्यगुणांच्या दृष्टीने पाहता 'मनोहरला फार मोठी उंची गाठता आली नाही. व त्यामुळे ते त्या क्षेत्रातील उच्चभ्रूंचे मासिक बनू शकले नाही. तरीसुद्धा शंवाकींचे संपादकीय कौशल्य व व्यावहारिक बाजू सांभाळण्यातील तत्परता यामुळे इतर काही उच्चभ्रू मासिकांप्रमाणे ते अल्पायुषी ठरले नाही. शंवाकींच्या निवृत्तीनंतर त्याचा वारसा पुढे चालविण्याची जबाबदारी अंगावर घेणाऱ्या मुकुंदरावांनीही 'मनोहर'चे पूर्वीचे स्वरूप कायम ठेवून ते लोकप्रिय करण्यासाठी अनेक प्रयोग केले, पण तरीही त्याचे यश मर्यादितच राहिले, आणि मग अगदी अलीकडे 'मनोहर'ला स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध लागला, तो पुनः तरुणांच्या प्रश्नात! म्हणजे एका अर्थाने 'आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न' ही ना. सी. फडके यांची लेखमाला ज्या सूत्राला अनुसरुन ३५–४० वर्षांपूर्वी शंवाकींनी 'किर्लोस्कर'मध्ये प्रसिद्ध केली त्याच सूत्रात! स्वातंत्र्यपूर्व काळातल्याप्रमाणेच आजही वर्तमानकाळ हा तरुणांचाच आहे व त्यांचे भवितव्य हेच अधिक महत्त्वाचे आहे या जाणिवेने आता 'मनोहर' मासिकाचे साप्ताहिक झाले आहे व मोठ्या तडफदारपणे आजच्या तरुण स्त्री–पुरुषांचे आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक प्रश्न पुढे मांडून तो तरुणांचा आवडता 'पेपर' बनला आहे, ही एकपरीने शंवाकीय परंपराच आहे व नव्या जमान्याला अनुसरून हिरीरीने नव्या मूल्यांसाठी संघर्ष करण्याची शंवाकीय परंपरा पुढे नेण्याचेच कार्य तो करीत आहे.

किर्लोस्कर, स्त्री व मनोहर या तीन मासिकांचे यशस्वी संपादन ही शंवाकींची सर्वांत मोठी कामगिरी असली तरी मासिकांचे संपादक हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा एकमेव पैलू नव्हता. लक्ष्मणराव किर्लोस्करांनी निर्माण केलेल्या नव्या किर्लोस्कर उद्योगाचे एक प्रमुख

अनुक्रमणिका

भागीदार, महाराष्ट्रात उद्योगधंद्यांची वाढ व्हावी म्हणून मराठा चेंबर मार्फत अविरत प्रचार करणारे व कोयना धरणासाठी प्रभावी मोहीम उभारणारे कारखानदार, औंध संस्थानाची सर्वांगीण सुधारणा करण्यात मोठा वाटा उचलणारे कर्तबगार मंत्री, किर्लोस्कर वाडीत व भोवतालच्या परिसरात शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक विकासाच्या कार्यात पुढाकार घेणारे नेते, सामाजिक सुधारणांसाठी स्वातंत्र्यवीर सावरकर, महादेवशास्त्री दिवेकर. डॉ. वा. का. किर्लोस्कर यांच्या जोडीने झुंज घेणारे समाजसुधारक, आणि आयुष्याच्या संध्याकाळी निवृत्तीच्या अखेरच्या कालखंडातही शेकडो लोकांना प्रेरणा देणारे ज्येष्ठ मार्गदर्शक, असे बहुरंगी व्यक्तिमत्त्व त्यांनी प्रयत्नपूर्वक कमावले होते. म्हणूनच प्रकाशाच्या झोतापासून दीर्घकाळ पूर्णपणे दूर असूनही त्यांच्या मृत्यूने संपूर्ण महाराष्ट्र हळहळला व असंख्य लोकांनी त्यांना प्रकट व मूक श्रद्धांजली अर्पण केली व महात्मा ज्योतिबा फुले, आगरकर, महर्षी कर्वे, यांच्या थोर परंपरेतील एक श्रेष्ठ समाज सुधारक म्हणून त्यांचा गौरव केला तो यथार्थ आहे यात शंका नाही.



आगामी अंक : २८ ऑगस्ट ७५ रोजी

## संत श्रीज्ञानदेव विशेषांक

### म्हणून प्रसिद्ध होईल

या अंकात

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, डॉ. रा. शं. वाळिंबे, श्री. रा. चिं. ढेरे, डॉ. यू. म. पठाण, वि. मो. केळकर, डॉ. स. रा. गाडगीळ, प्रा. मधुकर रा. जोशी, डॉ. श्री. रं. कुलकर्णी, डॉ. मु. श्री. कानडे, प्रा. म. गं. नातू, डॉ. वि. य. कुलकर्णी; डॉ. स. गं. मालशे, डॉ. उषा देशमुख, प्रा. पां. ना. कुलकर्णी, डॉ. भीमराव कुलकर्णी इत्यादिकांचे खास लेख.



# कादंबरी १९७२

## डॉ. एस. एस. भोसले

एकोणीसशे बहात्तरमध्ये प्रसिद्ध झालेल्या सर्वसाधारणपणे, उपलब्ध एकशेतीस कादं-बऱ्या वाचून काय वाटते ?

या एकशेतिसाच्या गणतीत स्वतंत्र कादंबऱ्यांची संख्या खूपच थोडी आहे. जेमतेम पन्नास-पंचावनच्या आतबाहेर. बाकी आवृत्त्या, पुनर्मुद्रणे किंवा अनुवाद-भाषांतरे आहेत. लेखिकांची हजेरी बरीचशी रोडावली आहे. मात्र शक्य तेवढ्या सगळ्या कादंबऱ्यांच्या वाचनातून तीव्रतेने डाचत राहते ते हे की, आमच्या कलावंतांना प्रामुख्याने प्रेमाशिवाय काही दिसत नाही, वेगळे चित्रण सुचत नाही; झालेच तर, पुराण-इतिहास कथांचा आसरा घेतल्याखेरीज जमत नाही. हे रिंगण मराठी कादंबरीकाराचे झाड धरून आहे. जीवनात प्रेमाशिवाय दुसरा प्रश्न नाही आणि भूतकाळात रमण्याखेरीज दुसरा उतारा नाही, अशी दृढ समजूत होण्याइतपत हे रतणे घडले आहे. वर्तमानाला सरळ-सीध्या रीतीने भिडण्या-पेक्षा तो उष्टा–शिळा होऊन भूतात जमा होण्याची वाट पाहायची, मग पुढे कधी तरी जम-ल्यास त्याचे रेखांकन करायचे अशी ही भीरु-भूत-प्रकृती दिसते. मराठी कादंबरीकारांना कडकडीत काही झेपत–सोसत नाही की काय ? खडतर, सणसणीत, वरकड असे जीवघेणे, क्रूर म्हणून जे हरघडी समोर येते आणि सामान्य माणसाचे जीवन हरवून-खिरवून टाकते त्याला धृष्टतेने सामोरे जाण्याची–अर्थपूर्ण जीवनानुभव अनुभवाच्या मूल्यविषयक जाणिवे-सकट प्रकट करण्याची—हिम्मत, जिरते की काय ? का जिरावी ? बहात्तरची कादंबरी वाचल्यावर मराठी कादंबरीकारांच्या, बृहन्नडेगत अवस्थेबद्दल मनी खंत दाटून येते. त्या त्य समाजाचे साहित्य हे त्या त्या समाजाच्या चलनवलनांचे, आंदोलन-स्पंदनांचे, विचार-विकासांचे, विचारविलसितांचे बोलके प्रतीक—सर्वांशांनी नसले तरी थोड्याफार स्थूलार्थाने असते असे सांगतात. बहात्तरची मराठी कादंबरी नेमक्या उलट्या खुणा दाखवून जाते. हा कुणाचा जय ? कुणाचा पराजय ? असा प्रश्न पडतो.

आमच्या मराठी कादंबरीकारांना प्रेम ही जीवनातील एकमेव बाब वाटते. ( खरे तर ती

अनुक्रमणिका

अनेकांतील एक अशी अग्रक्रमाची बाब आहे, असे त्या विषयावरील पीएच. डी. मुळे प्राप्त झालेल्या गहूभराएवढया अधिकाराने म्हटल्यास अनधिकार ठरू नये. ) ती तशी वाटली तरीही हरकत नाही, पण तसे चित्रण तरी व्हवे. पण नुसते वाटणे हे वाटणे राहावे. तेच थोर बनून चित्रण खत्रूड व्हावे, हे अनिष्ट आहे. मराठी कादंबरीच्या अनारोग्याचे ते दुष्ट लक्षण आहे. साहजिकच फुंफाट वासनेच्या चित्रणाला—बरबटलेल्या विकृत भावनांच्या चित्रणाला—प्रीतिभावनेचे चित्रण म्हणण्याचा आग्रह अप्रस्तुत आहे. पण नेमके हेच अप्रस्तुत खरे-सच्चे मानून त्याचा इतका रांधा घातला जातो की बोलून सोय नाही. मग हे सारे वाचून पाहून प्रश्न पडतो, Is it love or is it just sex? आणि पाठोपाठ डर्सीचे एक वाक्यही आठवून जाते. डर्सी सांगतो, " Love appears in all literature, not as a passing episode but as the morrow of it. "

पण मराठी कादंबरीत तर, विकृत वासनांच्या चाळवू उक्तीकृतींच्या पासिंग शो ला उधाण मिळून राहिले आहे. बाकी म्हणून काही जीवन नाहीच ! तेवढ्यावरच सारे चालते' भागते. हे लोण सर्वसाधारण कादंबरीत सोडाच पण पार ऐतिहासिक, पौराणिक कादंबरीतही पेरले जाते, तेव्हा अचंब्याची बाब ठरते : प्रीत पराई मीरेच्या बाबतीत, मृणालिनी देसाईंच्या ' योगिनी ' त हे घडले तर समजणे शक्य तरी असते; पण नाही म्हणता म्हणता इंदुमती केळकरांची झुंजार ' रजिया ' अल्तुनिया व याकून यांच्या प्रेमाच्या लबड्यात गुंतून पडते तेव्हा रजियाबद्दल नव्हे तर मराठी कादंबरीचीच काळजी वाटते. त्यात हे प्रेम सरळ हृदयापर्यंत तरी जाते की नाही ? केळकरांना ते मान्य नसावे. कारण ' माहौल ', ' बेखटक ', ' मुतलवी ' अशा उर्दू-फारशी शब्दांच्या जंजाळात अडकून ते जखमी होते, स्वीकारणेच कठीण होते, भोगण्याचा प्रश्नच खुंटतो; वाट्यास येणारे रसविघ्नाचे दुःख चुकत नाही. मग हे आणि असे इतर ध्यानात घेऊन वाटू लागते की ही माणसे नुसती प्रेमच करतात ? नुसतीच टणाणा उड्या मारीत असतात ? त्याव्यतिरिक्त राहू दे पण त्याला धरून असणारे काही जीवन, काही प्रश्न, काही अडचणी, काही संकटे, काही गुंतागुंती वगैरे असतात की नाही? जरूर असतात. रोज डोळ्यांना त्या दिसतात. अंगाखांद्याला भिडतात, शरीराला ढोलपाडतात. आम्ही हे पाहतो, ऐकतो, भोगतो. इच्छा असो-नसो थोडेफार वाट्याला म्हणून येतेच. कलावंतांच्या संवेदनाक्षम मनाला तर त्याचे आवाहन अधिक पोचत असणार. मग सृजनशीलता कुठे जाते ? आमचा अनुभव अत्यंत मर्यादित, खत्रूड, थिटा आणि थिजलेला का राहतो ? अंगालिंगापुरता—मनापर्यंत, वर्तनापर्यंतमुद्धा—पुरेसा न पोचलेला असा तो उरतो. का ? त्यातूनही ' माणूस ' पडतो बाजूला आणि शोध चालतो लिंगा-भांगाचा ! अगदी वेश्याजीवनावरील, सौ. लीला श्रीवास्तव ह्यांच्या गढूळ पाण्यातील मासोळ्या व ' एक मासोळी आणि सात समुद्र ' ह्या कादंबऱ्या वाचल्या तरी माणसाचा शोध करावा लागतो. हमखास भेटतात मात्र भडक वर्णने, योगायोग, दुबळी, खोटी, विवश करुणा...या बाबतीतील सौ. श्रीवास्तवांची आसक्ती ध्यानात घेऊनही वाटते

की, खरेच जीवन इतके सोपे आहे ? सरळ आहे ? साधे आहे ? एरंडाच्या झाडासारखे का त्याचे सरळसोट स्वरूप आहे ? प्रत्यक्षात तर केसाच्या गुंतवळयासारखी माणसे क्षणा-क्षणाला आरीला येताना दिसतात. आतड्याला पडलेल्या तिढ्यासारखे हे पीळ वेदना देतात, डोळ्यांत प्राण येतात, ओरडायला लावतात. पण मराठी कादंबरीत पार सुता-सारखे सरळ जीवन असते. जीवन शब्दात सरळ करायला कष्ट काहीच नाहीत पण प्रत्यक्षात ते तसे नाही त्याचे काय ? आमच्या कादंबरीकारांना त्याचे भान नसेल असे नाही; पण कलात्मक तृप्तता देणारे वास्तव चित्रित करण्याचे भान नाही, एवढे मात्र खरे! त्यामुळे पुढे तेवढीच मागे—गढूभर पुढे, गढूभर मागे—असे मराठी कादंबरीचे किती काळ चालले आहे. पण फडके-खांडेकरांच्या परंपरेत—रंजन-मूल्याच्या अवास्तव पुरस्कारात आणि दुबळ्या कारुण्यपूर्ण दृष्टिकोणात—ती किती काळ विसावणार आहे ? झपाट्याने ती स्वरूपाचा विकास करवून घेणार आहे की नाही ? हे आणि तत्सम काही प्रश्न मनात येण्याचे कारण वहात्तर सालातल्या मराठी कादंबरीचे सर्वसामान्य स्वरूप होय.

वहात्तर सालच्या मराठी कादंबरीने बव्हंशी प्रीतीचाच गोंडा घोळला आहे : प्रा. फडके यांनी 'किती जवळ ? किती दूर' मध्ये नमू-चंदूची जवळ-दूरची चरवट प्रेमकहाणी, पूर्वलौकिकास साजेशा हिरवट चविष्टपणाने, सफाईदार मोहक शैलीने सांगितली आहे. (अर्थात यावावत जून फडक्यांकडून वेगळी अपेक्षा ती काय करावी ?) फडक्यांचा हा वारसा चंद्रकांत काकोडकर यांनी, काकोडकरी कादंबरीचा करमणूकप्रधान रतीब घालून सतीच्या व्रताने पुढे चालविला आहे : 'शीतपेटी,' 'अगा जे घडलेचि नाही,' 'माझा कुणा म्हणू मी ?', 'एकदा तू सांगून जा,' 'असा मी, असा मी,' 'आधार,' 'परि स्वप्नचि भासे मला,' 'अबोल झालीस का ?,' 'पुरुष,' 'पराजिता मी,' 'बंधमुक्ता', 'अग्निदिव्य,' इत्यादी–कादंबरीकार काकोडकरांच्या हलक्याफुलक्या कादंबऱ्या आढळतात. 'शकुन' ही माधव कानिटकरांची त्यांपैकीच एक कादंबरी. विषय, सामग्री वगैरेची धर्तीगर्ती जवळ जवळ सारखी, कार्बन कॉपीगत, नावे फक्त वेगळी; ती जशी विपुल तसे लेखनवैपुल्यही आदर करायला लावणारे; रहस्यकथांच्या पातळीवर स्पर्धा करणारे! त्यामधील अंगभूत गुणांनीच त्यावर शिक्कामोर्तब केले असले तरी या 'कमर्शियल आर्ट'चा वेगळा विचार करणे आवश्यक आहे. तूर्त प्रा. फडके यांनी, अटीतटीने पेरलेल्या बीजाला फुटलेले असे धुमारे पाहून आपला कधीच सपशेल पराभव झाला आहे, हे मान्य करण्यास मुळीच अनमान करण्याचे कारण नाही. असे हे थोडे बाजूला ठेवले तरी, एकूण मराठी कादंबरीकारांना प्रेमाची बाधा जबर दिसते. प्रेमबाधेने झपाटून गेल्याने वेडेपिसे होण्याच्या अभिजात कथा संस्कृत साहित्यादी वाङ्मयातून वाचत-ऐकत आलो, त्यामुळे चव-समृद्ध झाली होती, इथे ती पार इस्कटून गेल्याचे जाणवते. 'आम्हापुढे मातब्बरी ती काय ?' असा हा जोर आहे आणि रसिकतेला ऐप आहे.

वहात्तरमधील मराठी कादंबरी सहज वरकडतेने पाहिली तरी याची प्रचीती येते. गोविंद

मुसळे यांनी देवाची अक्षरे गिरविली आहेत. यशवंत रांजणकरांनी ' रुद्रझेप ' घेतली आहे. कुमुदिनी रांगणेकर यांनी ' विस्मृतीच्या व्यथा ' सांगता सांगता ' ढगाळलेले आकाश ' दाखविले आहे. जे. एन्. तारळेकर यांनी ' आणखी एक मानव ' उभा केला आहे. श्रीपाद काळे ' अभुक्त राहून ' सोबत करताहेत. द. पां पेंडसे यांनी ' जन्माची ओळख पटली ' म्हटले आहे. मंदाकिनी भारद्वाज ' हिंदोळा ' घेताहेत, मुरलीधर भोसेकर ' विरंगुळा ' देताहेत, शरद पोतदार ' महाद्वार ' खुले करू पाहताहेत, यशवंत कर्णिक 'निळा डोह' दाखविताहेत, शशिकांत कोनकरांना ' ग्रहण ' लागले आहे, रमेश लालगुणकर ' प्रायश्चित्त ' मागताहेत, सुनंदा वर्तक ' स्वागतास सिद्ध मी ' म्हणताहेत, पद्माकर हसवनीस ' गाऊ त्यांना आरती ' करताहेत, ' उन्हाची सावली ' धरता धरता सौ. शैलजा राजे ' मधुघटचि रिकामा ' म्हणून सांगताहेत; अशी ही कितीतरी रूपे आहेत. त्यात ' गंधर्व ' प्रफुल्लचंद्र शेणई–' रिकामी घागर '–भास्कर भोळे, ' निशिगंध आणि निवडुंग ' – प्र. तु. दिवे, ' तरीही किनारा भेटेना '– आ. रा. फुले, ' कंत्राटदार ' दत्ताजी कुळकर्णी, ' एक काहूर उठलं होतं ', 'प्राची '–वसंत गांगल, ' पोस्टमन श्रीहरि '–अ. तु. वाळके, ' ऐने महाल ' – नयना आचार्य, ' सौभाग्य '–मनोज वसु, ' गुंफिते बकुल फुलांची माला ' – सुमन भडभडे, ' वासना ', ' भ्रमर ' – मा. दा. देवकाते, ' प्रश्नचिन्हे '– प्रा. शांताराम कुलकर्णी, ' अभिसार '–पी. ए. कुलकर्णी, ' हास्यमेव जयते '–मु. भा. मुळे, ' राजधानी ', ' वदला ', ' पाच नाजुक बोटं ' – बाबा कदम, ' कलंक ' –वि. द. माने, ' इशारा ', ' कुलवती '–शंकर खंडू पाटील, ' काळोखाच्या खुणा '–ल. गो. पंडितराव, ' वळी '–महादेव मोरे, ' प्रतिभेतील प्रेमप्रवाह ', ' सर्कसमोहिनी '–सत्यवादी'कार बाळासाहेब पाटील अशी काही रूपे कमी-अधिक रीतीने, समतोल तारतम्य बुद्धीने–मिसळली की वर्तुळ पुरे होते.

पण त्या साऱ्यांत, कमी-अधिक प्रमाणाने भेटतो तो प्रभाकर अत्रे यांचा ' खग्र्याम ' आणि ' आत्मप्रभा ' यांच्या ' व्यथा अशा प्रीतीच्या ' त्यास अपवाद आहेत; पण अपवाद नसणाऱ्या कृतींमधील प्रीतिभावनेच्या चित्रणाने, प्रीतीचा मूलस्रोत, मूलगाभा जाणून त्याचे नेटदार दर्शन घावे की नाही ? कुठेतरी प्रगल्भरूप लाभावे की नाही ? हे भाग्य क्वचित मिळावे असा संकेत दिसतो. स्थलमर्यादेमुळे इतर थोडे बाजूला ठेवू; पण चंद्रकांत खोत यांनी ज्या विनधोकपणे ' विनधास्त ' लिहून हस्तमैथुनाची लैंगिक वर्णने लाळगळत्या वृत्तीने वर्णिली आहेत. प्रल्हाद पांढारकर यांनी ' रात्र काळोखी 'सारख्या संयम व सूचकता इत्यादींनी मंडित कादंबरीत स्त्री-संभोगासाठी अनावर लैंगिक वासनेने वखवखलेल्या यल्लाप्पाला भडक प्रसंगांच्या उतरंडीत खिरविला आहे. ते वेगळ्या रीतीने मांडले असते तर प्रश्नाची नीटशी मांडणी व्हायला साहाय्य झाले असते. वाचनीयता गमावून किळस यावी अशा रीतीच्या सांगण्यात काय प्रवृत्तीचे दर्शन घडते ?-या कादंबऱ्यांतील नायक कधीतरी नायक आणि बव्हंशी चंद्रकांत खोत आणि प्रल्हाद पांढारकरच असतात, त्यात अपवादभूत घटनांच्या चित्रणाचा आणि वास्तवाच्या आभासनिर्मितीचा सोस मिसळतो; आणि निर्माण

होऊ घातलेल्या ललितकृतीच्या प्रगल्भरूपाचीच नस चेचली जाते, त्याने श्रेय सांडून जाते. मात्र ॲड्. बाबा कदम रंजनमूल्य स्वीकारूनही 'कोर्टरूमस्टोरीज'मधून किचकट कायद्याच्या सुलभ परिभाषेची परिमिती मराठी कादंबरीला प्रथमतःच देत आहेत. बाबांच्या कादंबरीत खून, त्याचे खटले आणि त्या अनुरोधाने प्रीतिभावनेची जुळणी प्रामुख्याने असूनही तीत प्रेमभावनेची मातकट-कळकट उकळणी नाही की विकृती नाही. तंत्रविंत्र न मानणारी, तोचतोपणाचा पायरव देणारी, शैलीत गोते खाणारी बाबांची कादंबरी, राजकीय व सामाजिक परिवर्तनाच्या पार्श्वभूमीवर चित्रकाराच्या हाताने आणि शिकाऱ्याच्या तीक्ष्ण नजरेने साचेबंद नसणाऱ्या व्यक्तिचित्रणातून गोष्टीची मौज देते. या गोष्टी ओठापोटातल्या ठेवण्याकडे बाबांचा कटाक्ष दिसतो. ॲड्. बाबा कदम महाराष्ट्राचे गुलशन नंदा आहेत. आनंद साधले यांची 'सय' आणि प्रा. लक्ष्मीकांत तांबोळी यांची 'कृष्णकमळ' या दोन कृती त्यामधील विषय, कल्पना व रचना इत्यादी दृष्टीने थोड्या वेगळ्या ठराव्यात अशा आहेत : 'सय' मध्ये सुरेन्द्र आणि बन्नी; भोग भोगून थकतात पण संबंधात मिंधेपण नाही की भग्नता नाही; उभयपक्षी मानव्य शोधण्याची–जीवनाचा अन्वयार्थ लावण्याची उत्कट धडपड दिसते. शेवटी आयुष्यात अंतिम काय असते ? अशाश्वत कवड्या-काडीपेक्षा मानवी संबंधाची जपणूक श्रेष्ठ असते. 'सय' मध्ये तसा तत्त्वज्ञानपर प्रयत्न आहे. 'महापुरुष' सारखी भट्टी जमलेली नसूनही काहीसा चिंतनशील खोलवर जाऊ पाहणारा स्पर्श मनात घर करून राहणारा आहे. प्रा. तांबोळींच्या 'कृष्णकमळ'मधील कमळी नियतीच्या फेऱ्यात अडकून पडली आहे. जन्म आणि मृत्यूच्या फेऱ्यात ही नियती माणसाला फेसाडून काढते. जीवनाची उद्ध्वस्त धर्मशाळा करते. जीवन गणितासारखे नाही, गणितात १+१=२ होतात. जीवनात किती होतील, कुणाची कशी भेट होईल, कुठे होईल, का होईल; काही सांगता येत नाही. कमळीची पिशाच्च वृत्तीच्या नवऱ्याशी गाठ पडावी, त्याच्या कवेत ती करकचून आवळली जावी, या गतिविधीचा अर्थ काय ? या अर्थाचा शोध 'कृष्णकमळ' मध्ये नसला तरी त्याचे भाजून काढणारे दर्शन आहे. शेणईंच्या 'गंधर्व' मध्येही ही नियती आढळते.

याहून काहीसा वेगळा, ग्रामीण परिसराचा वसा सांगणारा थरही कादंबरी लिहून राहिला आहे : शंकर खंडू पाटील, वि. द. माने, ल. गो. पंडितराव, महादेव मोरे, 'सत्यवादी'कार पद्मश्री बाळासाहेब पाटील अशा मंडळींचा उल्लेख करणे जरूर आहे. शंकर खंडू हे बहुप्रसव लेखक. प्राथमिक शिक्षक, पत्रकार व सामाजिक कार्यकर्ते या दृष्टीतून त्यांचा घडलेला पिंड–पक्के मुरलेले मन खेड्यापाड्यातील बदलाचे धावते चित्रांकन करते; कल्पकतेचा सीमित वापर करून आजचे खेडे, शक्य तितक्या वास्तवाच्या बंदिस्त चौकटीत उभे करण्याची धडपड करते. खेड्यापाड्यातील बेरकीपणात, चवचालपणात, साध्याभोळ्या, प्रतिष्ठा नसलेल्या 'जन्ते'चे काय हाल होतात, विशेषतः अबला स्त्रीची कोण ससेहोलपट होते, त्याचे चित्र श्री. पाटील सरळ भाबडेपणाने रेखाटतात. 'इशारा', 'कुलवती' ह्या तशाच कादंबऱ्या. त्यांत प्रेम आहे, तमाशा आहे पण प्रेमाचा बाजार नाही. सणाणणारी

वासना असली तरी तीत रग आहे. उगीच मरतमढ्यासारखा शृंगार नाही; ऐने महालातला प्रणय नाही. जनतेच्या अंगाने सारे मर्यादित आहे. महादेव मोरे यांच्या 'वळी'त रामू आणि रतन यांच्या प्रेमकहाणीला नारायण सुर्वे यांच्या 'हवे तर कर' या कवितेचे सूत्र आहे. या सूत्राचे 'वळी' हे दीर्घ प्रकरण आहे. 'वळी'च्या कथाबीजाने कादंबरीकाराला दोन एक वर्षे झपाटून टाकल्याचे श्री. मोरे यांचे निवेदन आहे. पण त्याचा क्वचित प्रत्यय यावा, हे अनिष्ट घडले आहे. श्री. माने यांच्या 'कलंक' मधील नायिका मंगल ही डॉ. कोळसे यांच्या वासनास्पर्शाने कलंकित होते. हे कटुसत्य बापू ह्या तिच्या सत्प्रवृत्त भावाला पचविणे शक्य नसते. तो आतून आतून खिरतो. त्याचे पिचणे; 'कलंक'मध्ये ओघ राखून माने यांनी टिपले आहे. 'पंछी पालनेका और बिकनेका धंदा' करणाऱ्या अम्मीची आणि तिच्या परिसराची कहाणी श्री. पंडितराव यांनी 'काळोखाच्या खुणा'मध्ये सहज प्रसन्नतेने सांगता येण्यायोग्य वाटणाऱ्या गोष्टींतून सांगितली आहे. या ओघात 'सत्यवादी'कार बाळासाहेब पाटील यांच्या प्रतिभेतील 'प्रेमप्रवाह' आणि 'सर्कसमोहिनी' या दोन कादंबऱ्या डोळ्यासमोर येतात. 'प्रतिभेतील प्रेमप्रवाह' पत्ररूपात असून हा घाट व्यक्तीच्या पूर्ण दर्शनाला, उत्कट आत्मनिवेदनाला खूपच अनुकूल ठरतो. 'सत्यवादी'कारांनी आत्मनिवेदनाची निवड करताना पत्रकाराची शोधक दृष्टी वापरली आहेच; खेरीज स्त्रीपुरुषामधल्या नैसर्गिक अनुरक्तीचे सुसंस्कृत चित्रणही चांगले झाले आहे. आशा आणि अरुणकुमार व आशाचा भाऊ अरविंद आणि अरुणची बहीण उषा यांच्यामधील नैसर्गिक ऊर्मींना 'प्रतिभेतील प्रेमप्रवाह' कादंबरीत चांगला वाव मिळतो. केवळ प्रीतिभावना, कामवासना किंवा विषयवासना हा 'प्रेमप्रवाह' चा आधार नाही तर कादंबरीकर्त्यांच्या मनातील समग्र सामाजिक चिंतनालाच विशेष महत्त्व आहे. ते उभे झाले आहे. परदेशी हेरगिरीवर प्रकाश टाकणारी 'सर्कसमोहिनी' ही 'सत्यवादी'-कारांची आणखी एक कादंबरी. त्यासाठी सर्कशीच्या पार्श्वभूमीचा कादंबरीकाराने बेमालूम चातुर्याने उपयोग करून घेतला आहे. त्यात शेखर आणि रेखा यांच्या प्रेमाची मनोज्ञ गुंफण असली तरी ते प्रमुख नाही. परदेशी हेर देशात किती भयानक कारस्थाने करीत असतात, कोण हाहाकार उडवीत असतात याचे साग्र व सार्थ चित्रण 'सर्कसमोहिनी'त आढळते. वस्तुतः दररोज अरबटचरबट विषयावर सतत लिहावे लागत असल्याने बव्हंशी लेखणी बोथट होऊन जाणाऱ्या वृत्तपत्रकाराजवळ मुलायम शैली असण्याचा योग तसा दुर्मिळच, पण सत्यवादीकारांनी आपल्या कादंबऱ्यांत हा मुलायमपणा राखला आहे. लोकशिक्षणाच्या अंगाने रंजकतेच्या झालरीचा उपयोग अशी कादंबरीकर्त्यांची दृष्टी आहे.

या साऱ्यावरून एक बाब नजरेस येते ती ही की खालच्या पट्ट्यातील ही मंडळी विषयांच्या आवर्तात उभी नाहीत, नवनवीन विषय हाताळताना दिसतात. प्रीतिभावनेच्या दर्शनाच्या नावाखाली लैंगिकतेचा अत्याचार ती करीत नाहीत. वर्णन-चित्रणात सच्चेपणा, संयम आहे, भडकपणा किंवा आक्रोश नाही. नागरी मंडळीप्रमाणे 'लाक्षागृहाचे खेळ' चालत नाहीत असे नाही, पण अजून मर्यादा पाळल्या जातात असे दिसते. भाषेबाबत

काहींची कुचंबणा होते असे आढळते; पण विशेष अधिक असे की ह्यांना प्रेमा/सेक्सबरोबर जीवनात इतरही काही प्रश्न आहेत ह्याची जाणीव आहे. फडक्यांच्या पायांसारखी ती उपटसुंभ नाहीत; मिळवितात काय ? कुठून ? कसे ? खातात काय ? कसे ? असा प्रश्न पडत नाही; ती 'पॉझिटिव्ह' असतात, न्यूट्रल नसतात. कथा थेट व साधी असली, प्रसंग ढोबळपणे रेखाटण्याची रूढ रीत दिसली तरी जीवनाच्या दृष्टीने स्वरूप ठार अंधळे नाही.

एकूण पाहता, आतापर्यंतच्या कादंबरीचे सर्वसाधारण स्वरूप 'माणूस' बाजूस राखून प्रेम रानोमाळ सैरावैरा वणवणत असल्याचे आहे. विषय, शैली, रचना, पार्श्वभूमी इत्यादींचे प्रयोग सुरू आहेत, पण नकली जगातील नखरेही काही कमी नाहीत. योगायोग, तकलादू संघर्ष, भडक नाट्य, असंभाव्य घटनांची उतरंड, विवाहित-अविवाहित स्त्रीपुरुषांचा संबंध, बालपणीचे संस्कारशील ग्रामजीवन, व्यापारी उपजीविकेचा दृष्टिकोण, कथानकाची आकर्षक मांडणी करण्याचे तंत्र अशा नखऱ्यात तिचा वास आहे : त्यामुळे जीवनातील चैतन्यशाली सत्याचा वेध घेणाऱ्या कृतीच्या दृष्टीने अपेक्षाभंग आहे. लैंगिक ओव्यांचे दळण सुंदर आहे; पण समाधान नाही. John Bayley ने म्हटले आहे, "Love is the potentiality of men and women which keeps them most interested in each other." पण इथे तर 'झट मंगनी पट ब्याह' रीत आहे : तीत जीवनानुभव डचमळतो आहे, त्यास कलात्मक घाट देण्याची कुवत हरते आहे. रंजन-मूल्यांना प्राधान्य देणारे साहित्य सर्वकाळ प्राधान्याने लिहिले जाते हे खरेच; पण ते किती असावे. यालाही काही सीमा आहे. पण फार असू नये एवढे खरे ! अजूनही रंजनाचा वसा घेऊन आम्ही चाललो आहोत. त्याचा अर्थ साहित्य काही तरी सांगणारे–शिकविणारे-असले पाहिजे असा होत नाही तर त्याचा अर्थ हाही होतो की रंजन पण ते उच्च दर्जाचे हवे. ते नाही. अजून किती काळ, मोठ्या प्रमाणात केवळ भावनांचे रंजनच होत राहणार आहे ? हिंदी निर्मात्यांनी काढलेल्या बेंगरूळ लैंगिक बोलपटांप्रमाणे नुसता व्यापार होणार आहे ? याचा जाणीवपूर्वकतेने विचार होणे इष्टच होईल.

या बरोबरीने, या वर्षात पु. भा. भावे यांच्या 'दोन भिंती', ग. दि. माडगूळकरांचे 'उभे धागे : आडवे धागे', उद्धव शेळके यांचे 'असे हे, असे हे', ग. त्र्यं माडखोलकर यांची 'रेणुका' व 'जन्मदुर्दैवी', शंकरराव खरात यांची 'मी मुक्त ! मी मुक्त ! !' इत्यादी कादंबऱ्या आहेत. त्या त्या कादंबरीकारांच्या जन्मजात गुणदोषांनी त्या लपेटलेल्या आहेत, त्यांच्या पक्वतेने अधिकच सजलेल्या आहेत. रामभाऊ आणि जानकी यांच्या अतूट संबंधाची स्वतत्त्वप्रतिपादनार्थ एका हिंदू मनाने सांगितलेली 'दोन भिंती' ही चुटपुट लावणारी कहाणी आहे. शेवटी सारे जातात, जावेच लागते, पण जाताना मागे काही ठेवावे लागते. नुसते एकत्र राहून निघून जाण्यात इतिकर्तव्यता ती काय ? कुठे तरी मानवी संबंध जुळले–जमले पाहिजेत, चढलेवाढले पाहिजेत. या धाग्यांना रूप-नाद लाभला पाहिजे. त्याची 'दोन भिंती' ही कहाणी. उभे आडवे धागे घालून जीवनाचे सणंग विणू पाहणाऱ्या,

पण शेवटी ते विरत जाऊन हाती काहीच न उरणाऱ्या माणसाची दर्दभरी उदात्त कहाणी 'उभे धागे : आडवे धागे' मध्ये गदिमांनी उभी केली आहे. श्रीरंग दिनकर यांनी 'रूप-दर्शन' मध्ये श्रीधर पंडित आणि वासंती यांच्या प्रीतीच्या दाट गाथेत 'प्रेम हेच अमर सत्य' पासून 'गिरिकुहरातील एकान्त हाच अखेरचा मोक्ष' पर्यंत वृत्त्यंतराचा प्रवास दाखवला आहे. कलावंत नवऱ्याबरोबर चाललेल्या नायिकेच्या ओढगस्ती संसाराचे कथन 'असे हे असे हे' मध्ये शेळके यांनी केले आहे तर चौरस दृष्टीचे बहुश्रुत ग. त्र्यं. माडखोलकर पुराणकथांकडे वळून रेणुका व परशुराम या पुराणव्यक्तींच्या अंतरंगाचा नव्याने मागोवा घेत आहेत. मातृभावनेचे केवळ स्वरूप दाखविण्याचा हेतू ठेवून रेणुकेचे चित्रण करणारे माडखोलकर रेणुकेचा मातृरूपाचा ठरीव साचा मांडतात. संस्कृतप्रचुर भाषेच्या मोहात रेणुकेच्या मनातील व्यक्तिरेखा बंदिस्त करायला विसरतात; मात्र एकूणच जीवनाच्या जिव्हाळ्याने केलेल्या चिंतनातून स्फुरलेला विचारविलास लक्षणीय आहे : जन्म, त्याचा अन्वय-अर्थ, त्याचा भोग-क्षोभ, समाजांतर्गत त्याचे रूप-नाद, त्याचे ऋण-फेड इत्यादी संबंधाने भाऊसाहेबांचे चिंतन प्रगल्भ पक्वतेचा सुरेख विलास आहे. असेच चिंतन 'भेरीघोष की धर्मघोष' या तत्त्वचिंतक पु. य. देशपांडे यांच्या कादंबरीने दिले आहे. त्यांच्या 'आहुती'- इतकीच 'भेरीघोष की धर्मघोष' पचायला कठीण आहे. भाषेच्या दृष्टीने आडवळणी आहे. दुर्बोध वाटते. काही असले तरी या कादंबऱ्या स्थूलपणे 'अंतराळ', 'अकुलिना', 'धग', 'भंगलेले देऊळ', 'सदाफुल्ली' इत्यादी कादंबऱ्यांच्या खूप मागे आहेत, एवढे तीव्रतेने जाणवते. पूर्वऋण विशेषत्वाने आठवते.

या वर्षात लिहिली गेलेली चरित्रात्मक ऐतिहासिक कादंबरी ही लक्ष वळवून घेणारी आहे. रवींद्र भट यांनी 'इंद्रायणीकाठी' फिरवून आणले आहे. केशव केळकर यांनी 'मृत्युंजय आम्ही'ची अश्रुतपूर्व गाथा गायिली आहे. लोककवी मनमोहन यांनी 'बुद्धिसागर नाना फडणीस' उभे केले आहेत. वसंत वैद्यांनी 'उदी'मध्ये साईबाबांचे दर्शन घडविले आहे. इंदुमती केळकर व मालती दांडेकर यांनी अनुक्रमे 'रजिया' व 'जिद्द' लिहिली आहे. गो. नी. दां. ची 'झुंजार माची' व न. शे. पोहनेरकर यांची 'कैलासचा कलावंत' आहे.

या व तत्सम बहुतांशी कादंबऱ्यांमध्ये अंधारातून प्रकाशाकडे जाण्याची एक पाऊलवाट अशी धर्ती आहे. सारे कोसळते–ढासळते आहे, धर म्हणून कुठे नाही, आधार म्हणून कुणाचा नाही; अशा अवस्थेत 'भूतकाळ हा उतारा आहे,' अशा दृष्टीचा हा हेतुपुरस्सर कलाबाह्य प्रयत्न आहे. स्थूलरूपाने त्याचे रूप ते आहे. त्यात विभूतिपूजेतून समर्थनाची भूमिकाही आली आहे. चरित्रात्मक/ऐतिहासिक मराठी कादंबरी वाङ्मयविषयक निश्चित दृष्टीने बव्हंशी लिहिली जात नाही, ही स्पष्टता आहेच. खेरीज संबंधित व्यक्तीच्या चरित्राध्ययनातून त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा जाणवलेला ठसा प्रत्यक्षाला विरोधी न ठरेल अशा कळेने उभा करण्यापेक्षा चरित्रभूत व्यक्तीचे कालक्रमानुसार सलग आणि सुसंगत चरित्र सांगण्याकडेच कल अधिक आहे हेही दिसते. त्यात सुधारणेची चिन्हे नाहीत. कुठे पूज्यभाव जागृत करण्याच्या

उद्देशाने मूळ इतिहासाला विरोधी व्यक्ती उभ्या केल्या जातात, कुठे जाणीवपूर्वक विपर्यस्त दृष्टी–मूर्तिभंजनाची–स्वीकारुन स्वप्नरंजनात्मक इतिहास सिद्ध केला जातो, कुठे सनातन मूल्यांचा जयजयकार गर्जत राहतो, कुठे भोळ्या भाविकतेने ओवाळणीची दीपमाळ लागते : गेली सहा-सात वर्षे आडवाटेचे हे मार्गक्रमण सुरू आहे. 'इंद्रायणीकाठी' त भट यांनी ज्ञानेश्वरामधला मार्गदर्शक महामानव उकलून दाखविला आहे. केळकरांनी 'मृत्युंजय आम्ही'-मध्ये चापेकर बंधूंच्या अलौकिक साहसाचे शिल्प कोरले आहे. केळकरांच्या शैलीला वेढत असलेला साचेबंदपणा लक्षात येत राहूनही 'मृत्युंजय आम्ही'चा आटोप लक्षणीय आहे. प्रतिभाशाली मनमोहन कवींनी बुद्धिसागर नाना फडणीस यांचे लोकविलक्षण नेतृत्व सादर केले आहे, पण तीत अपेक्षेनुसार प्रतिभा आणि कवी भेटत नाही, निराशा होते. मालती दांडेकर यांनी 'जिद्द' मध्ये उमाबाई दाभाडे या जिद्दी, महत्त्वाकांक्षी, शूर स्त्रीची वैभवाकांक्षा दाखविली आहे. गो. नी. दांनी 'कादंबरीमय शिवकाल' मालेत शिवचरित्राच्या पायठनीवर 'झुंजार माची'ची चौथी आसंवी कोरली आहे. नेहमीच्या मुलायम सराईतपणे, चरणस्पर्शपूर्वक ती बांधोन पुरी केली आहे. आपल्या भक्तिपूर्व अंतःकरणाने, पुराण शैलीने पोहनेरकर यांनी, प्रीतिकथेतून कैलास लेण्याच्या निर्मितीची कहाणी सांगितली आहे.

याचे काही सूर आहेत : इतिहास जाणतेपणाने न्याहाळणाऱ्याला त्यात विशेष रस राहत नाही, शुद्ध स्वप्नरंजनाचा तो खटाटोप वाटतो. स्वतःच्या मनाने सिद्ध केलेला इतिहास हा इतिहास, चरित्र, कादंबरी यांच्या अधेमधे घोटाळत राहतो; कलात्मक पातळीवर क्वचितच चढतो. ऐतिहासिक वास्तवाबद्दल निर्णय हे कादंबरीचे कार्य नव्हे. पण त्यातून निर्माण होणारे निर्मितीचे साध्य – ऐतिहासिक वास्तवाचे, एक सेंद्रिय संघटना बांधण्याचे – साधणे जरूर असते, पण ते न जमण्याकडे कल हे कशाचे लक्षण आहे? या मखरात ठेवलेल्या, सजविलेल्या बखरी का वाटतात? प्रतिभेची साख भरणाऱ्या पण चिंतनाचा स्पर्श नसणाऱ्या करमणुकीसाठी मधुर स्वप्ने रंगविणाऱ्या! त्यामागील कष्ट, भ्रमंती, परिश्रम, कागद-रुमाल यांच्या चिवडाचिवडीतील उरस्फोड मात्र जाणवते. 'मृत्युंजय आम्ही'तील 'पूर्वसूरीचे काही...' मध्ये कादंबरीकार केळकर लिहितात, "चरित्र कादंबऱ्यांचे एक नवे पर्व सांप्रत मराठी साहित्यात सुरू झालेले आहे. काही संकेत ठरत आहेत. चिकित्सक व टीकाकार काही दंडक घालू पाहत आहेत. ते संकेत आणि दंडक यांचे भान ठेवून आधारसाहित्य मिळविण्याचा प्रयत्न केला...शेवटी मी इतिहासकार नाही, कादंबरीचा लेखक आहे हीच माझी भूमिका आहे. काही तपशिलात मी फरक केला आहे, तसे क्रमात फेरफार केले आहेत. पण मुळातच जे आहे ते खुलून दिसावं म्हणून अशी सवलत घेण्याचा लेखकाचा अधिकार असतो, असं मी मानतो.' (पृ. ८१९) ही भूमिका शुभदायी यात शंका नाही; पण मुळातले सारेच उचकटून सर्वंकष अधिकार घेऊन उलट 'आम्ही म्हणतो ते खरं, तुम्ही कोण?' असा प्रश्न करतात त्यांच्याबद्दल चिकित्सक व टीकाकार यांचा आक्षेप रास्त

म्हटला पाहिजे. कारण त्यात चरित्र-इतिहासाचे आणि साहित्य दृष्टि-मूल्यांचे अनेक प्रश्न अंतर्भूत होतात.

याव्यतिरिक्त ह. मो. मराठे यांची ' काळेशार पाणी ' व ' निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी ', प्रा. केशव मेश्राम यांची ' हकीकत आणि जटायू ', श्री. ना. पेंडसे यांची ' ऑक्टोपस ' आणि प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांची ' बखर : एका राजाची ' अशा काही, कलात्मक कादंबऱ्या या वर्षात आहेत. मराठे अत्यंत अलुवार शैलीत आजच्या उद्‌ध्वस्त, भकास जीवनातील अपवादात्मक घटना-व्यक्तींचे चपखल चित्रण करताना ' काळेशार पाणी ' मध्ये भिकी अनेकांच्या वासनांना वळी पडून कशी लुतभरी होते हे दाखवितात तर ' निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी ' त वैफल्यग्रस्त तरुणाचे भेदक चित्र उभे करतात. जगायचे आहे पण सरळ मार्गाने जगता येत नाही, मरायचे आहे पण मरणे हा गुन्हा होतो; मात्र भ्रष्टाचार-विकृतींना मिजाशीने स्वाबात जगता येते; त्यांना शिक्षा-दंड नाही. तरीही या देशात स्वातंत्र्य आले आहे, असे घसा खरवडून सांगितले जाते. ' स्वातंत्र्य ? कुठे स्वातंत्र्य ? ' असा क्षणोक्षणी प्रश्न पडतो. पैसा, जागा, घर व नोकरी हे व्यावहारिक प्रश्न सारखे ' आ '. वासून उभे असतात; माणसाचे अंतर्बाह्य जीवन व्यापून टाकतात. त्यांचे मिळणे न मिळणे, सुटणे–झटणे जीवनाच्या अर्थशून्यतेचा प्रत्यय देतात. ' निष्पर्ण ' मध्ये ही अर्थगर्भ अस्वस्थ शून्यता मांडण्याचा प्रयत्न आहे. ' निष्पर्ण ' मध्ये प्रवाहीपण असूनही रुक्षपणा जाणवत असला तरी, आजकालच्या जीवनातील पानफुटीप्रमाणे सारखी वाढत जाणारी वखवख अत्यंत टप्पोऱ्या प्रत्ययकारितेने मुद्रित झाली आहे. इथे वेगडी काहीच नाही, भेटते ते झोंबणारे, चरचरणारे भगभगीतपण ! तरीही कामकथांचे गलिच्छ मळे पिकविण्यात मागे नसणारे, पूर्वकर्तुकीवर उठवळ लेखनाचा घाणा घालणारे फडके ह. मो. मराठ्यांना ' बोरूबहादूर ' म्हणतात, ( कटाक्ष : पृ. १९ ) हे सौंदर्यदर्शनाच्या नावाखाली, अनाचारासाठी तडफडणाऱ्या फडक्यांच्या पूर्वलौकिकास खचित साजेसे आहे. प्रा. मेश्राम यांच्या ' हकीकत आणि जटायू ' या तशा पाहिल्या तर दीर्घकथा आहेत. वृत्तपत्रीय वृत्तांताच्या अंगाने त्या मांडल्या आहेत. गावकुसाबाहेर जगणाऱ्या नायकाचे ' हकीकत'मध्ये तर ' जटायू 'मध्ये अभिमनचे अंतःकरण खोलून दाखविण्याचा चांगला प्रयत्न मेश्राम यांनी केला आहे. मात्र गावकुसाच्या वातावरणाची सखोलता वेधक असली तरी त्यामधील नागरी छटा लपत नाहीत; भाषेचा बाज थंडा वाटत असताना डॉ. सदा कऱ्हाडे यांच्या ' एका स्पृश्याची डायरी ' मात्र अधूनमधून आठवत राहते. पेंडशांची ' ऑक्टोपस ' मात्र एकदम निराळ्या विश्वाचा भास करून देते. पेंडसे यांची ही नववी कादंबरी. ' ऑक्टोपस ' हे कामगंडाचे प्रतीक म्हणून आले आहे : ऑक्टोपसच्या नांग्या प्राणघातक, वेढून टाकणाऱ्या, मृत्यूला जवळ करणाऱ्या. वासनेत लडबडलेल्या माणसाची गतीही तीच. लैंगिक शक्ती मानवी जीवनाला उभविते आणि उद्‌ध्वस्तही करते. लैंगिक वासनेच्या अनेक नांग्या असलेला ' हा ऑक्टोपस ' कादंबरीतल्या बहुतेक व्यक्तींना, कोकणातल्या देवचारासारखा

झपाटून राहतो. मिनी मोडक, लालजी, मंजू, भाऊमामा—कुणी म्हणून सुटत नाहीत. सुटतात इंदू, चारू पंडित व तिचा नवरा. या लिंगपिसाट व्यक्तिमत्त्वाचे शब्दांकन पत्रे, टेलिफोनवरील संवाद, निवेदनातील उल्लेखनीय ताटस्थ्य, संवादकौशल्यातील वारकावे अशा विविध रीतींनी होत जाते; सतत सहा वर्षे डोक्यात घोळत असलेली ' ऑक्टोपस ' घडत जाते.

मिनी मोडकच्या माध्यमातून ' सेक्स ' च्या सर्वंकष स्वरूपाची—' ऑक्टोपस ' स्वरूपाची— ' ऑक्टोपस ' ही मध्यमवर्गीय कथा आहे. तीत कोंदट शहरातील सुकलेल्या मध्यमवर्गीय कुटुंबातील निर्माल्य चैतन्यपूर्ण करण्यात पेंडशांना चांगले यश लाभले असले तरी कादंबरी आणि नाटक यामध्ये ती कुठे तरी सारखी हिंदकळताना दिसते. कादंबरीकाराला संवाद स्वच्छ ' ऐकू ' येत होते तरी ललितकृतीचा स्वच्छ फॉर्म आकळत नव्हता, असे वाटते; त्यामुळे कादंबरी काहीशी रहस्यकथेच्या पातळीवर विहरत ( लालजी—चतुरलाल रहस्य ) स्वाभाविक शेवटात परिणत होते. ' ऑक्टोपस ' च्या निमित्ताने प्रादेशिकतेच्या रिंगणामधून बाहेर पडून विषयालाच—कामगंडालाच—नायक करणारे पेंडसे ' प्रवळ ' प्रक्षोभक अनुभवविश्वाशी रसिकाला संवादी ठेवू शकत नाहीत, हे खोटे नाही. काहीशी वासनाविषयावर लिहिलेली सरदेशमुख यांची ' बखर : एका राजाची ' ही कादंबरी आहे एका लहानशा संस्थानिक राजाची : तो अठ्ठावीस वर्षे वयाचा एक शूर, सुशिक्षित, सुसंस्कृत व कलाप्रेमी राजा आहे. त्याचे नाव रघुवीरसिंग. संस्थान साईखेडे. त्याचा महत्त्वाचा जाणवणारा गुणविशेष म्हणजे त्याचा मनस्वी स्वभाव. इतरांशी तो प्रामाणिक आहेच, पण स्वतःशीही तो कधी प्रतारणा करीत नाही. रोजनिशी लिहिणारा माणूस हा स्वतःच, स्वतःच्या गुणदोषांचे प्रथम मूल्यमापन करतो. त्यानुसार तो स्वतःला दोष देतो किंवा गौरव करतो. रघुवीरसिंग बऱ्याच वेळा आत्मनिंदा करताना आढळतो. सरदार-मानकऱ्यांमधील वैमनस्यामुळे वाड्यातील वातावरण दूषित झाले आहे. वली-साहेब, रंगनाथ सोनार, देसाई या पाठिराख्यांचे संरक्षण करता येत नाही, इत्यादी गोष्टीं-बद्दल रघुवीरसिंग स्वतःला कोचत राहतो. या किंवा अशा गोष्टींबद्दल काही करता येत नाही याची राजाच्या मनात जळजळती खंत आहे. आत्मकथनात्मक निवेदनाच्या तंत्राच्या अव-लंबनाने या सर्व गोष्टींचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष तो समर्थन करता करता आपल्याविषयी हौतात्म्याची भावनाही निर्माण करतो. पत्नी दमयंती आणि तिचा प्रभावी गट या ताकदवान फळीपुढे आपण हतबुद्ध आहोत ही गोष्ट, राजा रघुवीरसिंग आपल्या प्रगल्भ, सुसंस्कृत व शालीन वृत्तीमागे लपविण्याचा प्रयत्न करतो. किशोरवयात कुठल्या शिर्क्यांच्या मुलीला काहीशा जब-रीने आलिंगून चुंबन घेतल्याची आठवण देऊन ' तू नात जिची गे पणतू होऊन तुला ' अशी लीनतेची वृत्ती दाखवितो. आपले संस्थान जाणार, राहणार नाही; आपण इतिहास-जमा होणार, आपले मग काय उरणार अशा धास्तीचे भविष्यही पाहतो. यामागे राजाचा आत्मकेंद्रित, एकठायी व आत्मनिष्ठ स्वभाव आहे.

त्यात भर पडली आहे रघुवीरसिंगाच्या निपुत्रिकतेची. राजाचा विवाह अठराव्या वर्षी

झालेला आहे. दमयंती ही त्याची पत्नी. ती अशिक्षित आणि काहीशी स्थूलतेकडे झुकलेली असे सूचित केले आहे. निपुत्रिक असल्याची तिची खंत स्वाभाविक आहे आणि तत्कालीन समाज व त्याची पार्श्वभूमी ध्यानात घेता पुत्रप्राप्तीसाठी ती ज्या अशास्त्रीय गोष्टींचा अवलंब करते (उदा. पूजाअर्चा, देवदेवर्षी, जादूटोणा, उपासतापास इत्यादी) त्या अस्वाभाविक ठरत नाहीत. 'वखर'मधील 'अर्धे विछाना द्दये' तिच्या पतिनिष्ठेची उदाहरणे म्हणून दाखविता येतील. पण मनस्वी रघुवीरसिंगाला त्याची दाद नाही. आपल्या वीर्यपरीक्षेत शुक्रजंतू सापडल्याने आपण निर्दोष आहोत अशा पौरुषाच्या गर्वात त्याचा तो तपशीलही देतो, उलट दमयंतीच्या 'गर्भाची ठेवण अशी विचित्र' वगैरे मोघम शब्दांत तिच्या दोषांवर तो बोट ठेवतो. निपुत्रिकतेचा दोष सर्वस्वी दमयंतीचा असे तो भासवितो. हा male chauvinism हाच 'वखर'चा गाभा आहे. दमयंतीवर अन्याय करून कादंबरीकाराने सांकेतिकतेने तो फुलविला आहे.

सरदेशमुखामधील तर्ककर्कश समीक्षक 'वखर'मधील शैलीत ताठरपणे आल्यामुळे 'वखर'चा ओघ काही जागी खंडित झाला असला तरी लैंगिक संबंध, जातिविषयक चर्चा व शोकांतिकतेचा नायक या दृष्टीतून रघुवीरसिंगाची बैठक या पैलूमुळे 'वखर'ला वेगळेपण लाभले आहे. मात्र रघुवीरसिंगाची आत्महत्या समर्थनीय नाही. त्याच्या मृत्यूने त्याची व्यक्तिरेखा विशेष उदात्त होत नाही. ती वांझ ठरते आणि केवळ कोरडी खंत वाटते. हळहळ वाटत नाही, कलास्वाद घेण्यास-देण्यास त्याचे मरण सार्थकी लागत नाही. (जे हॅम्लेटबद्दल वाटते.) त्यातून घट्ट घातलेली एक शोकात्मिका सांडून जाते.

एकूण 'वखर : एका राजाची', 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी', 'हकीकत आणि जटायू', 'राजधानी', 'जन्मदुदैंवी', 'ऑक्टोपस', 'सय', 'प्रतिभेतील प्रेमप्रवाह' अशा काही कादंबऱ्या बहात्तरच्या वैशिष्ट्यपूर्ण कलाकृती म्हणता येतील. मात्र सर्वसाधारणपणे मराठी कादंबरीकारांच्या, चिंतनशीलतेला बाजूला ठेवून हलक्याफुलक्या प्रकृतीने उभ्या केलेल्या रंजनप्रधान प्रवृत्तीमुळे इच्छापूर्तीचे खेळ चांगले रंगतात. विशिष्ट 'पोजेस' स्वीकारून काहीतरी विशेष रंगविल्याची नाटके चांगली सादर होतात. पण कुतूहलक्षेत्र वाढवीत असलेली, विविधप्रकारची सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक पार्श्वभूमी लाभत असलेली मराठी कादंबरी, या वातावरणामुळे 'समर्थ कादंबरीकाराच्या शक्यता अंगी असलेल्या' कलावंतांचे वळीही घेते असे दिसते; कलात्मक प्रबोधनाची वाट अडवून धरते. मग प्रश्न असा पडतो की या महाराष्ट्रदेशीच केवळ मराठी कादंबरी किती काळ मिरवीत राहणार आहे ?

# १९७२ मधील नाटक—समालोचन

डॉ. वि. भा. देशपांडे

साहित्यक्षेत्रात प्रतिवर्षी विपुल निर्मिती होत असते. काळाच्या आणि कलेच्या निकषांवर त्यातले फारच अल्प शिल्लक राहते. नाट्यलेखन त्याला अपवाद नाही. अन्य ललित-साहित्य-प्रकारांपेक्षा नाट्यलेखनाची गोष्ट वेगळी आहे. केवळ लेखनाने ती प्रक्रिया पूर्ण होत नाही. तर रसिकांपर्यंत ती कलाकृती पोचावी लागते. रसिक प्रेक्षकांच्या आस्वादात नाटकाचे परिणत रूप सापडते. असे जरी असले तरी नाट्यलेखनाचा वेध घेताना तो नाटककाराच्या प्रतिभारूपातच घ्यावा लागतो. तिथेच नाटकाचे एक शुद्ध रूप मिळण्याची शक्यता असते. मग त्या नाटकाला प्रयोगरूप लाभलेले असो वा नसो. त्याचे साहित्यरूप लक्ष्यवेधी ठरते.

१९७२ मध्ये नेहमीप्रमाणेच विविध प्रकारची, विविध विषयांवरची नाट्यनिर्मिती झाली. संख्येने बोलावयाचे तर नव्वद-शंभराच्या घरात ती आहे. पण ज्याचा लेखन म्हणून किंवा साहित्यरूप विचार करावा अशी संख्या अर्थातच अल्प आहे. हे वर्ष नाट्यलेखनाच्या ( आणि प्रयोगाच्याही ) दृष्टीने नाट्यवाङ्मयाच्या इतिहासात महत्त्वाचे ठरणारे आहे. कारण वादग्रस्त आणि वादळग्रस्त असे ' सखाराम बाइंडर ' याच वर्षात प्रकाशित झाले. विवाहाची, संसाराची, स्त्रीविषयक दृष्टिकोणाची, पर्यायाने एकूणच जीवनाची स्वतःची भूमिका – दिशा असणारा सखाराम विजय तेंडुलकरांनी नाट्यांकित केला. लक्ष्मी आणि चंपा या त्याच्या आयुष्यात आलेल्या अनेक स्त्रियांपैकी दोघीजणी. बाह्यतः दोघींची रूपे भिन्न. पण त्या भिन्न रूपाविष्कारातही सखारामाशी त्यांचे असलेले नाते हे एक महत्त्वाचे अंतःसूत्र. अधिक काळजीपूर्वक पाहिले तर लक्षात येते, की चंपा आणि लक्ष्मी या स्वतंत्र-स्वयंभू व्यक्तिरेखा नसून, त्या सखारामाच्या व्यक्तित्वाचा आविष्कार आहेत. त्या दोघींच्या सहवासात प्रतिक्रियात्मक व्यक्त होणारे सखारामाचे भावनिक वैचारिक दर्शन आणि या रसायनातून निर्माण झालेले नाट्य विशेष मोलाचे आहे. विषय, आशय आणि भाषा या दृष्टीने हे नाटक मराठी मनाला धक्कास्पद वाटले. सांस्कृतिक व्यासपीठावरून नैतिकतेचा घोष करून या नाटकाबद्दल वादंग निर्माण करण्यात आले. या नाटकाने विवाहसंस्था धोक्यात येईल असेही म्हटले

गेले. तसे काही झाले नाही, तसे कधी होतही नसते हे निराळे सांगण्याची गरज नाही. जर विवाहसंस्था धोक्यात यायची असेल तर ( आणि ती धोक्यात आली असेल तर ) ती एखाद्या ' सखाराम 'ने येणार नाही. खरोखरीच तसे घडणार असेल तर निदान तेंडुलकरांच्या प्रतिभेचे मोठेपण मान्य करावयास हवे ! जेव्हा एखादा प्रतिभावंत केवळ वास्तवाला नव्हे तर त्यातील प्रखर सत्याचा शोध घेत घेत काही व्यक्त करू पाहतो तेव्हा त्या सत्याच्या प्रखरतेमुळे, दाहकतेमुळे परंपरेने किंवा मळलेल्या वाटेने जाणाऱ्या वाचकाला – प्रेक्षकाला चकावल्यासारखे होते. तेंडुलकरांनी केवळ असे धक्कातंत्र वापरलेले नाही. पण त्याचबरोबर चंपा आणि लक्ष्मी या प्रत्येकीसाठी एकेका अंकाची केलेली विभागणी, तसेच शेवटचा प्रेत पुरण्यासाठी खड्डा खणण्याचा प्रसंग रचनादृष्ट्या आणि परिणामदृष्ट्या कृत्रिम वाटतात. या नाटकाच्या विषयाबद्दल, नाट्याशयाबद्दल जसे अनेकांनी आक्षेप घेतले तसेच भाषेबद्दलही घेतले. पण ' सखाराम 'ची एकूणच भाषा नाट्याशयाला अनुकूल अशी आहे. खोटी नाही. ती भाषा खोटी नाही म्हणूनच अश्लील – असभ्य नाही. ती त्या त्या व्यक्तिरेखांची भाषा आहे, तेंडुलकरांची नाही.

' सखाराम ' इतके जरी नाही तरी काही प्रमाणात या वर्षात चर्चेत झालेले दुसरे नाटक म्हणजे चिं. त्र्यं. खानोलकरांचे ' अवध्य '. रचनादृष्ट्या विचार केला तर हे नाटक नसून एक भले मोठे स्वगत आहे. मोनोलॉग आहे. एका प्रतिभावान लेखकाच्या व्यक्तित्वाची दोन रूपे यात आहेत. त्याच्या मनातील अनेक वादळे आहेत. त्याच्या जीवनातील सत्–असत् यांचे अपूर्व मिश्रण यात आहे. झरोक्यातून पाहण्याच्या विकृत मनोवृत्तीचे दर्शन यात आहे. तांडव नृत्याप्रमाणे थयथयाट करणारा प्रणय-शृंगार आहे. ( प्रत्यक्ष दाखवताना तसा तो रंगमंचावर दाखवला गेला नाही, हा भाग निराळा. ) तोच या नाटकाचा वादग्रस्त विषय ठरला. त्यातून पुन्हा अनेक प्रश्न निर्माण झाले. खानोलकरांचे आणखी एक नाटक या वर्षात आले ते म्हणजे ' कालाय तस्मै नमः '. एका ज्योतिष्याच्या जीवनाची जीवघेणी अशी आगळी कथावस्तू नाटकात आहे. आपल्याच मुलाचे भीषण भविष्य सांगण्याचा आणि ते खरे घडते की नाही हे पाहण्याचा विलक्षण योग त्या ज्योतिष्यावर येतो. त्यातून निर्माण होणारे–घडणारे नाटक खानोलकरांनी आविष्कृत केले आहे. कथावस्तूतील आगळेपण मान्य होऊनही रचनेच्या आणि परिणामाच्या दृष्टीने हे नाटक अखेरपर्यंत समाधान देऊ शकत नाही. ' अवध्य ' किंवा ' कालाय ' ही दोन्ही नाटके वाचल्यावर असे वाटले, की खानोलकर एखाद्या नाट्यविषयाने, कल्पनेने झपाटतात, त्यातील नाट्यबीजाचा विस्तार आणि विकास करताना त्याच्यावरचे व रचनेचे प्रभुत्व गमावून बसतात. कारण अनेक तर्कविसंगत कल्पना नाटकात आणल्या जातात. मूळ नाट्यविषय, कथावस्तू वेगळ्याच दिशेने प्रवास करू लागते. नाटककार मूळ बिंदूपासून खूपच अकारण दूर गेल्याचे जाणवते. मग फक्त खाली उरतात ते आरती प्रभूंचे काव्यमय शब्द, प्रतिमा वगैरे !

वसंत कानेटकरांचे ' हिमालयाची सावली ' हे वेगळ्या प्रकृतीचे नाटक. नाटककार कितीही

अनुक्रमणिका

नाकारत असले तरी हे नाटक बव्हंशी अण्णासाहेब कर्वे यांच्या जीवनचरित्राधारेच लिहिले गेले आहे. त्यामध्ये काही ठिकाणी काल्पनिक प्रसंगांचा आधार जरी असला तरी चरित्राचे मूळ मात्र लपले जात नाही. वाचकाने किंवा प्रेक्षकाने मूळ जीवनचरित्राशी नाट्यगत व्यक्तिरेखेची तुलना करून घेऊन त्याच्या नाट्यास्वादात मर्यादा पडू नयेत असे कदाचित कानेटकरांना वाटले असेल. किंवा तुलना करून येणाऱ्या निष्कर्षाशी सामना द्यायला लागू नये, म्हणूनही त्यांनी सुटका करून घेतली असेल! त्यासाठी व्यक्तिरेखांची नावे ठेवताना ती काळजी त्यांनी घेतली आहे. पण तो काळ, वातावरण, भाषा, त्यातील जुने तपशील, नाट्याशय व्यक्त करण्यास समर्थ आहेत. कानेटकर प्रस्तावनेत म्हणतात.– " एकोणिसावे शतक विसाव्या शतकाशी भिडले, त्या संधिकाळातील काही जबरदस्त माणसे त्यांच्या जीवनप्रेरणा आणि त्यांच्या काळाने त्यांच्या पुढे टाकलेली काही आव्हाने यांचे चित्रण करण्याचा एक नम्र प्रयत्न आहे. " यावरून सहज लक्षात येते, की विशिष्ट व्यक्तीच्या जीवनचरित्राचा आधार नाकारून त्या काळाचे, माणसांचे, आव्हानांचे रूप मान्य केलेले आहे. ते व्यक्त करण्यात कानेटकर निःसंशय यशस्वी झालेले आहेत. गुंडोपंत आणि बयो या महत्त्वपूर्ण व्यक्तिरेखांची निर्मिती ही अवघड गोष्ट होती. कारण कर्व्यांच्या जीवनात तसे नाट्यपूर्ण प्रसंग फारच अल्प–जवळ जवळ नाहीतच. जे काही आहेत त्यांमधील नाट्यही अल्पजीवी स्वरूपाचे. त्यामुळे अशा व्यक्तिरेखांची निर्मिती करताना ती कृत्रिम न वाटता सहजस्वभावी होणे महत्त्वाचे होते. ते कानेटकरांनी साधले. या नाटकाचा आणखी एक लक्षणीय विशेष म्हणजे अकृत्रिम संवादभाषा. कानेटकरांच्या अलीकडच्या सामाजिक नाटकांतील ( मला काही सांगायचंय, अश्रूंची झाली फुले वगैरे ) संवादभाषा सालंकृत आहे. त्या भाषेला शब्दांचा सोस आहे. सुभाषितवजा वाक्यांची हौस आहे. या लेखनदोषापासून हे नाटक अलिप्त आहे. या नाटकाला लाभलेले सहज पण अस्सल रूप चरित्रात्मक नाटकामध्ये लक्षात घेण्याजोगे आहे. याच वर्षात आणखी काही चरित्रवजा नाटके लिहिली गेली. ‘ तुका म्हणे जाऊ वैकुंठाला ’ हे वि. स. पागे यांचे, ‘ लावणी भुलली अभंगाला ’ हे जगदीश दळवी यांचे, ‘ गीता गाती ज्ञानेश्वर ’ हे शिरगोपीकरांचे. ही तिन्ही नाटके रचनादृष्ट्या सामान्य आहेत. विशिष्ट व्यक्तीच्या जीवनातील काही प्रसंग एकत्र करून केलेली रचना एवढेच या नाटकांचे स्वरूप आहे. प्रसंगामागून प्रसंगांची मांडणी झालेली आहे. त्या प्रसंगामागचे नाट्य नाटककारांना समर्थपणे टिपता आले नाही, उभारता आले नाही.

‘ ही वाट दूर जाते ’, ‘ कल्पवृक्ष कन्येसाठी ’, ‘ अमृतवेल ’ ही कालेलकरांची काही कौटुंबिक विषयांवरची नाटके. ‘ अमृतवेल ’ हे वि. स. खांडेकरांच्या कादंबरीवरून केलेले आहे. मुळात खांडेकरांच्या अलंकारप्रचुर भाषेतून नाट्याशय व्यक्त करणे हे कालेलकरांन मर्यादित अर्थाने जमलेले आहे. नाट्यपरिणामाच्या दृष्टीने साधलेले आहे. ‘ कल्पवृक्ष कन्येसाठी ’ हे नाटक ‘ दिवा जळू दे सारी रात ’चा उत्तरार्ध आहे. कालेलकरांची नाट्यलेखनाची जातच मुळी विशिष्ट प्रेक्षक, विशिष्ट परिणाम नजरेसमोर ठेवून लिखाण करणारां-

पैकी असल्याने त्यांच्या नाटकांच्या साहित्यगुणांच्या मर्यादाही स्पष्ट होतात. सुरेश खरे यांचा ' एका घरात होती ' चा प्रयत्न वेगळा आहे. पांगळा झालेला नवरा, स्वतःच्या कर्तृत्वावर संसार करणारी स्त्री, तिच्यावर अवलंबून असलेले कुटुंब, कुटुंबाचा त्या स्त्रीकडे पाहण्याचा संशयित दृष्टिकोण आणि या सर्वांतून साकारलेली तिची मनोव्यथा नाट्यपूर्णपणे व्यक्त झालेली आहे.

नलिनी सुकथनकर यांचे ' पद्मश्री धुंडीराज ' हे केवळ स्त्रीपात्रांचे नाटक आहे आणि तरीही लेखनदृष्ट्या किमान चांगल्या दर्जाचे आहे. या नाटकात अनेक स्त्रियांशी संसार थाटणारा एक पुरुष आहे. पण एका स्त्रीला दुसरीचा पत्ता त्याने लागू दिला नाही, हे त्याचे कौशल्य. या नाटकात त्याची कथा आहे; पण तो प्रत्यक्ष मात्र नाही. त्यामुळे आवश्यक ते रहस्य नाटककर्त्रींने फार उत्तमरीतीने राखलेले आहे. हे रहस्य गमतीने–मनोरंजकतेने व्यक्तवले आहे. पुरुषाबद्दलची कथा असूनही प्रत्यक्ष तो नाटकात नसल्याची उणीवमात्र जाणवत नाही, हे लेखनाचे कसब जमून गेले आहे.

विनोदी, फार्सिकल नाटकांचे लेखनही या सालात झाले. ' तरुण तुर्क म्हातारे अर्क ' ( मधुकर तोरडमल ), ' म्हातारा न इतुका ' ( राजाराम हुमणे ), ' वित्री करी सलाम ' ( मनोहर काटदरे, ) ' बिऱ्हाड वाजलं ' ( रत्नाकर मतकरी ), ' नवऱ्याची धमाल बायकोची कमाल ' ( शरद केळकर ), ' असा नवरा नको ग बाई ' ( रवीन्द्र भट ), ' एक पपा, एक ममी ' ( श्याम फडके ), ' राजकारण गेलं चुलीत ' ( आत्माराम सावंत ) इ. विनोदी किंवा फार्सिकल नाटकांच्या लेखनाबद्दल मत व्यक्त करणे याला फारच मर्यादा पडतात. कारण त्या नाटकांचे खरे रूप प्रत्यक्ष प्रयोगातच ध्यानात येते. नाटकातले विनोद-सामर्थ्य तिथेच प्रकट होत असते. तरीही केवळ लेखनापुरते बोलायचे झाल्यास ' बिऱ्हाड वाजलं ' हे रत्नाकर मतकरींचे नाटक महत्त्वाचे आहे. तो ट्रॅजिक फार्स या सदरात मोडणारा प्रकार आहे. तो केवळ फार्स नाही, तर त्याला कारुण्याचे अस्तर आहे. मुंबईतील जीवनात राहण्यास जागा मिळताना येणारे विनोदी फार्सिकल अनुभव आणि त्यामागे दडलेले कारुण्य मतकरींनी नाट्यरूप केले आहे. ' तरुण तुर्क 'चा पहिला अंक आवश्यक तो परिणाम साधतो. पण पुढच्या दोन्ही अंकांत ' सिच्युएशन्स ' मधून विनोद निर्माण होण्यापेक्षा शाब्दिक कसरती अधिक झाल्याचे जाणवते. वरील इतर विनोदी-फार्सिकल स्वरूपाची नाटके लेखनाच्या दृष्टीने बेताचीच आहेत. याचबरोबर आणखी काही विनोदी नसलेल्या पण सामान्य नाटकांचा उल्लेख करणे योग्य होईल. ती नाटके म्हणजे गो. नी. दांडेकरांचे ' काका माणसात येतो ', प्र. के. अत्रे यांचे ' श्री शिव-समर्थ ', दत्ता केशवांचे ' कुंकू जपून ठेव ', हरिश्चन्द्र पाटील ' वारणेचा वाघ ', बाळ कोल्हटकर ' एखादी तरी स्मितरेषा ' ( ' वाहतो ही दुर्वांची जुडी 'चा उत्तरार्ध ) वगैरे.

या वर्षांत नाव घेण्याजोगे ऐतिहासिक नाटक लिहिले गेले नाही. पौराणिक स्वरूपाच्या नाटकात विद्याधर पुंडलिक यांचे ' माता द्रौपदी ' आणि वि. आ. खैरे यांचे ' एकलव्य ' !

खैरे यांनी नाटकाच्या प्रस्तावनेत एकलव्याची कथा वाचीत असता पवित्र-भीषण-नाट्य असल्याचा दावा केला आहे. मूळ कथेतील किंवा त्यातून निर्माण होणाऱ्या नाट्यकृतीत पावित्र्य कोणते आहे हे स्वतः नाटककारालाच ज्ञात असावेसे दिसते. एवढे मात्र निश्चित की एकलव्याच्या जीवनातील नाट्य नाटककाराला पुरेशा सामर्थ्यानिशी व्यक्त करता आले नाही. विद्याधर पुंडलिकांचे ' माता द्रौपदी ' हे केवळ याच वर्षापुरते नाही तर एकूणच मराठी नाट्यवाङ्मयाच्या इतिहासात लक्ष्यवेधी ठरणारे नाटक आहे. यापूर्वी महाभारतातील द्रौपदीवर मराठीमध्ये दोन प्रमुख नाटके लिहिली गेली. ती दोन्ही नाटके कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरांचीच आहेत. (१) सं. द्रौपदी, (२) कीचकवध. सं. द्रौपदीमधील द्रौपदी दास्यत्व झुगारून देऊन स्वातंत्र्याची घोषणा करणारी आहे. कीचकवधामधील द्रौपदी—( सैरंध्री ) अज्ञातवासातील छळ सोसणारी आणि अपरिहार्यतेने दुःख व्यक्त करणारी आहे. खाडिलकरांनी सैरंध्रीच्या अंतरंगाचे दर्शन घडवून व्यक्तिरेखेला सघन करण्याचा यत्न केला आहे, पण त्याहीपेक्षा अधिक विशाल स्वरूपाचे परिमाण ' माता द्रौपदी 'मध्ये द्रौपदी या व्यक्तिरेखेला लाभलेले आहे. महाभारतातील महायुद्धाच्या अखेरच्या पर्वाचा भाग नाटककाराने घेतलेला आहे. द्रौपदीचे पाची पुत्र युद्धात पराक्रम गाजवतात, त्याच रात्री अश्वत्थामा त्या पुत्रांचा वध करतो. एक प्रकारे सूड उगवतो. त्या सूडालाही एक परंपरा आहे. त्या सूडाच्या परंपरेतच पाचां पुत्र मारले गेले. द्रौपदी भयाण दुःखाने व्याकुळ झाली. तिच्या दुःखाला केन्द्रस्थानी ठेवूनच तिचे व्यक्तिचित्रण पुंडलिकांनी केलेले आहे. या नाटकात द्रौपदी पत्नी, माता, राणी म्हणून आहे. खरे सांगायचे तर ती एक माता—एक स्त्री—एक माणूस म्हणून अधिक आहे. तिथेच एक नवे परिमाण तिच्या व्यक्तिरेखेला लाभले. मानवी मनाला भोवंडून टाकणारी दुःखाची कल्पना आणि तिचा प्रखर अनुभव हे केन्द्रित ठेवून व्यक्तिरेखनाची यशस्वी वाटचाल मराठी पौराणिक नाटकाला तरी नवीन आहे. सखोल आशयातून छेद देणारी, अंतर्मुख करणारी अशी व्यक्तिरेखा कशी निर्माण होऊ शकते, याचा एक वस्तुपाठच पुंडलिकांनी निर्माण केला आहे. द्रौपदीच्या समतोलानेच अश्वत्थामा आणि भीम या व्यक्तिरेखा निर्माण झाल्या आहेत. नाट्याशय व्यक्त करण्यासाठी अनुकूल अशी विदग्ध, गांभीर्यपूर्ण, अर्थघन संवादभाषा या नाटकाला लाभलेली आहे. तरीही त्यात खटकणारी एक गोष्ट आहे, ती म्हणजे संवादभाषा. काही ठिकाणी ( द्रौपदी-भीम, द्रौपदी-अश्वत्थामा संवाद ) नाट्याशय व्यक्त करण्यापेक्षा बौद्धिक विलासात दंग आहे असे वाटते. स्वाभाविकच त्या संवादांचे नाट्यरूप जाऊन ग्रांथिक—वाङ्मयीन रूप जाणवते. ' चक्र ' ही एकांकिका या नाटकाचा मूलाधार असली तरी या नाटकाच्या आकृतिबंधाचे स्वयंरूप हरवलेले नाही. ' चक्र ' एकांकिकेला जितकी स्वयंपूर्णता, सघनता आहे तितकीच या तीन अंकी ' माता द्रौपदी ' नाटकाला आहे. एकांकिकेचा वाढावा असे नाटकाचे रूप निश्चितच नाही. ' माता द्रौपदी ' पौराणिक नाटक असूनही संगीताविना आहे. तर या वर्षात जे महत्त्वाचे संगीत नाटक ' स्वरसम्राज्ञी ' हे संगीत

असूनही पौराणिक कथानकावर आधारलेले नाही हे विशेष! विद्याधर गोखल्यांनी 'स्वरसम्राज्ञी'चा पसारा उभारला आहे तो 'माय फेअर लेडी'च्या आधारे! तमाशात नाचणाऱ्या, लावणी म्हणणाऱ्या एका मुलीला शास्त्रशुद्ध गाणे शिकवून त्यात कीर्ती मिळवण्याची खटपट करणारा संगीतज्ञ आहे. बर्नार्ड शॉच्या मूळ 'पिग्मॅलिन'वरून 'माय फेअर लेडी' संगीतमय झाले. गोखल्यांनी या नाटकाचा संगीताचा बरवरचा बाज घेऊन आधाराला कथा घेतली. नेहमीच्या पद्धतीच्या कथावस्तूत मन चाहेल तसे फेरफार केले. दुसऱ्या-तिसऱ्या अंकात म्युझिकल कॉन्फरन्स दाखवून मूळ कथावस्तूतील, नाट्याशयातील प्राणतत्त्वच गमावले आहे. पुढे ते नाटक विद्याधर गोखल्यांच्या नेहमीच्या नाटकासारखेच रचनेच्या दृष्टीने ढोबळ, उथळ झाले आहे.

७२ सालच्या नाट्यलेखनाचा हा धावता आढावा. यामध्ये या वर्षातील सर्वच नाटकांचा विचार नाही. जेवढी नाटके प्रत्यक्ष उपलब्ध झाली त्यांचाच विचार झाला आहे. त्यामुळे काही उणा अधिक उल्लेख राहून गेला असण्याची शक्यता आहे. यात एकांकिका-संग्रहांचा विचार नाही. एखाद्या वर्षातील नाट्यलेखनाच्या आधाराने एकूणच मराठी नाटकाबाबत निर्णयाप्रत येऊन निष्कर्ष काढणे गैर आहे. पण एवढे मात्र निश्चित, की 'सखाराम बाइंडर', 'अवध्य', 'माता द्रौपदी', 'हिमालयाची सावली' अशी काही नाटके बहात्तर सालाने नाट्यवाङ्मयाला आणि पर्यायाने रंगभूमीला दिली. 'सखाराम', 'अवध्य' यांनी काही सांस्कृतिक आणि मूलभूत नाट्यविषयक प्रश्न निर्माण केले. 'हिमालयाची सावली'ने कानेटकरांच्या लेखनाची वेगळी दिशा पकडली; तसेच चरित्रवजा नाटकांचा एक चांगला नाट्याविष्कार पाहावयास मिळाला. 'माता द्रौपदी'ने मराठी पौराणिक नाटकाचा नवा मानदंड तयार केला. वर्षातील शंभर नाटकांमध्ये एवढे जरी घडत असेल तरी वाईट नाही!



अनुक्रमणिका

# १९७२ मधील कविता

**गंगाधर पानतावणे**

१९७२ मध्ये प्रकाशित झालेले पंधरा कवितासंग्रह माझ्या हाताशी आहेत. यात काही मान्यवर आहेत तर काही पहिल्यांदाच या रूपाने एकत्र येत आहेत. तसे या वर्षी विपुल कविता-लेखन झाले आहे. काही प्रातिनिधिक कवितासंग्रहही आहेत. या सर्वांचाच परामर्श घेणे अशक्य आहे. म्हणून प्रकाशित कवितासंग्रहांचाच येथे विचार करावयाचा आहे.

खरे म्हणजे एखाद्या वर्षातील लेखन हे त्या वाङ्मयप्रकाराची निश्चित दिशा दाखविणारे ठरू शकत नाही. एवढे मात्र म्हणता येईल की, एखाद्या कवीचा त्या वर्षातील संग्रह म्हणजे त्याची अनेक वर्षांची कविता असते. त्यातून त्याच्या प्रकृती व प्रवृत्तीविषयी काही निष्कर्ष नोंदविणे फारसे अडचणीचे होत नाही. १९७२ मध्ये इंदिरा संत व पु. शि. रेगे यांचे 'वाहुल्या ' व ' प्रियाळ ' हे संग्रह प्रसिद्ध झाले आहेत, तसे वसंत आबाजी डहाके ( योगभ्रष्ट ), फ. मुं. शिंदे ( जुलूस ), नामदेव ढसाळ ( गोलपिठा ), नरेशकुमार इंगळे ( अंगारा ), चोखा कांबळे ( पिंपळपान ), सुरेश नगर्सेकर (जाग ), सौ. सुशीला मराठे ( क्षमस्व ), नीलकंठ मांदाडे ( पाण्यावरच्या रेषा ), सूर्यकांत तारी ( अर्ध क्षितिज ), वसंत पापळकर ( दरबार ), अशोक देव ( रुप्याची झालर ), सूर्यकांत वैद्य ( माझे जग ), आणि राम देशमुख ( उद्रेक ) यांचेही संग्रह प्रकाशित झाले आहेत. यांतील काही नावे वाचकांना अपरिचित अशी आहेत.

नीळकंठ मांदाडे यांचा ' पाण्यावरच्या रेषा ' हा पहिला कवितासंग्रह. पूर्वसूरींचा हात धरून हा कवी धडपडतो आहे. पण ही धडपड स्वतःचा तोल सावरू शकत नाही, इतका नवखेपणा त्यांच्या कवितेत आहे. कवी कधी निसर्गात रमतो तर कधी अध्यात्मात. कधी समाजातील अन्याय्य जुलमाविषयी चीड व्यक्त करतो तर कधी खेड्यातील जीवनाशी एकरूप होऊ पाहतो. पण हे सारे करीत असताना अलिप्तत्व राखणाऱ्या तोलाचे भाव न राखल्याने त्याच्या कवितेला एक प्रकारचे ' वर्ण्य ' स्वरूप आले आहे. काही ठिकाणी बोजडपणाही आला आहे; त्यामुळे वाचकांवर अर्थशोधाची आपोआपच जबाबदारी पडते.

बिनदिक्कत वरवर घरघरती
धुरकट भुरकट अंतरिक्ष क्रूर
चंद्रावरचा धांगडधिंगा
बघुनी थिजले पांडववीर

चंद्रावरचा धांगडधिंगा म्हणजे काय? हा धांगडधिंगा बघून पांडववीर तरी का थिजले? 'इरेस पडलो जर बचमजी 'चा मोह श्री. मांदाडे टाळू शकले तर ते नक्कीच काही चांगल्या कविता लिहू शकतील असे वाटते.

'रे सातपुड्या!' या निसर्गकवितेपासून तो 'पंढरीराया!' या अध्यात्माची चाहूल-लागलेल्या कवितेपर्यंत, विविध अनुभव व्यक्त करणारा राम देशमुखांचा 'उद्रेक' हा एक भावुक कवितासंग्रह आहे. पावित्र्याच्या, मांगल्याच्या, नीतीच्या कल्पना मनाशी जोपासून कवीने केलेला संवाद या कवितेत आहे. सश्रद्धता हा देशमुखांच्या कवितेचा विशेष होय. त्यांच्या श्रद्धा अनंतत्वाशी भिडतात तेव्हा 'तू माझा मुरारी। मी तुझी बासुरी। धरी मज करी। विहारी तू॥' अशी संतसदृश रचना ते लिहून जातात. मग त्यांचा जीव कधी स्वातीच्या थेंबासाठी आसावतो तर कधी स्वप्नताजात हरवून जातो. जगण्याची आसक्ती तर कवीला विलक्षण आहे. त्यातूनच जगण्याचा नवा अर्थ त्याला उमगतो. जीवनाचे सूर आळवितानाच त्याला 'माझे जगणे–एक रडगाणे' असेही वाटू लागते. आपल्या जीवनाचा निर्माता व 'कुस्कर्ता' एक अज्ञात शक्ती आहे या पारंपरिक श्रद्धेवर कवीची अढळ निष्ठा असल्याने, माणसाने विज्ञानाचा कितीही डांगोरा पिटला तरी माणूस त्या अज्ञातशक्तीपुढे क्षुद्र आहे–नगण्य आहे–असहाय्य आहे अशी तो धारणा बाळगतो. आणि म्हणूनच 'माणसा!–विज्ञानाच्या बारुणीवर पोसलेल्या कणसा!' अशी तो माणसाची संभावना करतो. माणूस परिस्थितीचा गुलाम आहे. पण हे दास्य झुगारण्यासाठी त्याने त्या 'महा-अस्तित्वाला' शरण गेले पाहिजे, त्याशिवाय अन्य गती नाही, त्याशिवाय त्याचे जीवन सफल होणे नाही असे कवीला वाटते. आपली श्रद्धामूल तृष्णा भागविण्यासाठी स्वतः कवीही —

अपराध मम काय जाहला?
सांगा सांगा नाथा मजला
जीव दर्शनावाचुनी हा
का पारखा जाहला?

अगतिक झालेल्या कविमनाची ही कैफियत आहे. 'उद्रेक' हा त्याचा परिपाक आहे.

सौ. शिरीष पै यांची प्रस्तावना लाभलेला सूर्यकांत तारी यांचा 'अर्धं क्षितिज' व डॉ. भालचंद्र फडके यांची प्रस्तावना असलेला सूर्यकांत वैद्य यांचा 'माझे जग' हे दोन्ही काव्यसंग्रह जीवनाविषयीचे कुतूहल जागवितात. या दोन्ही कवींची जीवनावर अपार श्रद्धा

आहे. जीवनातील प्रेमभावनेकडे पाहताना, त्यात विरून जाण्याची सहजप्रवृत्ती श्री. तारी यांना टाळता येत नाही. श्री. वैद्य ज्या मध्यमवर्गीय जीवनाची वेदना जगतात ती अत्यंत कडवट रूप घेऊन व्यक्त होते. मध्यमवर्गीय जीवनाच्या विवंचना मनाला ग्रासतात तेव्हा व्यर्थत्व किंवा उगीचपण त्यांच्या मनाला विद्ध करते. हे जीवन इतके मर्यादेत असते की, त्यातून निर्माण होणाऱ्या दुःखालाही स्वाभाविकपणे मर्यादा पडतात. या मर्यादेनेच समन्वयाचे सामंजस्य प्रदान केलेले असते. मध्यमवर्गीय जीवनाची ही शोकांतिका आहे. श्री. वैद्य यांनी ती अचूकपणे पकडलेली आहे. तारींच्या अनुभवविश्वालाही एक मर्यादा आहे. मग तो अनुभव प्रेमाच्या गडदतेचा असो, की निसर्गातील सौंदर्य टिपण्याचा असो. हलकेफुलके भावतरंग जेव्हा कविताविषय होतात तेव्हा धूसरताच अधिक जाणवते. ओळखीचे सूर पुनःपुन्हा आळवावेत असे काहीसे 'अर्धक्षितिज'मध्ये होते.

अशोक देवांचा 'रुप्याची झालर' हा पहिलाच कवितासंग्रह नसला तरी कवितेचा घाट, मांडणी व विषय यांत नावीन्य नाही. आशयाच्या व रचनेच्या संदर्भातही 'रुप्याची झालर' फारशी लक्षात राहण्यासारखी नाही.

अलीकडे विडंबनात्मक लेखन एकूण कमीच. झेंडूच्या फुलांचा तोरा आता पुन्हा मराठी कवितेत मिरवला जाणार की नाही, इतकी शंका यावी, असे विडंबनात्मक लेखन. नाही म्हणायला सौ. सुशीला मराठे यांचा 'क्षमस्व' या वर्षी प्रकाशित झाला. विडंबन हे नेहमीच हेतुपुरस्सर असते. 'क्षमस्व' मध्ये हेतुनिरपेक्षता असल्याने, विडंबनात्मक कवितासंग्रह म्हणून त्याचे वेगळे वैशिष्ट्य प्रत्ययास येत नाही.

आज दलित कविता मोठ्या प्रमाणात लिहिली जात आहे. आपल्या अंगीभूत तेजाने ती स्वतःचे वैशिष्ट्य निर्माण करीत आहे. दलित कविता ही सामाजिक बांधीलकी स्वीकारणारी कविता आहे. दलितांच्या व्यथा-वेदनांतून ती आकारत असल्याने तिचे अनुभवविश्व दाहक व प्रत्ययकारी आहे असे म्हणावयाला हरकत नाही. दलित हा या देशातील बहिष्कृत-उपेक्षित. मानवी स्वातंत्र्याचा तो हक्कदार नव्हता. फक्त तो वेदना जगत होता. त्या नुसत्याच ठणकत होत्या पण त्याचा शब्दरूप आविष्कार घडत नव्हता. आज दलित कवी आपला अनुभव व्यक्त करू लागला आहे. बंधमुक्ततेची अभिव्यक्ती होऊ लागली आहे. संस्कृतीने उणा केलेला माणूस विद्रोहाचे सूर आळवू लागला आहे. स्वत्वाची भाषा बोलू लागला आहे. नामदेव ढसाळ (गोलपिठा), नरेशकुमार इंगळे (अंगारा) व चोखा कांबळे (पिंपळपान) हे त्यांचे प्रतिनिधी आहेत. या वर्षात दलित कवींचे हे तीन कवितासंग्रह प्रकाशित झाले असले तरी केशव मेश्राम, दया पवार, वामन निंबाळकर, ज. वि. पवार, त्र्यंबक सपकाळे इ. कवी आपल्या नव्या जाणिवा समृद्धपणे शब्दांकित करीत आहेत.

श्री. नरेशकुमार इंगळे यांनी 'अंगारा' या काव्यसंग्रहाच्या अर्पणपत्रिकेत म्हटले आहे : "स्वाभिमानपूर्वक जीवन जगण्याचा अधिकार ज्यांचा नाकारण्यात आला होता, त्यांना समर्थपणे जगण्यासाठी ज्या व्यक्तींनी आपले सर्वस्व अर्पण केले, करीत आहेत, करतील

अशा सर्व मानवतावादी कर्तृत्वशक्तीला 'अंगारा' भावनाविष्कार अर्पण!" अर्पणपत्रिका अतिशय बोलकी आहे. स्वाभिमान ही एक मानवी वृत्ती आहे. पण जेथे हे नाकारले असेल ते ठोकरून नव्या जीवनाचा नवा आशय शोधण्याची ताकद उभारणे म्हणजे जीवनाचा नवा अर्थ जगणे. हे जगणे आव्हानप्रद असते. म्हणूनच कवी म्हणतो :

ढिगाऱ्यातील राख बोले
घ्या अंगारा क्रांतीचा.

येथे 'अंगाऱ्या'चे प्रतीक भविष्यनिर्माणाच्या सामर्थ्याचा कवडसा म्हणून येते. चैतन्याची भाषा हा त्याचा धर्म आहे. हे सारे कशातून निर्माण झाले? लाख दुःखाची आच सोसणाऱ्या यातनांतून. मग कवीचे मन संस्कृतीच्या पांगुळगाड्याने उद्ध्वस्त केलेल्या त्याच्या इच्छाशक्तीला प्रेरणा देते. त्याला वाटते, संस्कृतीचे उभे रान पेटले आहे. त्यात मीही पेटतो आहे. हा वणवा विझावा अशी मात्र त्याची इच्छा आहे. संस्कृतीच्या नावाखाली मानवी मनच चिरडू पाहणाऱ्या दुष्प्रवृत्तींविषयी कवी उद्गारतो :

काय म्हणून मी सुसंस्कृत व्हावे ?
काय केले यांनी माझ्यासाठी ?
या मातीसाठी उपेक्षितांसाठी ?

क्षुब्ध मनाची धग यापाठीशी आहे. स्वत्व हिरावून घेणाऱ्या, व्यक्तित्वाचा लिलाव करणाऱ्या आणि मूल्यहीन करून टाकणाऱ्या नादानपणाचे विश्लेषण कवी करतो तेव्हा—

नरकातल्या हिणकसवासासारखा
झोपडपट्टींतला मी एक माणूस—
माणूस म्हणून जगतो तेव्हा...
त्यातही तुम्हाला मजा वाटते
साहित्याच्या चौकटीत स्थान देऊन तर
सहानुभूतीचा आव आणून...
मार मार स्तुती होते त्याची
साहित्याच्या क्षेत्रात...आमच्याच
या जीवनाचे प्रदर्शन करून...
फुलांच्या माळा पडतात त्यांच्या गळ्यात
अन् त्यांचा उर भरून येतो.
पण आमचे त्यात किती असते मरण
हे कोण जाणे ?

आत्मचिंतनाचे वळ असलेली व्यक्ती व सामाजिकता यातील हा संवाद आहे. कवीच्या अनुभूतिमय व्यक्तित्वाचा तो आविष्कार आहे. श्री. इंगळे कधी कधी या व्यक्तित्वाचा

मुक्त आविष्कार घडविताना शब्दांच्या इतके आहारी जातात की 'सॅटिस्फॅक्शनला टिटॅ-नसचा झटका' 'ठेंगूळ सच्छिद्र', 'जर्म्सेकटरचा रिंगोझोन' अशी अर्थहीन शब्दरचना करून वाचकाला गोंधळात पाडतात. पण अशी स्थळे अपवादात्मक.

'पिंपळपान' हे नाव प्रतीकात्म आहे. दलितांच्या जीवनात पिंपळाला स्थान आहे ते श्रद्धेचे. 'पिंपळपान' म्हणजे एका दुर्दैवी दलित स्त्रीची कर्मकहाणी. श्री. चोखा कांबळे यांनी 'न्हासाटी' गावच्या या दुर्भागी मुलीचा जीवनपट चितारताना एक सत्यच प्रकाशात आणले आहे. शाळेत जाणारी ही दलितकन्या, वयात येताच तिचे वडील तिच्या विवाहाची तयारी करतात. तिलाही मुलगा आवडतो. पण एक दिवस विपरीत घडते. सायंकाळी शाळेतून परतताना तिच्या पाळतीवर असलेला एक दुष्ट लांडगा तिची वाट अडवतो. बांगड्या फुटतात–वेणी हासडली जाते आणि तिच्या देहाचा चोळामोळा होतो. लेकीची बेअब्रू झालेली आणि गावचावडीने न्याय न दिल्याने तिचा बाप प्राण सोडतो. मग तिच्या मनात अनेक प्रश्न काळासारखे उभे राहतात. वेशीच्या बाहेर राहणाऱ्या महार-मांग-चांभाराला इज्जतच नाही काय? आपली बेअब्रू करणाऱ्या या समाजात पुन्हा कसे राहायचे? मग ती आपल्या आईसह मुंबईला जाते. आणि येथे ती जीवनाच्या दुसऱ्या टप्प्यावर स्थिर होते. अगतिक झालेली ती वेश्यालयाचा उंबरा ओलांडते. तिच्याभोवती ग्राहकांची गर्दी जमते. गुलहौशी रात्र जागविण्याचे तिच्या नशिबी येते. आणि ती—या लोखंडी गजात मदनाच्या खिडकीत झिजत राहते. याच खिडकीतून समाजशिष्टांना उद्देशून ती म्हणते—

भोगासाठी जात
येते का हो आड?
धर्मसंस्कृतीला उरते का चाड?

समाजव्यवस्थेवर ती मार्मिकपणे बोट ठेवते. तिच्या मनाला अनेक प्रश्न इंगळीसारखे डसतात तेव्हा तिला वाटते की, जगन्नियंत्या ईश्वरानेच आम्हाला बलहीन केले; ज्ञानहीन केले – गावाच्या बाहेर ठेवले. पण तिलाही एकाक्षणी वाटते की, शरीर आणि मन या दोन्हींचा लिलाव केलेल्या कुंडातून आता बाहेर पडावे. आणि समाजानेही आपल्याला सन्मानाने जगू द्यावे. या दलित स्त्रीची कैफियत श्री. कांबळे यांनी अभिनिवेशमुक्त अशी मांडली आहे. संयम हा तिचा गुणविशेष आहे. एका संवेदनशील मनाची स्पंदने कवीने अत्यंत हळुवारपणे चितारली आहेत. हेच 'पिंपळपान' चे यश आहे.

आपल्या विद्रोही कवितेने स्वतःचे स्थान निर्माण करू पाहणाऱ्यांत नामदेव ढसाळांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. ढसाळांची कविता ही एखाद्या प्रचंड प्रपातासारखी आहे. ती कुणासाठी थांबत नाही. बेदरकारपणे वाटा तुडवीत जाते. मनाचा अनिर्बंध बांध फुटावा तसे या कवितेचे होते. वाचकांना धक्के देण्याचे काम ती करते. ढसाळांच्या कवि-तेचे सामर्थ्य तिच्या आशयात आहे.

'गोलपिठा' चे प्रास्ताविक बंडखोर नाटककार श्री. विजय तेंडुलकर यांनी लिहिले आहे. तेंडुलकरांनी ढसाळांची कविता, मराठीतील बंडखोर कविता असल्याचे प्रतिपादिले आहे. ही बंडखोरी कशात आहे ? तर काहींना ती शब्दप्रयोगात दिसते. काहींना धीट अभिव्यक्तीत प्रतीत होते. ढसाळांची कविता नवी वाङ्मयीन प्रवृत्ती जगू पाहणारी कविता आहे. सामाजिक मांद्याचा प्रखरपणे निषेध करणारी, विद्रोहाचा प्रभावी उद्गार व्यक्त करणारी ही कविता आहे.

ढसाळांचे अनुभवविश्व इतर दलित कवींप्रमाणेच साहित्य व संस्कृती नाकारणारे आहे. पण ते जे काही स्वीकारते ते श्रद्धामूल आहे. आपल्या जीवनाला गती देणाऱ्या शक्तीचे ऋण मान्य करताना 'डॉ. आंबेडकर' या कवितेत कवी म्हणतो.

तू दिलेल्या संघर्षशील शिकवणुकीतनं मी देतो.
मूलभूत श्रद्धांना, वचनांना आव्हान
नि खोदतो स्वतःला दुःखदैन्यातून अंतिम
कणापर्यंत
नि मारतो स्वतःच्याही काळजात पाजळलेल्या कुदळी.

डॉ. आंबेडकरांविषयीची ही भावना श्रद्धामूल असली तरी ती आंधळ्या कवचाने वेष्टिलेली नाही. ढसाळांच्या कवितेत मार्क्स आणि माओही येतो. पण तो क्रांतीच्या संदर्भात. संस्काराचा भाग म्हणून नव्हे. डॉ. आंबेडकरांचा माणूस घडविणारा लढा ढसाळांच्या क्रांतिभाषेला अधिक तेजस्वी करतो. आणि मग अंतर्मुख होऊन त्यांची कविता विचारते, 'शतकानुशतके सूर्याकडे पाठ फिरवून प्रवास केला ही घोर नाकेबंदी किती दिवस सहायची ? काळोखाचे कैदी म्हणून किती काळ खितपत पडायचे ?' मनात कल्लोळ माजविणाऱ्या या प्रश्नातूनच ढसाळ 'रक्तात पेटलेल्या अगणित सूर्यांना' झिंदाबादची गर्जना करून, शहरा-शहरांना आगी लावण्यास सांगतात. आता अंधारयात्रिक होण्याचे नाकारून, गल्लीबोळातून मुधारणेच्या मशाली नेणाऱ्या महाग्यानी लोकांना ते दांभिक म्हणतात. कारण त्यांची कृती त्यांना थेर वाटते. त्यांना ते निर्धारपूर्वक सांगतात,

आज आम्हाला या खोपटाखोपटातून
पूर्ण सूर्य दिसतोय !

ढसाळांची कविता ही केवळ प्रतिक्रियावादी कविता नाही तर ती जीवनसत्ये प्रखरपणे धुंडाळीत येते. विद्रोह हा तिचा सूर असतो. मग ती संस्कृतीला, पाखंडीपणाला, ग्रंथांना शिव्या देते. एवढेच नाही तर ती आईबापांना शिव्या देते. या शिव्या असाहाय्यतेला–मुकाट्याने दुःख गिळणाऱ्या पिढीला असतात. आत्मद्रोहाला असतात. स्वातंत्र्याला ती आपले मानीत नाही. लोकशाही मेली तरी तिला त्याची खंत नाही. आत्मतेजाची इतकी प्रखर व प्रभावी जाणीव मराठीत क्वचितच असेल.

ढसाळांच्या कवितेत अनेकदा अनाकलनीय शब्दसमूह 'ट्रम' वाटावी इतके येतात. 'आमच्या आईची भाषा तीच आम्ही वापरतो' हा सार्थ अभिमान कित्येकदा लुळा पडून शब्दांना हव्यासाचे स्वरूप येते. प्लेटोपासून तो ज्ञानेश्वरापर्यंत नोंदलेली यादीही अगम्य वाटते. पण सच्च्या सुरात हे काही खोटे सूर विरून जातात आणि ढसाळांची कविता एक तेजस्वी कविता उरते.

सुरेश नगर्सेकर यांचा 'जाण' आणि वसंत पापळकर यांचा 'दरबार' दोन वेगवेगळ्या प्रवृत्तींचे निदर्शक आहेत. वसंत पापळकरांचा अनुभव व्यक्त होतो तो भारावलेपणातून. हे भारावलेपण कधी स्थिरतेच्या मर्यादा ओलांडते तर कधी नेणिवांच्या कक्षांतच रेंगाळते. असे असले तरी चिंतनशीलतेचा स्पर्श पापळकरांच्या कवितेला आहे. कवीच्या व्यक्तित्वाचा वेगळेपणा जाणवतो तो येथे. मानवी मनाचे पापुद्रे उलगडताना 'मनास डोळे नवीन आले' अशी कवीला आत्मानुभूती होते. मग ते सामान्य माणसाला पेटून उठायला सांगतात. जठरांच्या प्रश्नाने व्यथित होतात. रोजच रस्त्यावर वावरणाऱ्या श्वापदांना न्याहाळतात. किनाऱ्यावरच्या नकली नगाऱ्यांना हलके हलके लांब जाऊन थंड होताना पाहतात. कुणास काही न समजणाऱ्या — वेगळाच शब्द ध्वनित करणाऱ्या व स्वतःचेच अस्तित्व उसवीत बसलेल्या राखडरंगी पक्ष्याला बघतात. इथून तिथून शून्याचे मिरविणारे गणित मांडणाऱ्या अस्तित्वाला शोधतात. सुन्न कोंदलेल्या मनात चमकत जाणाऱ्या आठवणींच्या दिव्यांना कुरवाळतात. जीवनातील विविधतेचे दर्शन घेतानाच स्वत्वहीनतेचा उपहासगर्भ आलेखही त्यांच्या कवितेचा विषय होतो तेव्हा—

त्यांचे एक बरे असते चार पायांवर धावले की थोडे अन्न मिळते
त्यांचे एक बरे असते थोडं गुटर गू केले की, एक मादी मिळते
त्यांचे एक बरे असते पाण्यातून बाहेर काढले की, चटकन मरता येते
त्यांचे एक बरे असते आकाशात हिंडताना उरात काटक्यांचे घर ठेवता येते
त्यांचे एक बरे असते की, त्यांना मुद्दाम स्तन दाखवावे लागत नाहीत
त्यांचे एक बरे असते की, भाईबंदांसमोर अभिनय करावे लागत नाहीत
त्यांचे एक बरे असते उपाशी झोपताना इझम्सची उशी लागत नाही
त्यांचे एक बरे असते की, एकाच्या कातड्याला दुसरा चुकून पांघरत नाही

यांतील भेदकता विलक्षण आहे.

कवी नारायण सुर्वे यांच्या कामगार व दलित जीवनावरील कवितेने झपाटून त्यांच्या अभिव्यक्तीची तऱ्हा गिरवणाऱ्या कवीत 'जाण' कर्ते सुरेश नगर्सेकर यांचा अंतर्भाव करावा लागेल. साम्यवादावर अढळ श्रद्धा असलेल्या या कवीने 'माझा झेंडा : विळा हातोडा ज्याची जागती वेस' अशी स्वतःची ओळख करून दिली आहे. सुर्व्यांनी या कवितासंग्रहाचे स्वागत करताना 'नगर्सेकरांच्या शब्दांनी अजून डोळे उचलून जग पाहिलेले नाही' असे

जे म्हटले आहे ते वास्तवदर्शी आहे. एवढे मात्र खरे की, नगर्सेकरांना कवितेची ' जाण ' असल्याच्या खुणा अनेक ठिकाणी विखुरलेल्या आहेत.

या वर्षातील आणखी दोन कवींच्या कवितासंग्रहाचा विचार अपरिहार्य आहे. कलावंताच्या प्रतीतिक्षमतेचे मोल या दोघांही जवळ आहे. वसंत आबाजी डहाके व फ. मुं. शिंदे ही नावे मराठी वाचकांस परिचित आहेत ती त्यांच्या काव्यवैशिष्ट्यांमुळे. डहाकांचा ' योगभ्रष्ट ' मौज प्रकाशनाचा तर शिंद्यांचा ' जुलूस ' अस्मितादर्श प्रकाशनाचा. ' जुलूस'ला प्रा. दि. के. बेडेकर या विचारवंतांची प्रस्तावना लाभलेली. ' योगभ्रष्ट'ला प्रस्तावना नाही की कवीचे आत्मगतही.

' योगभ्रष्ट ' हा चौसष्ट कवितांचा संग्रह. यात काही दीर्घकवितांचा समावेश आहे. आपल्या स्वतंत्र निर्मितीने डहाक्यांनी समवयीन कवींमध्ये स्वतःचे असे स्थान निर्माण केले आहे. अवतीभोवती बहुरूपी साहित्य लिहिले जात असताना आजच्या जीवनातील निरर्थकता शोधून मानवी अस्तित्वाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करणारे साहित्य आपला ठसा उमटवू पाहात आहे. माणूस हा केंद्रीभूत मानला की, समाजात घडणाऱ्या प्रचंड उलथापालथींनी माणसातील मेलेला माणूस प्रतीत झाल्याशिवाय राहात नाही. माणसाचे मन दैवी भोवऱ्यात इतके जखडले असते की, त्यातच निर्माण केलेल्या दुःखभोवऱ्याचे त्याला विस्मरण होते आणि तो स्वतः स्वतःचा गुलाम होतो. ' नरेचि केला हीन किती नर ' ही त्याची स्थिती असते. डहाक्यांच्या कवितेतील उद्रेक हा इथे आहे.

माणूस हा नियतीचे खेळणे आहे ही मनामनातील स्थिर अशी भावना आहे. पण या कल्पनेला धक्का बसतो तो डहाक्यांच्या कवितेत. ' ईश्वराच्या ' अज्ञात शक्तीने माणसाचा पराभव केला आहे. निराशावाद जन्मतो तो याच कोशातून, अगतिकता येते ती याच मानसिक पारतंत्र्यातून. तरीही यातून माणसाची सुटका नाही. देवाच्या भुसा भरलेला रानातील आपण नकली माणूस आहोत. आणि या नकलीपणातून जगाच्या व्यवहाराकडे पाहण्याची सवय जडलेली आहे. दैवाच्या चक्रगतीत अडकलेला माणूस जन्मापासून मृत्यूपर्यंत ' बद्ध जीव ' असतो; याला कारण ' सर्वत्र ईश्वर भिनलेला आहे अथवा विदूषक '. कवीने माणसाच्या गतानुगतिकतेचा एका परीने उपहासच केला आहे.

असा हा माणूस क्षुद्र आहे, दुबळा आहे. एकाकी आहे. आत्मकेंद्री आहे. दूरस्थ शहरात तो तोतया हुतात्म्यासारखा खाली मान घालून चालत जातो. त्याच्या छातीतले रस्ते चिरडत जाणाऱ्या टापांच्या आवाजाने सुने पडतात. तो आव्हान देणारा हंगामी योद्धा असतो. तो आरशात स्वतःचे टेंगू प्रतिबिंब पाहतो, पण आरशाच्या बाहेर शिवाजी शहाजी भोसले किंवा कार्ल मार्क्स असा रूपांतरित होतो. माणसातला माकड जागा झाला आहे. तो कीटक झाला आहे. त्याच्यात विद्रोहाची शक्ती राहिली नाही. अगणित माणसे आपल्या आयुष्याचे वेटिंगरूम करीत जगताहेत. ही निरर्थकता कवीला अस्वस्थ करते. स्थिरतेचा त्याला उबग येतो. स्थित्यंतराचे स्वप्न तो उराशी बाळगतो. आणि मग आजच्या सामाजिक,

अनुक्रमणिका

राजकीय, शैक्षणिक गतिचक्रात : अभाग्यांच्या जीवनगीताच्या चोपडीत ' किरटी अक्षरे आणि पालींची अंडी ' असली तरी, माणसातल्या, पुष्पपात्रातील फुलाप्रमाणे अचेतन असलेल्या शक्तीला तो आव्हान करतो. हे आव्हान राजकीय नेत्याचे नसते तर शिक्षित मस्तकांच्या चिंधळ्या उडताना पाहणाऱ्या पिढीचे असते.

जगणे आणि मरणे या दोन अटळ अशा अवस्था आहेत. तरीही जगण्याचे भान माणसाला असते. भान नसते समाजाचे, देशाचे, पिढीचे, समकालीनांचे. हे जगणे निरर्थक असले तरी या जगण्याला हवा असतो शारीरधर्म, अन्न आणि इतरही काही. ढहाके, जगण्याच्या या वास्तवाबरोबरच मरण्याच्या वा मारण्याच्या मानवी प्रवृत्तीचा बुरखा फाडतात तेव्हा–

माणसाला मारावयाचे । मरावयाचे किती विविध प्रकार
आमचे येथे सर्व प्रकारचा माल ऑर्डरप्रमाणे तयार करून मिळेल
विजेची खुर्ची, गिलोटीन, उकळते तेल, डोळे काढणे, हत्तीच्या पायदळी.
युद्धात तर घाऊक प्रमाणावर मरता येते.
शिवाय पाण्यात उडी टाकणे, जाळून घेणे, विष, झोपेच्या गोळ्या.
अपघात, भूकंप, भुकेने व्याकूळ होऊन मरणे.
सदा लागती गा वेध
येथे मृत्यूचे मृत्यूचे
आणि जिवाला लागते
वेड एक विझायाचे
आत्महत्या करून मरून गेलेल्या कवीची कविता
त्याने काय घेतले होते कोण जाणे !
मृत्यूचे वेध

मृत्यूचे येथे येणारे अनेक तपशील, वास्तवजन्य विराटतेची अटळ प्रक्रिया म्हणून येतात. तपशिलासाठी तपशील म्हणून नाही. ' मरावे आणि सगळ्या यातनांतून सुटावे ' असे व्यक्त होणारे कविमनही पलायनवादी नसते तर–

रस्त्याच्या कडेला मरून पडलेली भिकारीण
हाडे हाडे नुसती हाडे
वाळून गेलेले आहे तिच्या योनीचे कातडे

अशा भीषणतेचा विस्फोट करते. माणसाच्या नीचतेचा, हलकटपणाच्या पापाचा, दुराचाराचा उच्चार करते. मग मनच्या आगीने कोळपून काळे झालेल्या पक्ष्यांना म्हणते–

गा तुमचे जळून गेलेले गाणे
तुमच्या जळून गेलेल्या जीविताचे गाणे

अनुक्रमणिका

माणसाच्या ' असण्याचा ' आणि ' नसण्याचा ' आलेख चितारणारी डहाक्यांची कविता केशवसुतांच्या सामाजिक हुंकाराशी नाते सांगत असली तरी आजच्या निरर्थक जीवनाचे ते प्रखर भाष्य होय यात शंका नाही.

प्रा. दि. के. बेडेकर यांनी फ. मुं. शिंदे यांच्या ' जुलूस ' ला प्रस्तावना लिहिताना, या कवितेतून ' एक तरुण कविमन त्याची व्यथा साकारते, सच्चेपणाने व सहजतेने करते ' असे म्हटले आहे. श्रमविभागाच्या किंवा जन्मजात विषमतेच्या रचनेमुळे माणसाच्या जीवनात निर्माण होणारी व्यथा, माणसाला निमूटपणे सहन करायला लावते, पण आजची युगभाषा ही निमूटपणे व्यथा सहन न करणारी अशी आहे. शिंद्यांच्या कवितेत येणारी व्यथा कोणत्या स्वरूपाची आहे ? शिंदे कधी प्रेयसीशी, कधी स्वतःशी तर कधी समाजाशी सतत संवाद करीत असतात. यातला खरा संवाद कोणता आहे हे आकलन न होण्याइतका धूसर आहे. या सर्व संवादांमागे चिंतनशील प्रकृतीचे कविमन मात्र जागे आहे. हे चिंतन ' मी ' तून आकारत येते, हा मी –

उध्वस्त जीवनातले सिद्धांतच जेव्हा
ठरले मातीमोल
साधनांचे धुमारे मुक्याने मुसमुसून
जगण्याचे ठरवू शकले नाही मोल.
मातीशी जखडलेला वहकलेला पीर
मृत्यूच्या सिद्धतेतही कुच ठरला
कवितेसारखी एकच खूण तेव्हा त्याला
विश्वास म्हणून सापडून गेली.

' विश्वास ' म्हणून सापडलेली कवितेसारखी खूण मात्र ' जुलूस ' मध्ये सर्वत्र सापडते. मुक्त व्यथांच्या गावी उन्मळून येणाऱ्या व्यथा-दुःख–आठवणी अस्तित्वाच्या पंखावरून झुलत जातात. मग इथे चेहरे हसरे ठेवून एक एक वस्तूस सोलावं लागतं, रात्रीत दुःख चिंब होताना आपटीतले शब्द उजळून निघतात. दुःखाचे नाद मजल्यामजल्यातून सरपटतात. गालावर अश्रूंचे संवाद नोंदवून गोंदवून स्वतःतच उभे राहावे लागते. एकीकडे दुखणारे, खुपणारे जगल्याचे समाधान असतानाच, आपण ' हिरव्यांपेक्षा पिवळ्या पानांना जपलो ' अशी मुग्ध खंतही कवी व्यक्त करतो. येथे दुःख व्यक्तिजीवनाच्या कोंडीतून हुंकारत येते. आर्ततेच्या व हरवलेपणाच्या चक्रगतीचा ' जुलूस ' आपल्या अश्रूंची जात निराळी असल्याचे सांगत असला तरी ही जात कलावंताच्या लौकिक जीवनाचा सर्वमान्य असा दुःखाविष्कार घडविणारी आहे असे वाटते. दुःखलिंपित ' मी ' असा व्यक्त होतो.

दुःख पेटत पेटत आयुष्य पेटत जाणार नाही ना ?
जाळ धरणाऱ्या सवयी दुःखाच्या आहेत

व्याख्येत फ्रेम करून टांगलेले भोवतालचे जगणे आणि
मी ? ? ? ? ? हा असा दुःखालिंपित
शेवटी दुःखालाही बेवारशी जन्म असत नाही ना !
त्याला कवटाळणारे अश्रूंचे हात असतात !

फ. मुं शिंदे यांचे दुःख असे आत्मसंवादी आहे. चिंतनशीलतेची त्याला किनार आहे. विद्रोहाची भाषा ही या युगाची भाषा असली व माणसाचे मूल्य हरवून टाकणाऱ्या मतलबी संस्कृतीची कोंडी फोडून टाकणारी व्यथा शिंदे मुखरित करीत नसले तरी जीवनातील अपुरेपणाच्या–रितेपणाच्या, हरवलेपणाच्या, मंजूर असलेल्या दुःखाला वाचा फोडतात. एक समृद्ध कविमन त्यातून आकारते.

मराठी कवितेत स्थिरपद झालेल्या इंदिरा संत व पु. शि. रेगे यांचे ' वाहुल्या ' व ' प्रियाळ ' या काव्यसंग्रहांनी काही विशेष भर घातली आहे काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे. संतांच्या यापूर्वीच्या सर्वच काव्यसंग्रहांतील भावविश्व तरल, आर्त व प्रेमभावनेत बुडून जाणारे होते. ' वाहुल्या ' तही उदासपण, अस्वस्थता, एकाकीपणा या भावच्छटांचे दर्शन घडते. संतांच्या भावविश्वाला मर्यादा आहे. असे नेहमीच म्हटले जाते. पण कविता ही व्यक्तिमनाची अनिर्बंध अभिव्यक्ती असेल तर भावविश्वाच्या मर्यादांचा प्रश्न गौण ठरावा. ' वाहुल्या 'त काळोख व अंधाराशी कवयित्रीचे नाते सघन आहे. कदाचित जीवनाच्या अंतिम टप्प्याची ती जाणीव असावी. त्या म्हणतात—

आता उताराच्या वाटेवर सगळीकडे स्तब्ध आहे
स्नेहभावाच्या ताणाने आकाश दाटते आहे.
वाकते आहे.
आपला हात आपलाच गळा दाबतो आहे.
माझी थोडीच राहिलेली पावले
भयाच्या सावलीनं गिळून टाकलेली आहेत.

एकीकडे स्नेहभावाची कृतार्थता व दुसरीकडे भयसावली अशा संमिश्र टप्प्याचा हा प्रवास आहे. ' वाहुल्या ' हा संतांच्या पूर्वानुभवाचाच एक परिष्कृत आविष्कार असला तरी काही उदास रंग स्पर्शिल्याशिवाय राहात नाहीत.

सौंदर्यासक्त मनाने टिपलेले अनेक प्रसन्न क्षण रेग्यांच्या कवितेत आढळून येतात. भाषा व शब्द यांना नवा अर्थ देण्याचे हुन्नरी कसब रेग्यांइतके एखाद्याच कवीला साधले असेल. ' प्रियाळ ' हा त्याला अपवाद नाही. भावकंपने व भावचमत्कृती यांचे बेमालूम मिश्रण ' प्रियाळ ' मधील बव्हंशी कवितांतून जाणवते.

१. आपणाला दोन गोष्टी
टाळायला हव्यात

अनुक्रमणिका

तुला मी; मला तू.
२. अलीकडे पुनः स्वप्नात
सारखा तूच येतोस
का हा माझा इतका ध्यास ?
३. पहिले आठवायला जर
इतकी वर्षे लागली.
तर विसरायला किती लागतील ?
किंवा
असे काय
की ज्यामुळे
आपली हृदये जुळावीत
अजून तर
काहीच कुठे घडलेले नाही
काहीच कधी घडणारेही नाही !
किंवा
कुणीही यावं
काहीही सांगावं
उरतील ते सगळे शब्द
आपले आहेत

याच ओळी जर एखाद्या नवोदित कवीच्या म्हणून प्रकाशित झाल्या असत्या तर 'ह्या काय कवितेच्या ओळी आहेत काय ?' असा प्रश्न कोणीही विचारला असता. मान्यवर कवीला असे प्रश्न विचारायचे नसतात.

रेग्यांची भावकविता, मराठी कवितेतील एक महत्त्वपूर्ण टप्पा मानण्याची प्रथा आहे. 'प्रियाळ' या बाबतीत पूर्णतः न्याय देऊ शकत नाही.

१९७२ मध्ये विविध नियतकालिकांतून लेखन करणारे केशव मेश्राम, नीलिमा भावे, शशिकांत लोखंडे, वासंती इनामदार, विश्वास वसेकर, दया पवार, त्र्यंबक सपकाळे, ज्योत्स्ना पांडुरंग दीक्षित, अशोक वागवे, केशव वसेकर, उत्तम कोळगावकर, या कवी-कवयित्रींचा उल्लेख करता येईल. एखादे वर्ष त्यांच्या कवितासंग्रहाची अशीच दखल घेईल, अशी आशा बाळगायला हरकत नाही.

# १९७२ मधील साहित्य-समीक्षा

**प्रा. यशवंत मनोहर**



साहित्यविषयक प्रश्नांचा ऊहापोह करणारे आणि साहित्यकृतींची वाङ्मयीन चिकित्सा करणारे असे दोन्ही प्रकारचे लेखन या वर्षी वैपुल्याने झाले. सदर लेखात पुस्तकरूपाने प्रकाशित झालेल्या लेखनाचाच अनेक मर्यादांमुळे विचार करणे भाग पडल्याने मासिकांमधून प्रसिद्ध झालेल्या अनेक लेखा-टिपणांचा विचार इथे शक्य झाला नाही. अर्थातच पुस्तक ही घवघवीत पदवी केवळ प्राप्त झाल्यामुळे जसा अत्यंत यथातथा लेखनाचा आढावा घेणे इथे क्रमप्राप्त झाले तसा पुस्तक-मोक्ष न लाभल्याने मासिकांमधूनच राहणे ज्यांच्या नशिबी आले त्या कदाचित या वर्षीच्याच नव्हे तर एकूणच मराठी समीक्षेच्या संदर्भात वजनदार असणाऱ्या लेखाटिपणाचा विचार करता आला नाही. हा आढावा स्पष्टपणे म्हणूनच १९७२ मधील साहित्यसमीक्षेचा असण्यापेक्षा केवळ काही साहित्यसंदर्भातील पुस्तकांचा आहे, आणि अपरिहार्यपणे तो अपूर्ण आहे. पुढील विवेचनात काही महत्त्वाची पुस्तके मला वाटली त्यांचा काहीसा विस्ताराने विचार केला असून चाकोरीमय, मर्यादशील पुस्तकांकडे अत्यंत आटोपशीरपणे पाहण्याचा प्रयत्न केलेला आहे. पुढे जे विभाग पाडले आहेत ते विषयानुसार नसून पुस्तकांच्या एकूणच गुणवत्तेनुसार पाडले आहेत हे वाचकांच्या लक्षात पुढे येईलच.

'बी कवी – चरित्र व काव्यचर्चा' हे सौ. निर्मला कणेकर यांचे पुस्तक. बींचे चरित्र, बींच्या काव्यविषयक कविता, सामाजिक, राजकीय कविता, बींची प्रेमकाव्ये आणि बींच्या एकूणच कवितांचे विशेष व त्यांच्या उपेक्षेविषयीचे विवेचन अशा विभागांमध्ये या पुस्तकाची वाटणी झालेली आहे. बींच्या चरित्राविषयीचा मजकूर लेखिकेने मेहनतीने लिहिला ही एक बाब सोडली तर बींच्या कवितेचे कोणतेही प्रचलितभिन्न आकलन या पुस्तकात नाही. चाकोरीबद्ध विखुरलेला संबंधित मजकूर संकलित करणे एवढेच शक्य ते लेखिकेने केले. या संकलनात पुनरुक्तीच्या पडछाया इथेतिथे भेटतातच. शिवाय कवितांची रसग्रहणे म्हणजे कविता गद्यात मांडून दाखविणे ही माफक काव्यदृष्टी या पुस्तकात दिसते.

प्रकरणांना पार्श्वभूमीदाखल जोडलेला मजकूर तुकडे जोडल्याप्रमाणे वाटतो. बोंच्या चरित्रा वर लेखिकेने अधिक लक्ष दिले असते आणि कवितेचे असे गाईड लिहिले नसते तर एक वेगळा उपयोग आणि परिणाम सदर पुस्तकाचा झाला असता.

‘ बालकवींची कविता : एक रसास्वाद ’ हे डॉ. वा. पु. गिंडे यांचे पुस्तकही वरील पुस्तकासारखेच संकलनसज्ज आणि शालेय. ‘ आधुनिक मराठी कविता आणि बालकवी ’ या पहिल्या भागात बालकवींच्या कविप्रकृतीचा. त्यांच्या संप्रदायाचा विचार आणि दुसऱ्या भागात रसग्रहणासंबंधीच्या दिशा आणि कवितांची रसग्रहणे या पद्धतीने मजकूर आलेला आहे. विद्यार्थ्यांसाठी लेखन असल्याने एक बऱ्यापैकी मार्गदर्शिका असे रूप या पुस्तकाला आले आहे. बालकवींच्या कवितांवर आजवर जे लेखन झाले त्या मर्यादेतच प्रतिज्ञेवार- उभे असे हे पुस्तक आहे.

‘ तांत्रे आणि त्यांचे गीतिकाव्य ’ हे भ. श्री. पंडितांचे पुस्तक संशोधनमूल्यांनी नटलेले आहे. त्यांच्या जवळजवळ सर्वच लेखनाचा हाच धर्म आहे. तांत्रे हे पंडितांचे आवडते कवी. तेव्हा चरित्र, काव्यविषयक दृष्टिकोण, प्रेमगीते, निसर्गगीते, रामणियक गीते, गीति- काव्याचे स्वरूप असे विभागवार विवेचन त्यांनी केले आले. कवींचा प्रत्यक्ष सहवास व बहुश्रुतपणा ह्या दोन वैभवी बाबींमुळे प्रा. पंडित हे कवींची चरित्रे ज्ञात-अज्ञात अशा भर- पूर तपशिलाने लिहू शकतात. हा गुण त्यांच्या लेखनाचा मर्मधर्म आहे. त्यांचे लेखन त्यामुळे सदैवच डिगाळ होताना दिसते. भावगीतकार तांब्यांच्यासंबंधी लिहिताना ‘ उच्चप्रतीचे भावकाव्य छंदात व लयबद्ध शब्दात अवतीर्ण होत असते,’ ‘ काव्यनिपुणाची भाषा स्वभावतःच छंदोबद्ध असते, ’ ‘ हृदयाच्या अंतर्भागातून जे काव्य उत्स्फूर्त होते हे खरे गीतिकाव्य होय.’ अशी अनेक वस्तुस्थितिविपर्यासक विधाने ते करतात. त्यातून त्यांची कवितेविषयीची समज स्पष्ट होते. भावकविता, भावगीत आणि तांब्यांचे लेखन या सर्वच संदर्भात पंडितांच्या मनात सविस्तर गोंधळ आहे. या एकूणच शब्दबेल्हाळ पुस्तकात अत्यंत पाल्हाळिक आत्मी- यतेने पंडितांनी लिहिले आहे. विस्कळीतपणा, मजकुराची पुनरुक्ती आणि मनस्वीपणा या गोष्टींचा प्रत्यय फिरून फिरून येतो. ‘ केशवसुत : पाच चिंतनिका ’ या त्यांच्या पूर्व- पुस्तकाच्या तुलनेने या पुस्तकाचे लेखन बऱ्याच संयमाने, व त्या निकरावर न येता झालेले आहे, ही काहीशी त्यातही जमेची बाजू.

‘ साहित्यसमस्या ’ हे माडखोलकरांचे पुस्तक. त्यात ग. त्र्यं. माडखोलकरांची भाषणे, लेख असा मजकूर आलेला आहे. माडखोलकरांची व्यासंगी व मूलगामी विचारवंत म्हणून सर्वांना ओळख आहे. त्यांच्या लेखनात आणखी काही गोष्टींची ओळख पटते. तात्त्विक पातळीवर माडखोलकरांचे लिहिणे कसे प्रमादप्रचुर होते याचे प्रातिनिधिक प्रत्यंतर सदर पुस्तकात येते. टीकाकार स्वतःचाच विधानोविधानी कसा टीकाकार असतो याचा अडथळे- बाज प्रत्यय अव्याहतपणे येतो. याही पुस्तकातील लेखन विसंगतीनेच अद्भुत भरलेले किंवा वैचारिक चंचलतेने काटेकोर ओथंबलेले आहे. हे नमुने : ( १ ) ‘ सौंदर्य म्हणजे ‘ मानव्य,’

' साहित्यात 'नैतिक' नव्हे तर सौंदर्यदृष्टी निर्णायक मानावी.' ( २ ) ' नीतिबोध हे वाङ्मयाचे कार्य नाही,' ' ऐहिक, भौतिक व राष्ट्रीय मूल्ये जनतेपुढे साहित्यिकाने ठेवावी.', ' साहित्यिक मुक्तप्रज्ञ असावा.' ( ३ ) ' नीतीची कसोटी वाङ्मयाला लावू नये.', ' उद्बोधन व नवप्रत्यय हे साहित्याचे प्रयोजन.' ( ४ ) ' कला अलौकिक आनंदाचा साक्षात्कार घडविते.', ' कलेतील सुखपर्यवसानही निर्भेळ आनंददायक नसते.' असे विसंगतीचे उफाळते सौंदर्य आणि विरोध-भक्तीचे उफाळ्याचे उमाळे सर्वत्र आहेत. शिवाय वरील प्रत्येकच पद संदर्भवैभवाने सौंदर्य-शास्त्राची बेइज्जती करणारे आहे. शैलीचा अलंकारिक घोळ, किंचित एकाच अर्थाभोवती पवित्रे बदलून पिंगा घालणाऱ्या जडावाऱ्या ओळी या सर्वातून हाती लागते ते वरीलप्रमाणे. महत्त्वाचे हे की ( १ ) उद्बोधन आणि नवप्रत्यय हे साहित्याचे प्रयोजन, ( २ ) साहित्य-निर्मिती सास्मित समाधीतून होते, ( ३ ) साहित्याचा निर्माता हा मुक्तप्रज्ञ असावा, ( ४ ) कोणतीही धार्मिक, नैतिक किंवा राजकीय मतप्रणाली साहित्याची कसोटी असू नये या ' उप-पत्तींचा ' त्यांनी सतत पुरस्कार केला असे त्यांनीच जाहीर केले हे अभ्यासकांच्या दृष्टीने बरे झाले. अन्यथा ही गोष्ट लक्षात न येती. ' मराठीतील बौद्ध साहित्य ' या लेखात एक हिंदुत्ववादी विचारवंत काय म्हणतो आहे हे पाहावे तर त्याही लेखात विचारांचा, दिशेचा अत्यंत ढोबळपणा आणि ढगळपणा आहे. प्रस्तावनेत प्रा. सुरेश डोळके आणि डॉ. सुभेदार हे नव्या साहित्यशास्त्राची रचना करावयाला अधिकारी आहेत असा आशादायक विचारही मांडला आहे, तोही विचारणीय आहे.

' साक्षात्कारी संत तुकाराम ' हे डॉ. शं. दा. पेंडसे यांचे पुस्तक तुकारामाचे चरित्र त्यांच्या अभंगांच्या आधारे सिद्ध करू पाहते. तुकोबांचे कवी म्हणून मूल्यमापन करण्याची चूक पेंडसे चुकूनही करीत नाहीत. हा धर्मविषयक प्रबंध. भाविक वृत्तीच्या पेंडसे यांचा पारंपरिक तत्त्वज्ञानाचा अभ्यास आहे. तुकोबांच्या चरित्रातील चमत्कारांवर वेदवाक्या-प्रमाणे त्यांचा विश्वास आहे. त्या चमत्कारपरंपरेचे संवर्धन हा पुस्तकलेखनामागील गर्भित हेतू आहे. वारकरी मंडळींना या पुस्तकाच्या रूपाने अत्यंत चिकाटीने, अभ्यासपूर्वक पद्धतीने आणि त्यांच्यासारख्याच एका निःशंक भाविकाने लिहिलेले तुकोबांचे चरित्र मिळाले आहे. वाङ्मयाभ्यासकांनाही या पुस्तकाचा उपयोग होणे शक्य आहे.

' श्रीसमर्थ चरित्र : वाङ्मय व संप्रदाय ' या प्रा. न. र. फाटक यांच्या पुस्तकाची प्रकृती आणि प्रतिज्ञा डॉ. पेंडसे यांच्या पुस्तकाशी एकरूप आहे. हे पुस्तक कुठल्याही साली प्रसिद्ध झाले असले तरी पेंडसे यांच्या पुस्तकाप्रमाणे मराठी समीक्षेबरोबर एवढ्याच हेकेखोरपणाने फटकून वागले असते.

' संशोधन व चिंतन ' हे प्रा. म. शं. वावगावकर यांचे संशोधन व वाङ्मयाच्या संदर्भा-तील चिंतनपर लेखांचे पुस्तक. वरील दोन्ही प्रकृतींचे लेख विभागशः छापण्याऐवजी एकत्रच छापलेले आहेत. शिवाय स्वभावानेच दोन भिन्न प्रकृतीचे लेख दोन स्वतंत्र पुस्तकांत छापले तर दोन्ही पुस्तके शेलाटीच होतील तेव्हा एकत्रच मोठे पुस्तक छापावे हा " पुस्तकी

विचार " या विशिष्ट योजनेमागे असावा. संशोधकांनी जुने वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचे असले तरच छापावे. या पुस्तकातील 'उत्तरपंचविशीपत्रिका' हे प्रकरण, ज्ञानेश्वरांचे अज्ञात-चरित्र हे सगळेच छापल्याने काय साधले ?

रामदेवराव यादवाच्या पुत्राचे व श्वशुराचे नाव हे संशोधन या पुस्तकात कशाला आणि वाङ्मयाशी त्याचा इतका कोणता संबंध ? असे प्रश्न आहेत. पण सर्व संशोधन मोठे मेहनतीचे आहे हे निर्विवाद. साहित्यविषयक लेखांत मात्र स्वतंत्र अवलोकनाऐवजी भोवतीचेच पडसाद उमटतात.

'खाडिलकरांची नाट्यसृष्टी', 'खाडिलकर : चरित्र आणि कार्य' आणि 'खाडिल-करांच्या नाट्यकृती' ही क्रमाने वसंत शां. देसाई आणि प्रा. फडके यांची पुस्तके. १९७२ हे खाडिलकरांचे जन्मशताब्दी वर्ष. २५ नोव्हेंबरला एकूण तीन पुस्तके खाडिलकरांच्या गौरवार्थ प्रसिद्ध झाली. वरील दोन्ही पुस्तकांचे स्वरुप गौरविकांसारखे. देसायांचे पुस्तक सौंदर्यास्वाद किंवा चिकित्सा या दोन्ही संदर्भांत उणे आहे. खाडिलकरांचे जीवनपैलू आणि नाटकांचे सारांशप्रधान विवेचन असे स्वरूप. प्रा. ना. सी. फडक्यांची पुस्तकेही जन्मशताब्दी वर्षाने भारावलेली. खाडिलकरांचे ऐसपैस चरित्र आणि 'विनोद किंवा नाटकातली पदे (खाडिलकरांची) इतकीशी चांगली नाहीत', 'ते कवी नव्हते', 'त्यांच्या नाटकात काव्या-त्मता नाही.' इ० खाडिलकरांवर घेतल्या गेलेल्या आक्षेपांचे खंडन फडक्यांनी केले आहे. टिळक, गांधींच्या सुखद राजकारणाचे प्रेम व बालगंधर्वांचा अभिनय व त्याहून गाणे खाडिलकरांच्या समीक्षेला आडवे येतात हे ह्या पुस्तकांच्या वाचनातून दिसते. सगळे प्रश्न आता विवेचून झालेले आहेत. खाडिलकरांच्या नाटकासंबंधी काही नवा प्रकाश आता कुठली नवी चर्चा टाकू शकेल असे नाही. कारण ती नाटके तीच, तेवढीच, तशीच कायम आहेत. प्रा. वा. ल. कुलकर्ण्यांच्या पुस्तकाचा असावा तसा आधार दोन्ही पुस्तकांत आहे. प्रस्तुत सिद्ध करताना अप्रस्तुताचे हवाले उपयोगाचे ठरत नाहीत, हे दोन्ही लेखकांनी लक्षात घेतले नाही. खाडिलकरांवर मराठी समीक्षेने खूप प्रेम केले. हास्यास्पद होईस्तोवर. वरील पुस्तकांमध्ये असेच अत्यंत भक्तिप्रचुर आणि अनावश्यक लेखन छापलेले आहे.

तर वरील सर्वच सन्माननीय पुस्तके. काही लेखक ख्यातनाम तर काही प्रथमच पुस्तक-रूपाने पुढे येणारे आहेत. तर ही सुमार पुस्तके. कुठली नवी दृष्टी, नवा विचार, नवी रसिकता, कोणत्याच गोष्टींचे प्रथगात्म दर्शन या पुस्तकांत नाही. काही लेखक सांप्रदायिक. ते त्या सावलीत ओढीने लिहितात. काही लेखक वाचकांच्या मागासलेपणाचा जन्मभर फायदा घेतात. या भागातील बहुतेक पुस्तके अशा काही दुर्दैवी योगाने केवळ छापनीय ठरलेली आहेत. सामान्यपणे विद्यार्थ्यांमध्ये गैरसमजुतींचा अपरंपार धूर पसरविण्यात अशा पुस्त-कांचा अत्यंत निबिड वाटा असतो. अशा लेखनामुळे वाङ्मयातील जागांची मोठी विपरीत अदलाबदल होते. बोरी-बाभळी या लेखकांच्या लेखनातून उगाच जगत असतात. हे दुःख कुठल्याही भाषेला, अभिरुचीला स्वतःची सूज वाढवून घेत भोगावेच लागते.

अनुक्रमणिका

## २

'रामदास दर्शन' या पुस्तकाला गं. बा. सरदार यांची ४० पृष्ठांची प्रस्तावना आहे. साक्षेपी, शांत–संथ आणि मुद्देसूद विवेचन हे सरदारांच्या लेखनाचे नेहमीचे विशेष इथेही दिसतात. समर्थांच्या वाङ्मयीन, राजकीय, सामाजिक, आध्यात्मिक कार्यांचा अभ्यासपूर्ण परिचय थोडक्यात करून दिला आहे. एक अत्यंत चांगली प्रस्तावना म्हणून ह्या प्रस्तावनेचा निर्देश आवश्यक आहे.

'अस्तित्ववादाची ओळख' या छोट्या पुस्तिकेत दि. के. बेडेकरांनी अस्तित्ववादाची तत्त्वप्रणाली, त्याची जगण्याच्या संदर्भातील अन्वर्थकता आणि त्याचा आवाका इ. अंगांनी ओळख करून दिलीय. आजला या जीवनप्रणालीची मौलिकता कोणती हे सांगण्यावर बेडेकरांचा भर असून त्यांच्या पूर्व जीवनभूमिकेशी हा नंतरचा प्रवास अर्थपूर्ण आणि सुसंगत वाटावा असाच आहे. माणसांच्या नैतिक जबाबदारीवर अस्तित्ववाद्यांचा भर आहे. तो आशावादी आहे. आंधळा व्यक्तिवादी नाही. भावड्या, ब्रेगडी आशावादाला व माणसाला दास्यत्वातच रमवू पाहणाऱ्या जुन्यानव्या व्यवस्थांना ह्या तत्त्वप्रणालीचा विरोध आहे. अवघ्या जीवनालाच आपंगणारे हे तत्त्वज्ञान आहे. बेडेकरांची प्रकृती, त्यांची जीवनदृष्टी, साहित्यविषयक भूमिका या संदर्भात भारतीय विचारव्यूहाहून तत्त्वज्ञान पुरस्कारणे ही एवढी एक गोष्ट मला या पुस्तकाच्या बाबतीत अत्यंतच महत्त्वाची वाटते.

'रसास्वाद' या माधव आचवलांच्या पुस्तकातील लेखनावर मर्ढेकरी सौंदर्यविचाराचा उघडउघड परिणाम दिसतो. 'माध्यम–साधन' विचार, कलाकृती म्हणजे अनुभवाची नवीन रचनाकृती हा सर्वच मध्यवर्ती व्यूह मर्ढेकरप्रणीत आहे. मर्ढेकरी सौंदर्यविचाराची सर्वांत मोठी उणीव ही की, मर्ढेकर एका धोक्याच्या जागी आपला लयविचार लोंबकळत ठेवतात. लयतत्त्व स्वयंभू, जीवनापासून तोडलेले असे स्पष्ट जाणवते. आचवल प्रा. वा. ल. कुलकर्ण्यांप्रमाणे समन्वयाची दिशा घेतात. पण वा. लं. ना ते रसायन एकरस करणे बरेच शक्य होते. पण हेच कला–जीवनाचे मर्ढेकरांत असलेले दोन ध्रुव साधताना आचवलांचे विवेचन अनेक ठिकाणी विसंगतींनी डागळलेले आहे. 'कलाकृतीचे कलाकृतीपण ती अनुभवाची एक नवीन 'रचनाकृती' असण्यातच सामावलेले असते.' ही मर्ढेकरी व्यूहानुसारी भूमिका आणि 'रसास्वादात साकल्याने परिणाम होतो तो चैतन्यरूपाचाच' ही जीवनाला आपंगणारी भूमिका यांचे गोत्र जुळत नाही. "कला, कलानिर्मिती व कलास्वाद यांना जीवनप्रवाहापासून तोडणारे, आयसोलेट करणारे, एका उच्च आसनावर त्यांना बुद्ध्याच वसविणारे, तो अगदी स्वतंत्र प्रांत आहे, आणि अजाण लोकांनी त्यात लुडबुड करू नये असे सांगत त्या अनुभवाला सोवळे नेसून सामोरे जाणारे लोक भले शिरा ताणीत सौंदर्यचर्चा करोत, पांडित्याचा बडिवार माजवोत, पण रस्त्यातून जाताना साक्षात सौंदर्य सामोरे आले तरी ते त्यांना जाणवणारही नाही; कलाकृतीतील सौंदर्याची तर गोष्टच सोडा." समग्रच समीक्षा-

लेखन त्यांचे या त्यांनीच मांडलेल्या शपथेला अनुसरून झाले असते तर आचवलांची समीक्षा जी नंतर किंवा नंतर अधूनमधून उथळ कलावादी होते तसे विपरीत घडले नसते. आचवल पुढे जीवनप्रवाहाचा, जीवनाच्या मूलभूत प्रकृतीचा, त्याच्या चैतन्याच्या पिंडाचाच अधिक्षेप करतात. 'कलाकृतीकडे सामाजिक संघर्षातून उद्भवणारी व पुन्हा नवीन सामाजिक संघर्षांना कारणीभूत होणारी घटना म्हणून समाजशास्त्रज्ञांनी जरूर पाहावे...फक्त त्यांना 'रसास्वाद' मात्र म्हणू नये.' आचवलांच्या या विधानाला सोयीच्या मर्यादा आहेत. कलेविरुद्ध भूमिका घेणाऱ्या कुणीतरी हे म्हटले असे त्यातून जाहीर होत आहे. पण वरील विधानातील ढोबळपणाने कुणाही जीवनवादाने, मार्क्स-वादाने आपली भूमिका मांडलेली नाही. कुसुमावती देशपांडे, दि. के. बेडेकर, प्रा. मुक्ति-बोध, प्रा. कुरुंदकर कुणीही कलामूल्ये अमान्य केलीच नाहीत...पण वर आचवलांनी सुच-विली तेवढी धोपट भूमिकाही कुणी मांडली नाही. तशी सोय उपलब्ध नाही. कलास्वाद म्हणजे रचनेचा स्वाद नव्हे हे मात्र वरील सर्वांनाच सांगावयाचे आहे. आचवल सांगतात त्या सरळ पद्धतीने कलेला कोणीही जुंपले नाही. "कला" असलेली "आकृती" ही जीवनाला जबाबदार असतेच. केवळ "आकृती" बद्दल कुणाचाच काही आग्रह नसतो. फक्त कलावाद्यांना तिचे अगत्य असते. तेव्हा आचवलांच्या विवेचनात दोन तट स्वयंभूपणे दिसतात. या पुस्तकातील पहिल्या लेखात जाणवते ती एका केवळ कलावाद्याची जीवन पकडू पाहणारी अयशस्वी धडपड. जीवनप्रवाह आणि त्याचे चैतन्य आचवल आणि इतरही कला-वादी समजतात तसे सरळ शालीन कधीच नव्हते. त्यामुळे आचवलांचे या लेखातील जीवना-संबंधीचे वर्णन सोज्वळ वाटते. अवास्तव वाटते. कलाकृतीत ते या सरळ शालीन, परमात्म-रूप जीवनाचे चैतन्य पाहतात. त्यामुळे त्यांच्या रसास्वादाच्या भूमिकेच्या मर्यादा स्पष्ट होतात. रसास्वादाचे भरतवाक्य ते "रसिक मात्र गुलाबाचे फूल वोंटात घेईल, त्याच्याकडे अनिमिष नेत्रांनी पाहील व त्याचा मन भरून सुगंध घेईल." या अतिकलावादी पद्धतीने लिहितात. ते त्यांच्या भूमिकेला ठीक असले तरी हे वाचताना कवी व रसिक दोघेही भद्रायूच्या भूमिकेत दाखल होतात. तर हे गोंधळलेले, तुकड्यातुकड्यांचे, काठापर्यंत न जाताच मध्येच वेटोळे घालून पडलेले लेखन ही कलावादी भूमिका...पुढील रसास्वादने मात्र चांगली साधली आहेत...जास्वंद मध्येही याचा प्रत्यय येतो.

प्रा. रा. ग. जाधव यांच्या 'नववाङ्मयीन प्रवृत्ति व प्रमेये' या पुस्तकात साहित्यविषयक अनेक प्रश्नांची चर्चा केली आहे. या चर्चेला केशवसुतांची कविता, तुकोबांची कविता अशी काही पुस्तकांची निमित्ते आहेत तसे काही वाङ्मयीन प्रश्नांसंबंधीचे कुतूहलही कारण ठरले आहे. व्यस्ततावाद, दलित साहित्य, केशवसुतांची व्यस्ततावादी प्रकरणे, अशा विविध विषयांच्या संदर्भात प्रा. जाधवांनी साहित्यविषयक अनेक प्रश्नोपप्रश्नांची व्यासंगपूर्ण मांडणी केली आहे. वाङ्मयाच्या जाणकारांना सर्वस्वी स्वीकारणीय नाही, तरी विचारणीय आणि मोलाचे वाटावे अशी चिंतनाची कला या लेखनाला प्राप्त झालेली आहे. दलित साहित्यावरील

लेखात त्यांची सर्व सामर्थ्ये प्रकट होतात. प्रा. जाधवांचा हा लेख दलित साहित्यासंबंधी झालेल्या लेखनात उजवा वाटावा एवढ्या दमाचा निश्चित आहे. त्यामागील लेखकाच्या मताची मूल्यसच्चाई तर अपवादभूत वाटावी अशी आहे. दलित साहित्याच्या चळवळीने एवढे नक्की साधले की बुळ्या कलावादाला शरमेने काळवंडावे लागले. हिडीस मूल्यांच्या पताका त्याला खाली ठेवायला लावणारे वातावरण क्रमाने उगवत गेले. श्रेष्ठ जीवनमूल्यांचा, जीवनवादाचा सक्रिय उद्घोष या पेटल्या प्रकाराने मराठी साहित्याच्या इतिहासात प्रथमच झाला. या स्फुरणाने मराठी साहित्याला दांभिकतेपासून, कृत्रिमतेपासून, मूल्यभंजनापासून वाचविण्याची एक उफाळती शक्यता उभी केली. प्रा. जाधवांचे अशा या दलित साहित्या-संबंधीचे विचार मौलिक आहेत. वादाच्या जागा धार्मिक संदर्भातील 'मिथ' निर्मितीच्या बाबतीत आहेत. आमचे सर्वात जास्त वाटोळे धर्मांनी केले. कुणा एका धर्माच्या सावलीत बसून लिहिल्याने साहित्यच थोडे बदलेल. जीवन बदलायचे नाही. बदललेल्या जीवनाचे बदललेले साहित्य अधिक मोलाचे. तेव्हा या दलितांच्या साहित्यनिर्मितीला धर्मसंदर्भातील मार्गदर्शन तपासून घेणे आवश्यक आहे. प्रा. जाधवांची इतरही लेखनामधून प्रश्नोपप्रश्नांकडे पाहण्याची, विवेचन करण्याची पृथगात्मशैली लक्ष वेधून घेते. व्यस्ततावाद व केशवसुतां-वरील लेख विशेष महत्त्वाचे आहेत.

'आधुनिक मराठी साहित्याची समीक्षा आणि रससिद्धांत' हे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे या वर्षीचे एक महत्त्वाचे पुस्तक. या पुस्तकाची तिन्ही प्रकरणे तर्कतीर्थांनी अत्यंत रेखीवपणे लिहिलेली आहेत. पहिल्या प्रकरणात मराठी समीक्षेची उदयमीमांसा, त्या संदर्भात विष्णुशास्त्र्यांच्या कामगिरीचा गौरव आणि इतरही साहित्यविवेचनांचा विचार मोठ्या नेमकेपणाने तर्कतीर्थ करतात. पाश्चात्त्य समीक्षा हाच आधार त्या प्रारंभाच्या प्रणेत्यांनी घेतला. रससिद्धांताने त्यांचीही गरज भागली नाही. मराठी समीक्षा मुख्यत्वे रसव्यवस्थेच्या अंगाने वाढण्यापेक्षा पाश्चात्त्य समीक्षेच्या अंगाने वाढली हे तर्कतीर्थांचे सूत्र आहे. विष्णुशास्त्र्यांनी पश्चिमी व भारतीय साहित्यशास्त्राचा समन्वय साधला हीच मराठी समीक्षेची स्पष्ट प्रभात होय. या भागात या काळातील साहित्यविवेचकांचा परिचय आहे.

संगम-परंपरा म्हणजे पौर्वात्य व पाश्चिमात्य पद्धतींचा समन्वय करणारी तर पृथक परंपरा ही भारतीय साहित्यशास्त्राला फटकून वागणारी. या दोन परंपरांचा परिचय दुसऱ्या भागात आहे. गाडगिळांपर्यंतच्या टीकाकारांचा विचार करून त्यांनी खालील निष्कर्ष काढला. 'संस्कृत साहित्यशास्त्राचा वारसा आपण विशेषसा सांभाळला नाही. आधुनिक साहित्याला त्याची उपयुक्तताही आहे. परंतु ही उपयुक्तता अत्यंत मर्यादित आहे. याचे कारण ज्या युगातील ज्या साहित्यप्रकाराच्या आधारे ते शास्त्र निर्माण झाले त्या युगाची संस्कृती क्षीण झाली असून ते वाङ्मयप्रकार जवळजवळ क्षीण झाले आहेत. हे त्यांचे म्हणणे अत्यंत लक्षणीय आहे. तरी या भागातील विवेचन आतून द्विधा झाल्यासारखे वाटते. हवे-नकोच्या उंबरठ्यावर रेंगाळणारे हे विवेचन वाटते. स्पष्ट काय ते व्यक्त व्हायला हवे होते.

अनुक्रमणिका

शेवटी मर्ढेकर, गाडगीळ यांनी रसचर्चेवर घेतलेल्या आक्षेपांचे सविस्तर खंडन केले आहे. पण हा भाग स्वतंत्रपणे वादग्रस्त ठरावा असा आहे. त्यांचेच मत या संदर्भात नोंदविणे युक्त होईल. ते म्हणतात, "आधुनिक पश्चिमी ललितकलेचे व साहित्याचे शास्त्रच आधुनिक मराठी साहित्यसमीक्षेत वापरणे युक्त होय!" (पृ. ६९) असेच जर त्यांच्याच मताप्रमाणे असेल तर भारतीय साहित्यशास्त्र व त्याला केंद्रवर्ती रससिद्धांत यांची चर्चा म्हणजे शक्तीचा व बुद्धीचा अपव्यय होय असे म्हटले तर चूक ठरू नये. आणि गाडगीळ, मर्ढेकरांचे आक्षेप आक्षेपार्ह ठरू नयेत.

या वर्षीच्या पुस्तकामध्ये प्र. न. जोश्यांचे मराठी वाङ्मयाचा विवेचक इतिहास (प्राचीन खंड), हे पुस्तक महत्त्वाचे आहे. 'प्रदक्षिणेची' पाचवी आवृत्तीही या वर्षी प्रकाशित झाली. ह्या पुस्तकातील व. दि. कुलकर्ण्यांचा समीक्षेवरचा लेख नव्यानेच प्रकाशित होत आहे. हा कुलकर्ण्यांचा लेख तसाच कुलकर्णी ग्रंथागाराने 'मराठी कादंबरीची वाटचाल' हा परिसंवाद प्रकाशित केला आहे. त्यातील सरोजिनी वैद्य, विद्याधर पुंडलीक, उषा हस्तक, डॉ. वाळिंबे यांचे आणि इतरही लेख अत्यंत महत्त्वाचे आहेत. काही नवे निष्कर्ष, नवी मीमांसा त्यातून नव्यानेच पुढे येत आहे. वाङ्मयेतिहासाच्या संदर्भात अत्यंत उपयुक्त अशा स्वरूपाचे हे लेखन आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाचा शेणोलीकरांच्यानंतर प्र. न. जोश्यांचाच इतिहास अत्यंत नेमका व आटोपशीर आहे. पांगारकर आणि अ. ना. देशपांडे या प्राचीन मराठी वाङ्मयाच्या कीर्तनकारांच्या पुस्तकांच्या संदर्भात या पुस्तकाची मौलिकता प्रकर्षाने जाणवते. "कोणत्याही समाजाची विचारधारा ग्रंथाच्या माध्यमातून साकारते, विकसते हे ध्यानात घेऊन" जोश्यांनी या ग्रंथातील लेखन केले आहे. वाङ्मयप्रकारांचा पृथगात्म विचार, त्या प्रकारच्या प्रेरणा, परंपरा व पुढील निर्मात्यावरील प्रभाव या बाबींचा विचार करीत कलाप्रकारांची स्पंदने टिपणे ही वाङ्मयेतिहासाची प्रकृती. काहीसा या प्रकारचा मराठीत पहिलाच प्रयत्न महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे प्रकाशित होत असलेल्या इतिहासात दिसतो. प्र. न. जोश्यांनी अशीच नसली तरी काहीशी चांगली मांडणी सदर पुस्तकात केली आहे.

## २

'जीवन आणि साहित्य' या पुस्तकात प्रा. शरच्चंद्र मुक्तिबोध यांची एक कलादृष्टी संपूर्णत्व पावली आहे. मराठी वाङ्मयात दुमदुमणाऱ्या मर्ढेकरी सौंदर्यवादातील अपुरेपण पटवून देणाऱ्या एका भूमिकेला सुस्पष्टता आली या अर्थी या पुस्तकाला काही ऐतिहासिक मूल्यही आहे, आणि कलावादी मुक्तिबोधांनी आजवर केवळ रचनेच्या रिंगणात भरकटलेल्या पारंपरिक कलावादाला त्याच्या दुबळ्या मर्मांगांची चिकित्सक जाणीव करून देऊन एका अधिक संपूर्ण बलवंत व जीवनमय कलावादाची प्रतिमा या पुस्तकात उभी केली आहे.

आजच्या कलाविचारात या पुस्तकाला काहीसे मध्यवर्ती स्थान मिळावे इतके मौलिक स्पष्टीकरण कलासंदर्भात हे पुस्तक जरूर देत आहे.

मुक्तिबोधांची भूमिका अशी :— ललितकृती ही संवेद्य अनुभवांची सपिंड एकजिनसी रचना असते. हा एकजिनसीपणा लयतत्त्वामुळे येत नसून प्रतीतीमुळे येतो. ही प्रतीती बौद्धिक, तार्किक प्रक्रियेने सिद्ध होत नाही. ती प्रत्यक्ष अनुभवा-साक्षात्कारासारखी असते. या प्रतीति-प्रभेने ललितकृती व्यापलेली असते. तिच्या विवक्षितपणामुळे ललितकृती अनन्यसाधारण ठरते. ही प्रतीती कलाकृतीतील विविध द्वंद्वशील घटकावयवांना एकार्थाने तोलून धरणारी त्यांचा परस्परांतील ताण अटळ व सजीव करणारी असते. प्रतीतीत जाणीव गर्भित असते. प्रतीती कलकृतीपरत्वे भिन्न तर जाणीव सर्व प्रतीतिसमावेशक असते. ही जाणीव म्हणजे वृत्तिव्यवस्था. व्यक्तीच्या 'स्व' च्या ठायी असलेली, भोवतालच्या परिस्थितीचे निर्वचन करणारी व तदनुसार भावनात्मक प्रतिसाद देणारी व्यवस्था म्हणजे जाणीव. ही जाणीव वर्गीय म्हणून सामाजिक मूल्यभाव प्रकट करणारी असते. जीवनाची प्रकृती वर्गयुक्त. आर्थिक संबंधांच्या पायावरच धार्मिक, सामाजिक, नैतिक विचारांची व कल्पनांची इमारत उभी असते. पारंपरिक समाजव्यवस्था कायम राखणे हेच या विचाराचे कार्य असते. अशा वर्गीय समाजात कलावंत जन्म घेतो. वाढतो. ही वर्गीय व्यवस्था त्याच्या 'स्व'ची संघटना करते. या 'स्व'ला प्रमाण मानून कलावंत जेव्हा निर्मिती करतो तेव्हा कलेतील त्याची जाणीव एका वर्गाची म्हणून अपूर्ण असते. ती मानवी जाणीव होत नाही. पण वर्गांधपणे अनुभव न घेता 'स्व'शी संघर्ष करून तो मुक्त होतो, आकुंचित मूल्याग्रहांशी झुंज देऊन पुढे जातो तेव्हा व्यापक मूल्याधिष्ठित मानवी जाणीव जन्माला येते. ती त्याला जीवन पाहणारे डोळे देते. अनुभवाचे स्वरूप (Form) व अर्थ या जाणिवेनेच ठरतात. त्याला येणाऱ्या अनेकविध प्रतीतीचे रूप ही जाणीव ठरविते. कलेत या प्रतीतींनाच तो प्रकाशित करतो. ही मूल्यगर्भ प्रतीतीच कलाकृतीचे संघटन करते.

रूपवादी कलावादी कलेला साध्य मानतात. प्रा. मुक्तिबोधांच्या मतेही "कला कलानिर्मितीच्या प्रक्रियेच्या दृष्टीने साध्य आहे, साधन नाही.", "पण कला ही समाजाच्या सखोल प्रेरणा व जाणिवा प्रकट करण्याचे – मानवी समाजाच्या पातळीवर साधन आहे." प्रा. मुक्तिबोधांची ही विधाने केवळ कलावाद्यांना त्रास देणारी वाटतील. पण वरील दिशा, नाकारण्याला सांप्रदायिक आग्रहाशिवाय दुसरे कारण दिसत नाही. कलावंताच्या जाणिवेची मूल्याधिष्ठितता आणि निर्मितिप्रक्रियेच्या संदर्भातील कलेचे साध्यत्व ह्या गोष्टी अर्थपूर्ण आणि जीवनमूल्ये व कलामूल्ये यांच्या एकात्म प्रतिष्ठेच्या, एकरसतेच्या संदर्भात मौलिक आहेत. ही मांडणी मराठी समीक्षेत नवीन आहे.

मर्यादित वर्गीय जाणिवेत वाढलेला 'स्व' त्याच जाणिवेचा चाहता समाज यांच्याशी संघर्ष न करता जे कलावंत वर्गांध दृष्टीने लेखन करतात, त्यांच्या कलाकृती कलाकृती ठरल्या तरी अस्सल कलाकृती ठरत नाहीत. खांडेकर, फडके, पटवर्धन यांच्या साहित्याची या

संदर्भात उदाहरण म्हणून त्यांनी चिकित्सा केली आहे. आणि जीवनजाणिवेचा संबंध ' कलात्मकतेशीच ' पोचतो हे त्यांनी स्पष्ट केले आहे.

कलामूल्ये म्हणजे रचनामूल्येच हे प्रचलित कलावाद्यांचे प्रमेय मुक्तिबोधांच्या या विचाराने खोडले जाते. त्यांना रूपबंध मान्य आहेच. पण ही रूपरचनेची तत्त्वे आशय-रचनेचीच तत्त्वे असतात. प्रतीती ही मानवी जीवनाच्या संदर्भात मूल्यगर्भ. तिचा आकार तिचा. आकाराची, तिच्या प्रतीतिमूल्याच्या संदर्भात मूल्यवत्ता. म्हणजे मर्ढेकर आणि इतरही कलावादी यांच्यापेक्षा ही भूमिका निश्चितपणे भरीव आहे.

अनुभूतीची जीवनाची मूलात्म प्रकृती गोचर करण्याची ताकद हे वाङ्मयमूल्य ठरणे अपरिहार्य आहे. पण वर्गीय जाणीव जीवनाच्या अर्ध्याहून अधिक भागावर नियंत्रण करीत असली तरी मृत्यू आणि काही इतर शारीर व मानस व्याधींचे जटिल संदर्भ वर्गीय जाणीव-क्षेत्रात अंतर्भूत होत नाहीत. त्यामुळे केवळ वर्गीय जाणीव सर्व कलाविश्वाची निर्विवाद मूल्यवत्ता सांगू शकेल किंवा नाही याची शंका वाटते. मार्क्सवादी विचारात कलाप्रश्नाचा विचार करताना भर घालावी लागेल हे लेखकाचे म्हणणे ध्यानात वाळगूनही जीवनप्रकृतीच्या समग्र संदर्भांचे म्हणूनच समग्र कलासृष्टीचे स्पष्टीकरण वरील वर्गीय भूमिकेने मिळणे असंभव वाटणे साहजिक आहे. तरी मर्ढेकरांच्या रूपनिष्ठ, तंत्रवादी विचाराच्या फार पुढचा टप्पा मुक्तिबोधांच्या मीमांसेने गाठला. मुक्तिबोधांच्या भूमिकाक्षेत्रात ज्या जीवन-प्रदेशाचा अंतर्भाव होतो त्याचे कलेच्या संदर्भात अत्यंत ठोस आणि पटेल असे स्पष्टीकरण मुक्तिबोध देतात. मर्ढेकरांच्या कलामीमांसेचे हात याही टप्प्यापर्यंत पोचले नव्हते. तिची ती प्रतिज्ञाही नव्हती. अर्थात अपवाद म्हणून प्रा. वा. ल. कुलकर्ण्यांची कलामीमांसा विषय संदर्भात बाजूला ठेवणे भाग आहे.

प्रत्यक्ष वर्गीय जाणीवक्षेत्रात जी जीवनांगे येतात त्या संदर्भातील त्यांची भूमिका मोलाची आहे. त्यासंबंधी वाद नाही. पण पोतवरील समीक्षणात ते संतांच्या, महानुभावांच्या संदर्भात ती भूमिका लावून दाखवितात तेव्हा मतभेदांना प्रारंभ होतो. पण तो भाग स्वतंत्र चिकित्सेचा आहे. त्यांच्या वरील भूमिकेला तिच्या आवाक्यात कुठलेही उणे येत नाही.

**काही निष्कर्ष :** ( १ ) पहिल्या भागातील सन्माननीय पुस्तके जुन्या मातब्बरांनी व काही नव्या लोकांनी लिहिलेली सुमार पुस्तके आहेत. नवी दृष्टी, नवा विचार, नवी रसिकता अशा कोणत्याही गोष्टीचे पृथगात्म दर्शन या पुस्तकांमध्ये नाही. ' सांप्रदायिक ' ओढीने लिहिली गेलेली ही पुस्तके. काही लेखक वाचकांच्या मागासलेपणाचा फायदा जन्मभर घेतात. या भागातील बहुतेक पुस्तके अशा काही दुर्दैवी योगाने छापणीय ठरलेली आहेत. सामान्य-पणे विद्यार्थ्यांमध्ये गैरसमजुतींचा धूर पसरविण्यात अशा पुस्तकांचा मोठा वाटा असतो. अशा लेखकांच्या लेखनामुळे वाङ्मयातील जागांची मोठी विपरीत अदलाबदल होते. बोरीबाभळी अशांच्या लेखनातून चिरंजीवित्वाला जखमी करीत उगाचच वर्षानुवर्षे जगत असतात. कुठल्याही भाषा-साहित्याला हे दुःख भोगणे भाग असते.

( २ ) दुसऱ्या भागातील पुस्तके अधिक प्रगल्भ. बुद्धिमत्ता, व्यासंग, रसिकता यांचा ओळीओळीत प्रत्यय देतात. वैचारिकतेच्या तोलबिंदूवरून आपल्या ताकदीचा प्रत्यय देणारी ही पुस्तके आहेत. नेहमीच्याच प्रश्नांशी इतकी नवी नसली तरी ताकदीची झुंज ही पुस्तके देतात. साहित्याभ्यासाला कधी नवे आणि मौलिक व्यवस्थापन करू पाहणारी आणि चिकित्सेच्या नव्या शक्यतांच्या शक्यता निर्माण करणारी अशी या गटातील पुस्तके आहेत.

( ३ ) जीवन आणि साहित्य हे या गटातील पुस्तक. काहीसे दुर्लक्षित. पण या वर्षीच्या समीक्षाव्यवहारात सर्वांत महत्त्वाचे. कलेच्या मूल्यनिर्णयाची एक मजबूत दिशा गाठणारे अलीकडच्या काळात मवाली-अभिरुचीवर तावा मिळविणाऱ्या मर्ढेकरी कला-सौंदर्यवादाच्या, संदर्भात वेगळा जीवनवादी सौंदर्यवाद तात्त्विक पातळीवरून गंभीरपणे मांडणारे हे पुस्तक.

प्रा. शरदचंद्र मुक्तिबोध आणि तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची पुस्तके क्रमाने या वर्षीची एकूणच समीक्षेत महत्त्वाची पुस्तके.

## साभार पोच

**पुणे विद्यापीठ प्रकाशन :** श्री. का. न. केळकर; शमीपूजन, पृष्ठे २८०, किं. १२ रु.

**साहित्यशास्त्र आणि कला :** प्रा. शिवाजी रामचंद्र चव्हाण आणि प्रा. पंडित भिमराव टापरे, साहित्य सेवा प्रकाशन सातारा, पृ. २९१, किं. २० रु.

**Evolution of The Sanskrit Language From Panini to Patanjali :** by Sureshachandra Dnyaneshwar Laddu.— University of Poona – Price Rs. 40 Pages 288.

**विचार जागृती :** डॉ. वा. दा. गाडगीळ — मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, हैद्राबाद; पृ. १७५; किं. १२ रु.

**विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९७४ :** प्रा. मधुकर रामदास जोशी विदर्भ संशोधन मंडळ नागपूर; पृ. २३७; किं. ८ रु.

# प्राचीन मराठी साहित्य १९७२

डॉ. वसंत स. जोशी

जुन्या गद्य व पद्य वाङ्मयाचे संशोधन निष्ठेने व सातत्याने करणारे संशोधक दिवसेंदिवस कमी होत चालले आहेत. त्यासाठी लागणारी निष्ठा, परिश्रमशीलता दुर्दैवाने कमी आढळत आहे. राजवाडे, भावे, पांगारकर, देव इ. च्या पिढीने ज्या निष्ठेने व त्यागाने प्राचीन मराठी साहित्याचे मुवर्णकण जमविले, त्यावरच बव्हंशी पुढीलांना गुजराण करावी लागत आहे. वाङ्मयेतिहास लेखनाच्या संदर्भात याची तीव्रतेने जाणीव होते. ग्रंथाची नव्याने होणारी उपलब्धी, लेखक-कवी चरित्र, स्थल-कालविषयक चर्चा व ग्रंथाचा स्थूल परिचय हे प्रारंभीच्या संशोधनपर लेखनाचे स्वरूप असे. त्याचीही एक गरज होती व आजही आहे. त्यानंतर उपलब्ध काव्याचे वाङ्मयीन मूल्यमापन हा दुसरा टप्पा व त्या आधारे त्या त्या काळातील वाङ्मयप्रवाहांचे स्वरूप स्पष्ट करणे हा तिसरा टप्पा व्हावयास हवा होता. जुन्या साहित्याचे नव्या दृष्टिकोणातून परिशीलन करणारे काही समीक्षक आज दिसत असले तरी त्या दिशेने प्रचंड कार्य अद्यापिही व्हावयाचे आहे.

राजवाडे, भावे आदींची पिढी विशिष्ट विचारांनी भारलेली व आग्रही होती. त्यामुळे त्यांच्या लेखनात क्वचित कोठे एकारलेपणा येतो. आजच्या लोकशाहीच्या जमान्यात सर्व वर्गांच्या भावनांची जपणूक हा लोकसंग्रहाचा विशेष असल्याने केवळ वाङ्मयीन व बौद्धिक क्षेत्रांतील मतांना आव्हाने मिळतात ती राजकीय पार्श्वभूमीवर, आणि त्यांची परिणती 'महाराष्ट्र सारस्वता'सारखा प्रतिष्ठित ग्रंथ अभ्यासक्रमातून काढण्यात होते. तुकाराम-रामदासांची, आपल्या विशिष्ट शैलीत भाव्यांनी केलेली अनुचित तुलना चर्चात्मक पद्धतीने खोडून न काढता, तो ग्रंथच विद्यार्थ्यांसमोर न ठेवण्याचा आग्रह धरला जातो. त्यात वाङ्मयेतर निकषांवरच अधिक जोर दिलेला असतो. दुर्दैवाने या प्रवृत्तीला जोरदार विरोध करून, वैचारिक क्षेत्र त्यापासून दूर ठेवण्याचा आग्रह धरला गेलेला दिसत नाही. गंमत अशी की, या ग्रंथाच्या आधाराशिवाय अध्ययन–अध्यापनक्षेत्रात प्रवेश व वाटचाल करता येत नाही. यातून निर्माण झालेल्या गरजेपोटी या वर्षात एक-दोन वाङ्मयेतिहासावरील ग्रंथ

अनुक्रमणिका

तयार झालेले दिसतात.

'मराठी वाङ्मयाचा विवेचक इतिहास' (प्राचीन-खंड) हा डॉ. प्र. न. जोशी यांचा अशा तऱ्हेचा ग्रंथ. 'महाविद्यालयातील प्रौढ विद्यार्थी व सर्वसामान्य वाङ्मयप्रेमी यांच्यासाठी तो असल्याचे लेखकांनी आपल्या 'मनोगता 'त स्पष्ट केले आहे. तो सर्वसंग्राहक व आटोपशीर करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. प्राचीन मराठी वाङ्मय प्राधान्याने पंथीय तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करणारे असल्यामुळे मध्ययुगीन धर्मसाधनेचा परिचय त्यांनी एका प्रकरणात घडविला आहे. तत्पूर्वीच्या दोन प्रकरणांत मराठी भाषा, लोक, प्रदेश, विविध सांस्कृतिक प्रवाह यांचा मागोवा घेण्यात आला आहे. त्यानंतर मुकुंदराज ते बखरकारांपर्यंतचा सुमारे आठशे वर्षांचा वाङ्मयेतिहास धावत्या स्वरुपात लेखकांनी मांडला आहे. त्यात त्या त्या प्रकरणाच्या प्रारंभी आजवर झालेल्या अभ्यासांचा त्रोटक आढावा व नव्याने उपलब्ध झालेली माहिती चर्चात्मक स्वरुपात दिलेली आहे. स्वतः लेखक संतवाङ्मयाचे व्यासंगी अभ्यासक असल्याने त्यांच्या लेखनात जिव्हाळा व ओघ आपोआपच आला आहे. परंतु ३६० पृष्ठांच्या या ग्रंथात काही कवींना झुकते माप, तर काहींच्या बाबतीत हात आखडता घेतला गेला आहे. प्रारंभीची ७७ पाने पार्श्वभूमीदाखलच्या प्रकरणासाठी खर्ची पडली आहेत. फादर स्टीफन्सला अडीच पाने, तर मुक्तेश्वरासारख्या प्रतिभासंपन्न कवीला उताऱ्यांसह दोन पाने मिळतात. शाहिरी व बखर वाङ्मयावरील प्रकरणे धावत्या स्वरुपात लिहिलेली दिसतात. तथापि उपलब्ध माहिती, अंगोपांगांसह गृहीत मर्यादित देण्याचा लेखकांनी साक्षेपाने प्रयत्न केल्याचे जाणवते. भावे–पांगारकरांचे विस्तृत वाङ्मयेतिहास अभ्यासताना त्यातील विस्तृतता व पाल्हाळ जाणवत राहतो. डॉ. प्र. न. जोशी यांनी आपला हा इतिहास आटोपशीर बनवून अभ्यासकांच्या आवाक्यात आणला आहे. कोल्हापूरचे डॉ. ल. रा. नसिराबादकर यांनीही या वर्षी प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथलेखनाविषयी लेखकांनी स्वतःच एक मर्यादा घालून घेतली आहे. ते पदवी परीक्षांच्या विद्यार्थ्यांसाठी अभ्यासक्रमाच्या भूमिकेतून लिहिलेले पुस्तक आहे. प्रा. अद्वंत यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे हा वाङ्मयाचा इतिहास म्हणजे प्राचीन वाङ्मयाचा विस्ताराने परिचय करून देणारा ग्रंथ नाही. हे प्राचीन वाङ्मयाच्यदालनात शिरण्यासाठी उभारलेले प्रवेशद्वार आहे. डॉ. नसिराबादकर यांनी रोचक शैलीत कवींचा व काव्यग्रंथांचा रसोद्ग्राही परिचय करून दिला आहे. अभिनिवेशाविरहित लेखन हे या दोन्ही ग्रंथांचे एक स्वागतार्ह वैशिष्ट्य म्हणावयास हवे. प्राचीन मराठी वाङ्मयातील विविध प्रवाहांचा परिचय करून घेण्यासाठी आवश्यक असलेली पार्श्वभूमी मात्र प्रा. नसिराबादकरांनी केवळ दोन पानांत दिली आहे, ती अधिक विस्तृत हवी होती. शिवाय संशोधना विषयांच्या चर्चेत आपण गुरफटलो नाही तरी त्या त्या ग्रंथकर्त्यांविषयीची अद्ययावत माहिती देणे आवश्यक असते. पारंपरिक वाङ्मयेतिहास लेखनाहून एक वेगळी पद्धती प्रा. नसिराबादकर यांनी या ग्रंथात अनुसरली आहे. मराठी वाङ्मयेतिहास लेखनाची विविधांगे

प्रकट होण्याच्या दृष्टीने असे उपक्रम स्वागतार्हच म्हटले पाहिजेत.

महानुभाव पंथातील प्राचीन साहित्य आता सांकेतिक लिपीच्या कडी–कुलपातून बाहेर येऊ लागले आहे. क्वचित कोठे अद्यापि सनातनी कर्मठपणा दिसत असला तरी या वाङ्मय-प्रकाशनाने पंथाभोवती पसरलेले गैरसमजाचे अभ्र आता दूर होत असल्याची जाणीव पंथीयांना तशीच त्या वाङ्मयाच्या अभ्यासकांनाही होऊ लागली आहे. या दृष्टीने जाणीवपूर्वक प्रयत्न करणाऱ्यांत हैदराबादच्या आध्यात्मिक साहित्य प्रकाशनाचे व ' महानुभाव ' मासिकाचे संस्थापक महंत श्रीकृष्णदासजी महानुभाव यांचे स्थान अग्रगण्य आहे. त्यांनी डॉ. कोलते, प्रा. व. दा. कुलकर्णी, ना. ब. जोशी, ज. शा. देशपांडे आदि व्यासंगी संशोधकांचे साह्य घेऊन पंथीय साहित्य सातत्याने प्रकाशात आणण्याचा उपक्रम चालू ठेवला आहे. ' अमृत-वाणी ' नावाचे एक हिन्दी मासिकही पंथीय तत्त्वज्ञान व साहित्याच्या प्रसारासाठी त्यांनी सुरू केले आहे. त्यांच्या ' आध्यात्मिक साहित्य प्रकाशना 'ने व उस्मानिया विद्यापीठाने प्रा. व. दा. कुलकर्णी यांची ' साधनामृत स्तोत्र ' व ' डंगवै पुराण ' ही दोन पुस्तके प्रकाशित केली आहेत. हैदराबादच्या उस्मानिया विद्यापीठाच्या मराठी विभागातर्फे गेली कित्येक वर्षे प्रसिद्ध होत असलेली ' मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका ' संशोधन-प्रकाशनाचे एक अत्यंत मोलाचे कार्य करीत आहे. या विभागातील तरुण व व्यासंगी संशोधक प्रा. व. दा. कुलकर्णी यांनी अनेक अप्रसिद्ध काव्यांचे साक्षेपी संशोधन व संपादन केले आहे. समालोचन वर्षातील त्यांच्या दोन पुस्तकांचा परामर्श येथे घ्यावयाचा आहे.

स्तोत्रवाङ्मय श्रद्धाळू भक्त–भाविकांमध्ये अधिक लोकप्रिय असते. परमेश्वरोपासनेचा सामान्यांना सुलभ असा तो मार्ग असतो. मानसिक प्रसन्नता व नीतिधैर्य रक्षणासाठी व वर्धनासाठी त्याचा उपयोग होऊ शकतो. प्रापंचिक तापाने तापलेल्या मनुष्याला असा एक आधार आवश्यक वाटून तो प्रणतवत्सल, दयाघन शरणागतरक्षक प्रभूची अंतःकरणपूर्वक प्रार्थना करतो. ही अनन्यशरणता श्रद्धाभावातून तशीच अगतिकतेतूनही निर्माण झालेली असू शकते. पतितांच्या उद्धारकाची गरजही यातूनच निर्माण होते. संस्कृत व प्राकृत भाषांतून अशी अनेक स्फुट व दीर्घ स्वरूपाची परमेश्वरविषयक स्तुतिस्तोत्रे उपलब्ध आहेत. कवी डिंभ मुनी कृष्णदास यांनी रचिलेले ' साधनामृत स्तोत्र ' हे अशाच प्रकारचे ७६ श्लोकांचे काव्य आहे. मारुतीस्तोत्र, देवीस्तोत्र, व्यंकटेशस्तोत्र पठण करणाऱ्या सुशिक्षित–अशिक्षित व्यक्ती सर्वत्र पाहावयास मिळू शकतात. त्याचप्रमाणे महानुभाव पंथीयांना पठणास योग्य असे हे स्तोत्र कवी डिंभमुनी यांनी रचिले आहे. त्यात स्मरणभक्ती उत्कटत्वाने भरून राहिली आहे. श्रीचक्रधरांच्या अनेकविध लीळांचे भावपूर्ण स्मरण त्यात करण्यात आले आहे. यात कवीचे आत्मनिवेदनही आहे. गुरुमुखीचे शास्त्र–मनन–मंथनाच्या द्वारे सतत रक्षिले जावें, अशी त्याची इच्छा आहे आणि ' पढति मुनि सदाजे दोष जाती तयांचे ' अशी फलश्रुतीही त्याने सांगितली आहे. कृष्णमुनी विराटदेशे या नावाने प्रसिद्ध असलेला हा कवी डिंभ अनेक ग्रंथांचा कर्ता आहे. त्याच्या या ' साधनामृत स्तोत्रा 'चे प्रा. व. दा

कुलकर्णी यांनी केलेले संपादन व संशोधन पंथीय व अभ्यासू यांना उपयुक्त ठरणारे आहे. या काव्यातील श्लोकांचे नेमके संदर्भ देऊन मूळ काव्याचा आशय त्यांनी अधिक स्पष्ट केला आहे. प्रस्तावनेत प्रा. कुलकर्णी यांनी या स्तोत्राचे वाङ्मयीन व भाषिक स्वरूप विशद करून सांगितले आहे. कोणत्याही दैवतविषयक स्तोत्राला त्याची स्वतःची अशी एक मर्यादा असते. इतरांना त्याच्याविषयी रस वाटण्याची शक्यता नसते, अपेक्षाही नसते. काव्यदृष्ट्या हे स्तोत्र तितकेसे सरस वाटले नाही तरी महानुभाव पंथीयांना ते नित्यपठन योग्य निश्चितच आहे.

'डंगवै पुराण' हे संजीवन अनंत प्रसादे (?) या कवीने लिहिलेले एक आख्यान काव्य आहे. सहा प्रसंग व ४५० ओव्यांत त्याची मांडणी कवीने केली आहे. श्रीकृष्ण व कौरव-पांडव यांच्यातील युद्धाचा रोमहर्षक प्रसंग यात वर्णिला असून तो लोककथांवर आधारित असावा. श्रीकृष्णाचे श्रेष्ठत्व या प्रसंगाने सिद्ध होत असल्यामुळे या ग्रंथाच्या सकळ लिपी-तील अनेक पोथ्या महानुभाव मठातून उपलब्ध झाल्या आहेत, त्यांचा संपादकांनी उत्तम उपयोग करून घेतला आहे. महानुभाव तत्त्वज्ञानाचा प्रत्यक्ष पुरस्कार या ग्रंथात नसला तरी वेगळे तत्त्वज्ञानही त्यात पुरस्कारिलेले नाही. कदाचित कवीने नंतरच्या काळात या पंथाचा स्वीकार केला असावा. प्रचलित आख्यानकाला 'पुराण' हे भारदस्त नाव देऊन त्याची प्रतिष्ठा उंचावण्याचा प्रयत्न कवीने केलेला दिसतो. 'दुर्वास ऋषीच्या शापाने इंद्रलोकीची अप्सरा उर्वशी मृत्युलोकात डांगवी राजाजवळ अश्विनी होऊन येते आणि तिच्या प्राप्तीसाठी श्रीकृष्ण हा पांडव-कौरवांविरुद्ध युद्ध करतो' असा अश्रुतपूर्व प्रसंग या काव्यात कवीने रंगविला आहे. याच कथानकावर संजीवन, गोविंदसुत, यशवंतसुत आणि नरसिंह गजांकुश इ. कवीं-नीही काव्यरचना केली असून त्यांचाही परिचय संपादकांनी करून दिला आहे. शेवटी उपलब्ध हस्तलिखितांचे वेगळे पाठ देऊन अभ्यासकांची सोय केली आहे. प्रा. कुलकर्णी यांनी या आख्यानाचे मूळ, कविनाम व आख्याननाम, काव्याचे तौलानिक व भाषिक स्वरूप स्पष्ट करणारी विवेचक प्रस्तावना लिहिली आहे. कविनामासंबंधी दुसरी एक संभाव्य कल्पना येथे विचारात घेतली पाहिजे. प्रस्तुत कवी किंवा त्याचा गुरू यांचेसंबंधी फारशी माहिती मिळत नाही. प्रस्तुत काव्याच्या सहाही प्रसंगांत कवीने 'श्रुतां संजीवनु सांघैल : अनंतप्रसादे,' किंवा 'ते श्रोतयां संजीवने : सांघीतले अनंतप्रसादे' असे स्वतःसंबंधी निर्देश केलेले आहेत. यातील 'अनंत' हा शब्द संपादकांनी म्हटल्याप्रमाणे 'श्रीकृष्ण–परमेश्वर' या अर्थीही असू शकतो. दुसऱ्या एका संजीवन नामक कवीपासून प्रस्तुत कवीचे वेगळेपण दाखविण्याकरिता संपादकांनी 'संजीवन अनंत प्रसादे' असा त्याचा नामनिर्देश केला आहे. परंतु या सहाही प्रसंगांतील उल्लेखात 'प्रसादे' हा शब्द 'प्रसादाने' (म्ह. कृपेने) या अर्थी योजिण्यात आल्याचे सहज लक्षात येण्यासारखे आहे. तेव्हा 'प्रसादे' हा शब्द कविनामदर्शक नाही असे म्हणावे लागते. प्रा. कुलकर्णी यांनी उपयोगिलेली हस्तलिखित प्रत शके १५६८ ची असून तीत प्राचीन मराठीतील अनेक शब्दरूपे आढळतात. कृष्ण याज्ञवल्कीच्या 'कथाकल्पतरू' या ग्रंथात प्रथमच येणाऱ्या डांगवी कथेचा भाग व प्रस्तुत

हस्तलिखित प्रत यांच्या आधारे प्रा. कुलकर्णी यांनी प्रस्तुत कवीचा काळ १५–१६ वे शतक असा मानिला आहे. विवेचक प्रस्तावना, अन्य कवींच्या काव्यांचा परिचय, पाठ-स्वरूप, शब्दार्थ टीपा इ. देऊन प्रा. कुलकर्णी यांनी साक्षेपाने या काव्याचे संपादन केले आहे. काव्य व भाषादृष्ट्या ' डंगवै पुराण ' अभ्यसनीय आहे.

महानुभाव पंथातील प्रमुख व्यक्तींचा परिचय करून देणारे ' महानुभाव संत ' हे डॉ. वसंत स. जोशी यांचे पुस्तक याच वर्षी प्रसिद्ध झाले. गोविंद प्रभू, चक्रधर, नागदेवाचार्य, महेंद्रभट, भास्कर व महदाइसा यांचा सलग व सविस्तर जीवनपट प्रथमच मराठी वाचकां-समोर या निमित्ताने आला आहे. सुरुवातीच्या ' पूर्वपीठिका ' या प्रकरणात महानुभाव चरित्र ग्रंथांची प्रेरणा व स्वरूप डॉ. जोशी यांनी स्पष्ट केले असून महेंद्रभट हा या ग्रंथाचा लेखक नव्हे, तर संकलक व संपादक असल्याचे सिद्ध केले आहे. त्यामुळे एकाच व्यक्तीची कृती कल्पून अशा चरित्र ग्रंथांचा शैली व रचनादृष्ट्या होणारा विचार तपासून पाहण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. या ग्रंथात गोविंद प्रभू पूर्वअवतारी पुरुषांची चरित्रेही आली असती तर बरे झाले असते. शेवटच्या प्रकरणात महानुभाव वाङ्मयाची परंपरा सांगून परिशिष्टात चक्रधरविषयक विविध मतांचा परामर्श घेतला आहे. ' महानुभाव ' मासिकात व अन्यत्र वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या साहित्याचा एकत्र आढावा घेऊन त्यांचे पंथीय व वाङ्मयीन स्वरूप सांगितले गेल्यास ते अधिक उपयुक्त होईल.

' नवभारत ' मासिकात कै. प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी या वर्षी प्रसिद्ध केलेला ' सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश ' हा खिरस्ती गद्य ग्रंथ लक्षणीय आहे. दुर्दैवाने प्रियोळकरांचा हा शेवटचा संशोधित ग्रंथ ठरला. आपल्या नित्याच्या परिश्रमशीलतेने आणि निष्ठेने या ग्रंथाचा व ग्रंथकर्त्यांचा शोध घेऊन तो मराठी वाचकांसमोर ठेवण्याचे बहुमोल कार्य प्रियोळकरांनी केले आहे. या ग्रंथास आवश्यक त्या टीपा, शब्दकोश इ. देऊन अधिक कटाक्षाने संपादन करण्याची इच्छा असूनही, अखेरच्या आजारपणामुळे ते कार्य त्यांच्या हातून होऊ शकले नाही. तथापि या ग्रंथाची उपलब्धी व त्याचे स्वरूप स्पष्ट करणारी छोटीशी प्रस्तावना त्यांनी लिहिलेली आहे. ' सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश ' या ग्रंथाचा कर्ता सिमांव गॉमिश हा पोर्तुगीज धर्मोपदेशक असून स. १७०९ नंतरच्या दोन-चार वर्षांत त्याने तो लिहिला असावा, असे प्रा. प्रियोळकरांचे मत आहे. सिमांव गॉमिश याचा जन्म व्हेमेल ( पोर्तुगाल ) येथे १६४७ साली झाला. गोव्याच्या जेजुईट सोसायटीत त्याने १६६१ साली प्रवेश केला. पुष्कळ वर्षे गावचा मुख्य धर्मोपदेशक म्हणून त्याने सासष्टी ( गोवे ) येथे कार्य केले आणि तेथील स्थानिक भाषेत प्रावीण्य मिळविले. १७०९ साली " देशु " येथे त्याने क्रिस्ती मिशनची स्थापना केली. तो रायतूर ( गोवें ) येथे १७२२ साली वारला. ' सिमांव गॉमिश याने आपल्या ग्रंथाची रचना घाटमाथ्यावरील मराठ्यांच्या भाषेत केली असून ती अठराव्या शतकातील मराठी गद्याचे तात्त्विक विचार-प्रतिपादनाचे सामर्थ्य दर्शविणारी आहे. मूळ संहितेत या ग्रंथाचे नाव ' सर्वेश्वराचा ग्नाव उपदेश ' असे

दिलेले आहे. या ग्रंथाचे सहा भाग असून त्यांच्या उपविभागांना ' तेज ' असे नाव देण्यात आले आहे. सिमांव गॉमिश याने हिंदूंच्या देव-देवता, समाजव्यवस्था, आचार-विचार यांचे सूक्ष्म निरीक्षण केलेले असून त्यांची मर्मभेदी चर्चा तो आपल्या विवेचनात करतो. खंडन-मंडनाची थोडी आक्रमक वृत्तीही तीत येते. सत्यवंत देवाची लक्षणे त्याने विवरून सांगितली आहेत. हिंदूंची जातिव्यवस्था व पुनर्जन्मविषयक विचारांवर त्याने भेदक टीका केली आहे. या ग्रंथामुळे अठराव्या शतकातील महाराष्ट्रीयांच्या सामाजिक व धार्मिक परिस्थितीवर फार चांगला प्रकाश पडू शकतो. प्रा. मे. पुं. रेगे यांनी हा ग्रंथ क्रमशः प्रसिद्ध करून एक मोलाचे कार्य केले आहे. जुन्या मराठी गद्यवाङ्मयात ' सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश ' या ग्रंथास वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. मराठेशाहीच्या काळात वैचारिक साहित्यासाठी गद्याच्या माध्यमाचा वापर मोठ्या प्रमाणात होऊ लागला होता. त्या दृष्टीने ख्रिस्ती साहित्यानेही पद्याचा आसर सोडून गद्य माध्यम पत्करलेले दिसते. यापूर्वीच्या ख्रिस्ती मराठी ग्रंथांवर मराठी ओवीबद्ध ग्रंथांची व कोकणी प्रतिष्ठित व्यक्तींच्या भाषेची छाप आहे. सिमांव गॉमिश याचेवर असा प्रभाव दिसत नसून घाटमाथ्यावरील भाषेचा वापर त्याने केल्यामुळे त्याच्या ग्रंथाला भाषिक व रचनादृष्ट्याही आगळे स्वरूप लाभले आहे. या ग्रंथाची फलश्रुती मात्र पारंपरिक पद्धतीची आहे. लेखक म्हणतो, ' स्पीरीतु सांतु सर्वेश्वर अम्हास सांगत्यात ॥ छ ॥ अणीक अंम्ही ह्या उपदेशाशेवटी तुला आठव करीतो ॥ घेतोस तर बुधीवंत होऊन ॥ मोक्षास जाशी ॥ नाही तर ॥ अग्न्यानामध्ये मरून ॥ नरकात पडशील ॥छ॥ काय होवे म्हणून ॥ बरे करून वग ॥ अणीक अम्हांवर रागीष्ट होउन ॥ दावा ठेउ नका ॥ सांगीतलें तें ॥ अवघें सर्वेश्वराला स्तोत्र ॥ तुला बरवें येयाला सांगितलं ॥छ॥

' गंगाजळी ' हा सुप्रसिद्ध संशोधक श्री. रा. चिं. ढेरे यांच्या पंधरा लेखांचा व अकरा शोधटिपणांचा संग्रह या वर्षी प्रसिद्ध झाला. साधन-साहित्याचा सतत धांडोळा घेत राहणे, आवश्यक तर संबंधित स्थळांना भेटी देणे, अनुषंगाने सुचलेल्या नव्या दुव्यांचा शोध घेणे व त्यांच्या चिंतनातून साकार झालेले नवे विचार शब्दांकित करणे हा श्री. ढेरे यांचा आवडता छंद आहे. प्रस्तुत संग्रहातही त्यांच्या शोधयात्रेतून जन्मास आलेले विचारप्रवर्तक संशोधन संग्रहीत झाले आहे. ' नाथपंचका'त समाविष्ट असलेल्या, परंतु अपुऱ्या माहितीमुळे दुर्लक्षित राहिलेल्या विठा रेणुकानंदन, जनी जनार्दन व रामाजनार्दन या तीन सत्पुरुषांच्या जीवनावर व काव्यावर त्यांनी या ग्रंथात नवा प्रकाश टाकला आहे. त्यांच्या शोधयात्रेत लाभलेल्या कथा, आख्यायिका, चरित्रादी साधनांचा स्वीकार त्यांनी श्रद्धापूर्वक केला आहे. तथापि पारंपरिक, सांप्रदायिक स्वरूपातील उत्तरकालीन ग्रंथांची विश्वसनीयता शंकास्पद असते. वंशजांनाही आपल्या थोर पूर्वजांची नीटशी कल्पना असत नाही. तथापि उपलब्ध सामग्रीही कालाच्या ओघात नष्ट होण्याची शक्यता असल्यामुळे श्री. रामभाऊ ढेरे यांनी ती परिश्रमपूर्वक साक्षेपाने अभ्यासूंच्या पुढे ठेविली आहे. जनीजनार्दनविषयक माहिती देताना त्यांचा बीडचा शिष्य एकनाथ याच्याविषयीची चर्चा त्यांनी केलेली दिसत नाही. ज्ञानेश्वर-

विषयक आरतीमुळे ख्यातनाम झालेल्या रामाजनार्दनाच्या अन्य एक-दोन स्फुट पदांच्या आधारे श्री. ढेरे यांनी त्यांच्या स्थळकाळाचा जो शोध घेतला, त्यामुळे जनार्दनस्वामी व पैठणकर एकनाथ यांच्याही जीवनातील काही घटनांचा उलगडा होऊ शकला व नवे दुवे उपलब्ध झाले. हरिबुवा भोंडवे या अल्पज्ञात साधुपुरुषाच्या जीवनाचा व साहित्याचा परिचय श्री. ढेरे यांनी प्रथमच घडविला आहे. नामदेव व मध्वमुनीश्वर यांच्या काव्याचा रसोद्ग्राही परिचय घडविणारे दोन लेख या संग्रहात आहेत. ' नामदेव गाथ्याची संहिता-शुद्धी ' या लेखात अनेक अपपाठांनी युक्त संहितेतील दोषस्थळे व त्यांची हास्यास्पदता श्री. ढेरे यांनी दाखवून दिली आहे. नामदेव गाथ्याची पाठशुद्ध आवृत्ती शासन प्रकाशित करू शकले नाही व करूही शकणार नाही. ते कार्य एखाद्या संशोधन संस्थेलाच करावे लागणार आहे. ज्ञानदेवांप्रमाणेच नामदेवांच्याही गळ्याला लागलेली ही अज्ञानवृक्षाची मुळी सोडविण्याचा प्रयत्न ढेरे यांच्यासारख्या संशोधकांनीच आता करणे जरुरीचे आहे. ' महिपतीचा नवा अवतार ' हा मराठी संतचरित्रे व साहित्य इंग्रजीत नेणाऱ्या जस्टिन एडवर्ड्स ॲबट यांच्या जीवनकार्याचा परिचय करून देणारा लेख आणि ' राष्ट्रीय उत्थानाचे शोधपर्व ' हा राजवाड्यांच्या संशोधन कार्यांची चिकित्सा करणारा लेख म्हणजे आपल्या पूर्वसूरींना या श्रद्धावान संशोधकाने वाहिलेली श्रद्धांजलीच आहे. या दोघांच्याही जीवितकार्याचे यथार्थ पण हलुवार मूल्यामापन श्री. ढेरे यांनी केले आहे. ' महाराष्ट्रातील मुद्रणपूर्व ग्रंथव्यवहार ' हा या लेखसंग्रहातील लेख ढेरे यांच्या व्यासंगी, चिकित्सक लेखनाचा एक उत्तम नमुना आहे. ग्रंथव्यवहाराच्या अनेकांगांचा साधार विचार त्यांनी यात मांडला असून तो जाणत्यांना, तसाच सामान्य वाचकालाही रंजक आणि उद्बोधक वाटेल. ' हरिहर प्रेमभावे आलेखेवा ' हा लेख महाराष्ट्रीय भक्तिपरंपरेतील अद्वैतभावनेचे सूत्र स्पष्ट करतो. शेवटी दिलेल्या ' शोधशलाका ' नव्या संशोधन विषयांचे दिग्दर्शन करणाऱ्या आहेत. संशोधनमुद्धा आकर्षक व रंजक करणारी श्री. रा. चिं. ढेरे यांची शैली हा या ग्रंथाचा एक विशेष आहे. त्यांच्या अन्य संशोधनपर ग्रंथांप्रमाणेच हाही ग्रंथ प्राचीन मराठी वाङ्मयेतिहासातील अनेक दुव्यांची जुळणी करणारा, नवी दालने प्रकाशात आणणारा असाच आहे.

याच वर्षात प्रसिद्ध झालेल्या प्रा. य. शं. वावगावकर यांच्या ' संशोधन आणि चिंतन ' या लेखसंग्रहाचाही उल्लेख येथे केला पाहिजे. पुरातत्त्व, प्राचीन आणि अर्वाचीन साहित्य यांवरील विविध लेखांचा समावेश यात करण्यात आला आहे. त्यात खेडला व पवनार येथील शिलालेख, प्राचीन मराठीतील लोकनाट्य व कलाक्षेत्र, ज्ञानेश्वरांचा एक अज्ञात ग्रंथ, ज्ञानेश्वरांचे एक अज्ञात चरित्र इ. लेख प्राचीन मराठी वाङ्मयाशी संबंधित आहेत. शके १११० पूर्वी सोळा वर्षांचा खेडला येथील शिलालेख जयंतपाळ राजाच्या कारकीर्दीवर प्रकाश टाकणारा आहे. त्यामुळे मुकुंदराजविषयक आंभोरा–खेडला पक्षाला पूरक असा हा शिलालिखित पुरावा उपलब्ध झाल्याचे प्रा. वावगावकर यांचे मत चिंतनीय आहे. उद्धवचिद्घनलिखित अंजनगाव सुर्जी येथे उपलब्ध झालेले ' ज्ञानेश्वरांचे अज्ञात चरित्र ' प्रसिद्ध

करून बावगावकरांनी एक उपयुक्त कार्य केले आहे. नामदेवकृत ज्ञानदेव चरित्रापेक्षा त्याचे वेगळेपण त्यांनी चांगले दाखविले आहे. विशेषतः नृसिंहाश्रम व नृसिंहपाद, नृसिंहाश्रम व चैतन्याश्रम ही गुरुशिष्य जोडी रामानंदाचा रुक्मिणीस आशीर्वाद इ. बाबत त्यांनी केलेली चर्चा वेगळी दिशा दाखविणारी आहे. ' उत्तर पंचविशी पत्रिका ' हे ज्ञानदेवांच्या नावावरील पंचवीस श्लोकांचे प्रकरण त्यांचेच असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न लेखकांनी केला असला, तरी त्यांची ओवी, मांडणी व भाषिक स्वरूप वरवर पाहताही ते ज्ञानदेवांचे नसून प्रक्षिप्त आहे, याची खात्री पटते. अशा तऱ्हेच्या लेखसंग्रहात विशिष्ट विषयानुसंधान ठेवले गेल्यास त्यांचे स्वरूप अधिक नेटके व अभ्यसनीय होऊ शकेल.

प्राचीन मराठीचे अध्ययन व अध्यापन यांविषयी बरीचशी अनास्था अलीकडे निर्माण झाली आहे. प्राचीन मराठी साहित्याचे प्रकाशन त्याच्या विद्यापीठीय पाठ्यक्रमातील स्थानावर आधारित राहू लागले आहे. त्यामुळे अपरिचित ग्रंथांचा शोध, संपादन, प्रकाशन या बाबतचा उत्साह मावळू लागलेला दिसतो. पूर्वसूरींच्या कर्तृत्वावर वाटचाल करण्यापेक्षा संशोधनाच्या नव्या वाटा धुंडाळण्याची आज खरोखरी आवश्यकता आहे. त्या दृष्टीने प्राचीन मराठीतील कित्येक दुर्लक्षित विचारांचा निर्देश येथे करण्यासारखा आहे. प्राचीन मराठी साहित्य मुख्यतः परमार्थप्रवण असले, तरी ते लौकिक जीवनाला पारखे होते, असे म्हणता येणार नाही. जगन्नाथ कवीचे ' शशिसेना ' किंवा लोकिंव राजाच्या ' रत्नकलाचरित्रा 'चा या संदर्भात विचार व्हावा. या विषयांना व काव्यांना परमार्थ–विचारासारखी प्रतिष्ठा त्या काळी नसल्याने ती दुर्लक्षित राहिली असावीत, परंतु वाङ्मयीनदृष्ट्या त्यांचे स्थान महत्त्वाचे असून हा लुप्त प्रवाह संशोधून सुप्रतिष्ठित करण्याची आवश्यकता आहे. प्राचीन साहित्यविषयक अनेक नवीन साधने व संदर्भ साहित्य उजेडात येऊ लागले असून, त्यांच्या संदर्भात जुन्या साहित्याचे पुनर्मूल्यांकन वेळोवेळी होत राहिले पाहिजे. विविध नियतकालिके व लेखसंग्रह यांतून विखुरलेल्या लहान-मोठ्या नोंदींचा शोध घेऊन त्यांचा सलग विचार झाला पाहिजे. मराठी वाङ्मयेतिहासाचे लेखन करताना आता विशिष्ट कालखंडाचा शक्यतर शतकानुसारी–सूक्ष्म अभ्यास होऊन त्या त्या वेळच्या वाङ्मयीन प्रवाहांची, वृत्ति–प्रवृत्तींची केलेली चर्चा महत्त्वाची ठरू शकेल. राजवाडे, शंकरराव देव, म. म. पोतदार, ग. ह. खरे, डॉ. यु. म. पठाण आदी संशोधकांनी संग्रहित व संपन्न केलेल्या पोथीशाळा आज दुर्लक्षित राहिल्या आहेत. ( अहमदनगरच्या संग्रहालयाचाही येथे उल्लेख करावा लागेल.) प्रमुख प्राचीन ग्रंथांचा परिचय आजवर झाला असला तरी अशा पोथी–शाळांतून विपुल प्रमाणात उपलब्ध असलेले स्फुट साहित्य अभ्यसनीय आहे. संशोधकांनी, समीक्षकांनी आता हे अभ्यासक्षेत्र बनविण्याची आवश्यकता आहे. त्या दृष्टीने संशोधकांनी अभ्यासाचे विशिष्ट विषयच नव्हे, तर भौगोलिक क्षेत्रेही निश्चित करून त्यावर आपले लक्ष केंद्रित केले तर सूक्ष्म व सर्वांगीण विचार होऊ शकेल. महानुभावीय दामोदर पंडितांपासून शाहीर कवीपर्यंत अनेक मराठी कवींनी हिन्दी भाषेतही रचना केली आहे. त्यांची कारणे व स्वरूप यांचा विचार मराठी वाङ्मयेतिहासात झाल्यास

अन्य प्रदेश व भाषा यांच्याशी असणारा मराठी भाषिकांचा संबंध स्पष्ट होईल. किंबहुना प्राचीन मराठी वाङ्मयाच्या कोणत्याही शाखेचा विचार भारतीय पार्श्वभूमीवर करण्याची गरज आहे असे वाटते. विविध धर्मपंथांतील मराठी साहित्याचे संशोधन त्या त्या क्षेत्राला संपूर्णपणे वाहून घेतल्याखेरीज होणार नाही. यादृष्टीने अ. का. प्रियोळकरांचे खिस्ती साहित्य संशोधन लक्षात घेण्यासारखे आहे. जैन साहित्याचा इतिहास उपलब्ध झाला असला, तरी त्यातील कृती मूळ रूपात अभ्यासकांना उपलब्ध झाल्या पाहिजेत. लिंगायत पंथातील साहित्य पंथीयांनी काही प्रमाणात प्रसिद्ध केले आहे; परंतु त्याचा परमर्श व अधिक शोध जितका घ्यावा तितका घेतला गेलेला नाही. संशोधनाची ही विविध क्षेत्रे जाणत्या संशोधकांच्या प्रतीक्षेत आहेत.

## साभार पोच

**Maharashtra 1973–74** : Directorate General of information and Public Relations Government of Maharashtra Sachivalaya Bombay 32, Pages 411, Government Central Press.

**मौज प्रकाशन, खटाववाडी मुंबई** : श्री. ना. पेंडसे; लेखक आणि माणूस; एक मित्र पृ. ४६४; किं. ५५ रु. ( २ ) श्री. सखाकलाल; ढग, पृ. १४५. किं. १४ रु. ( ३ ) विंदा करंदीकर, राजा लिअर पृ. २७२; किं. २० रु. ( ४ ) किरण नगरकर. सात एकं त्रेचाळीस पृ. २०३; किं. २१ रु. ( ५ ) दि. बा. मोकाशी; आनंदओवरी. पृ. ७४; किं. ८ रु. ( ६ ) पुरुषोत्तम शिवराम रेगे; गंधरेखा ( काव्य संग्रह ) पृ. ६५; किं. ७ रु.

**मॅजेस्टिक बुक स्टॉल, गिरगावनाका मुंबई व पुणे** : ( १ ) सुभाष भेण्डे; जोगीण पृ. ११५; किं. ९ रु. ( २ ) वि. स. वाळिंबे; दुसरे महायुद्ध पृ. २६९ किं. २५. रु. ( ३ ) गो. नि. दाण्डेकर; हे तो श्रींची इच्छा; पृ.१८१; किं. १२ रु. ( ४ ) नरहर कुरुंदकर; पायवाट. किं. १५ रु. ( ५ ) जयवंत दळवी; 'स्पर्श'; किं. १५ रु. ( ६ ) शं. ना. नवरे, गुंतता हृदय हे; किं. ७ रु.

# दैनिकांच्या अग्रलेखांचा वाचकांवरील परिणाम

ल. ना. गोखले

अग्रलेख हा वृत्तपत्राचा अविभाज्य भाग झालेला आहे. वर्तमानपत्रामध्ये वातम्या जशा असावयाच्या त्याप्रमाणेच अग्रलेखही असावयाचाच. सामान्यतः वृत्तपत्राचे मत अग्रलेखामध्ये व्यक्त झालेले असते. म्हणजे, लोकांना नुसत्या वातम्या किंवा सभोवती काय घडत आहे याची माहिती मिळून भागत नाही तर त्या माहितीसंबंधीचा अभिप्रायही कळावयास हवा असतो. पारतंत्र्याच्या काळात लोकमान्य टिळकांसारख्यांच्या अग्रलेखांनी लोकांना चेतावणी देण्यासाठी फार मोठी कामगिरी बजावली असल्याचे आपण पाहतो. आपल्याकडे अग्रलेख सामान्यतः वृत्तपत्रांबरोबरच सुरू झाले. इंग्लंडमध्ये किती तरी दिवस नुसत्या हकीकती देणारी माहितीपत्रे प्रसिद्ध होत होती. त्यांना अग्रलेखांचा टिळा त्यांच्या अस्तित्वानंतर दीडशे वर्षांनी लागला. ( अलीकडच्या काळामध्ये तिकडे काही वृत्तपत्रे अग्रलेखांविना प्रसिद्ध होत आहेत. ही जरी फारशी प्रतिष्ठित वृत्तपत्रे नसली तरी अग्रलेखांच्या उपयुक्ततेस त्यांनी धक्का दिला आहे यात शंका नाही. )

अग्रलेख वाचणारे वाचक एकंदरीने कमी असतात असा सार्वत्रिक अनुभव आहे. परंतु एकूण वाचकांपैकी नेमके किती वाचक वृत्तपत्रातील हा विशिष्ट भाग वाचतात हे अद्याप कोठेही स्पष्ट झालेले नाही. ते नेमके कळणे अनेक कारणांनी अवघड असले तरी, एवढे मात्र निश्चित आहे की, वर्तमानपत्रे वाचणारी सगळीच माणसे अग्रलेख वाचत नाहीत. एक वेळ अग्रलेखाच्या पानावर असणारा इतर मजकूर वाचक वाचेल, परंतु तो अग्रलेखाकडे लक्ष देणार नाही. तर असेही क्वचित वाचक आढळतात की, जे हाती पडलेल्या वृत्तपत्राच्या मुख्य मथळ्यापाठोपाठ झरझर अग्रलेखावर धावती नजर आवर्जून टाकतील.

येथे, विशिष्ट वृत्तपत्रातील अग्रलेखांपुरती पाहणी करावयाची असे ठरविल्यानंतर पहिला प्रश्न उपस्थित झाला तो असा की, हे नेमके वाचक कोण ? ' महाराष्ट्र टाइम्स ' आणि ' सकाळ ' ही दोन वृत्तपत्रे अभ्यासविषयासाठी निवडण्यात आली. मुंबई आणि पुणे या महाराष्ट्रातील दोन प्रमुख केंद्रांमधील साधारणतः समान स्वरूपाच्या वृत्तपत्रांचा प्रस्तुत

विषयाच्या अभ्यासाच्या दृष्टीने विचार करावयाचे प्रथम ठरविले आणि नंतर त्यांच्या अग्रलेखांचे वाचक कोण असू शकतील याचा शोध घेतला. हा शोध वाचकवर्गातील विविध व्यावसायिकांमध्ये करण्यात आला. महाराष्ट्र टाईम्सपुरता प्रायः मुंबईतील वाचकवर्ग आणि सकाळपुरते सामान्यतः पुण्यातील वाचक डोळ्यांसमोर ठेवले. पाहणी करणाऱ्यांचा दोन्ही ठिकाणचा अनुभव स्थूलमानाने असा की, त्या त्या वृत्तपत्राच्या दहा-बारा वाचकांशी बोलणे केल्यानंतर त्यातील एकजण अग्रलेखाचा वाचक असू शकतो. अग्रलेखाचा वाचक म्हणजे तरी काय ? बातम्या जेवढ्या नियमितपणे वाचल्या जातात म्हणजे जशा वाचल्या जातातच तसा अग्रलेखाचा वाचक म्हणणारादेखील अग्रलेख वाचतोच असे नाही, असे प्राथमिक पाहणीतच निष्पन्न झाले. तेव्हा आठवड्याच्या सात दिवसांतील किमान चार दिवसांचे अग्रलेख जो स्थूलमानाने वाचतो तो अग्रलेखाचा वाचक असे गमक ठरविले आणि त्यानुसार पाहणी करण्यात आली. सुशिक्षित, अल्पशिक्षित, स्त्री-पुरुष, सरकारी नोकर-स्वतंत्र उद्योग-धंदेवाले, विद्यार्थी, कामगार, विविध व्यावसायिक अशा नानाविध वाचकवर्गातील घटकांचे प्रत्येक गटात वीसप्रमाणे विभाग पाडले. जेथे वीस जणांचा विभाग होऊ शकला नाही तेथे पंधरांचा विभाग केला. एकूण ११ विभाग झाले. एकेका विभागातील निष्कर्षांवरून शेकडा प्रमाण निश्चित केले.

वर्तमानपत्राचे संपादक स्वतः अग्रलेख लिहितात किंवा स्वतंत्र साहाय्यकांकडून अग्रलेख लिहवून घेतात. त्यासाठी वृत्तपत्रांचे चालक – मालक स्वतंत्र तरतुदी करतात आणि प्रतिदिनी वृत्तपत्र आपल्या वाचकांशी संवाद साधू पाहते. ही वस्तुस्थिती नेमकी काय आहे ? अग्रलेख वाचणाऱ्यांवर त्यांचा काय परिणाम घडत असतो ? जे कोणी वाचक अग्रलेख वाचतात ते तरी कोणत्या हेतूने हे काम करतात ? म्हणजे, अग्रलेख काय साधतात – असे प्रश्न उत्पन्न केल्यानंतर प्रस्तुत विषयाच्या अभ्यासासाठी एक सिद्धान्त गृहीत स्वरूपाचा म्हणून समोर ठेवण्यात आला. तो असा :

वाचकांशी अग्रलेख जो संवाद साधतात तो महत्त्वाचा आहे. वृत्तपत्राच्या एकंदर व्यवहारात त्यास सुयोग्य स्थान देणे अगत्याचे आहे. अग्रलेखामुळे वाचकांच्या मनावर विशिष्ट परिणाम प्रभावीपणे केला जातो. अग्रलेख वाचकांस आवाहन करतात. त्याचे मन वळवितात. त्याचे मनोरंजन करतात. विशिष्ट कार्यांचा पुरस्कार करतात. समाजातील अनिष्ट प्रवृत्तींवर हल्ला चढवितात. वाचकांचे मार्गदर्शन करून त्यास शिक्षण देतात, आणि कित्येक प्रसंगी पुढारीपण अंगीकारून वाचकांस कृती करण्यासही उद्युक्त करतात.

वरील सिद्धान्ताच्या अनुषंगाने, म्हणजे, त्याच्यासंबंधीच्या व्यवहाराचा जास्तीत जास्त तपशील मिळविण्यासाठी आणि त्यामध्ये अभिप्रेत असणारी प्रत्येक बाब तपासण्यासाठी दोन प्रकारांनी अभ्यास करावयाचे ठरविले. पैकी एक म्हणजे अग्रलेखामध्ये नेमके काय असते हे पाहणे. आणि दुसरी गोष्ट म्हणजे अग्रलेख वाचणाऱ्यांशी संपर्क साधून विविध प्रश्नांच्या

अनुक्रमणिका

अनुषंगाने त्यांच्या विचार-कल्पनांचा जेवढा म्हणून मागोवा घेणे शक्य आहे तेवढा तो घेणे. या सर्वांचे उद्दिष्ट अग्रलेखांची परिणामकारकता तपासणे हेच होते.

वास्तविक, लोकसंवादसाधनांच्या उपयोगांचा नेमका परिणाम पाहणे मुळातच अतिशय अवघड आहे. वाचकांचे मन वळविणे किंवा त्यावर काही ठसा उमटविणे व्हावयाचे तर मुद्दली पाच गोष्टी असावयास हव्यात :– ( १ ) उत्पन्न होणारा संवाद वाचकापर्यंत पोचला पाहिजे. ( २ ) हे जे कोणी वाचक असतील त्यांना त्याचा अर्थ समजला पाहिजे. अग्र-लेखामध्ये अभिप्रेत असणारे आवाहन त्याला नेमके कळले पाहिजे. ( ३ ) हे आवाहन वाच-काने जतन केले पाहिजे म्हणजे ते त्याच्या स्मरणात राहिले पाहिजे. ( ४ ) अग्रलेख, वाचनाचा आपणावर विशिष्ट परिणाम होत आहे हे तो वाचणाऱ्याने मान्य केले पाहिजे. त्यांपैकी काहींची मते अथवा विचार अग्रलेख-वाचनामुळे पक्की झाली पाहिजेत अथवा बदलली पाहिजेत. ( ५ ) अग्रलेख-वाचनामुळे मी अमुक कृती करण्यास उद्युक्त झालो असे काही थोड्यांनी तरी म्हटले पाहिजे.

वरील सर्व गोष्टी साध्य होतीलच अशी खात्री अग्रलेख-लेखक बाळगू शकत नाही ही गोष्ट उघड आहे. यातील पहिल्या चार गोष्टींबाबत मात्र अग्रलेख-लेखकाने तपशिलात जाऊन विचार केला पाहिजे. शेवटची जी कृतीची बाब आहे ती अत्यंत फसवी आहे. लोकसंवाद-साधनाद्वारा निघणाऱ्या संदेशातून अमुक एक कृती घडली हे सिद्ध होणे अत्यंत दुरापास्त आहे. मग दहा टक्केही वाचक नसलेल्यांपैकी कृती करण्यास उद्युक्त होणाऱ्यांचा शोध कसा घ्यावयाचा ? वरील दोन्ही वृत्तपत्रांच्या वाचकांना ( एकूण संख्या : ५३० ) " अग्रलेख-वाचनामुळे प्रत्यक्षतः अथवा अप्रत्यक्ष रीतीने एखादी कृती करण्यास किंवा एखाद्या चळ-वळीत भाग घेण्यास उद्युक्त झालात असे घडले काय ? " हा प्रश्न विचारण्यात आला. तेव्हा त्यातील ५२६ जणांनी " नाही " किंवा " मुळीच नाही " अशासारखे उत्तर दिले. ज्या ४ जणांनी " होय " म्हटले त्यांनीही केवळ तेवढा होकारच भरला. त्यासंबंधी तपशील विचारला असता तो त्यांनी धडपणे व्यक्त केला नाही. ( दोघांनी अर्धवटपणे काही उत्तर नमूद केले आहे. ) याचा इत्यर्थ असा की मनावर परिणाम झाल्यानंतर किंवा मन वळविल्यानंतरही एखाद्या कृतीची अपेक्षा करणे फोल आहे !

' संपादकीय अग्रलेखांनी वाचकांच्या मनाची पकड घ्यावी, परंतु त्यास तयार मते न देता विचार करावयास शिकवावे. आणि हा विचार वाचकाचा स्वतःचा असावा, ' असे म्हटले गेले आहे. त्याचा अर्थ असा की, वाचकास त्याच्या विचारविषयक जबाबदारीतून मुक्त न करता त्या कामी साहाय्य करणे हे अग्रलेखांचे उद्दिष्ट मानले जावे.

अमेरिकेतील संपादकांसाठी आणि अग्रलेख-लेखकांसाठी ठरवून देण्यात आलेली आचारसंहिता येथे लक्षात घेण्यासारखी आहे. अग्रलेख-लेखकांनी लोकमत घडवावे असे तिजमध्ये गृहीत धरण्यात आले आहे. शास्त्रज्ञाप्रमाणे अग्रलेख-लेखकाने सत्याचा पाठपुरावा

करावा. मग त्याचा काहीही परिणाम होवो. त्यामध्येच त्याची समाजनिष्ठा आणि व्यावसायिक निष्ठा व्यक्त होते. या आचारसंहितेतील मूलभूत मुद्दे असे आहेत :

( १ ) अग्रलेख-लेखकाने वस्तुस्थिती प्रामाणिकपणे आणि पूर्णपणे निवेदन करावी.

( २ ) त्याने त्यापासून वस्तुनिष्ठ निष्कर्ष काढावेत. हे निष्कर्ष पुराव्यावर आधारलेले असावेत. त्यामध्ये जास्तीत जास्त लोकांच्या हिताची दृष्टी असावी.

( ३ ) वैयक्तिक फायद्याच्या प्रेरणेने त्याने काम करू नये.

( ४ ) आपली कधीच चूक होणार नाही असे त्याने कधीच मानू नये. मतभेद असणाऱ्यांनाही त्याने वाचकांच्या पत्रव्यवहाराच्या सदरात वाव द्यावा.

( ५ ) आपले निष्कर्ष त्याने सतत तपासत राहावे.

( ६ ) सर्व प्रकारे खात्री पटल्यानंतरच आपले अभिमत त्याने धैर्याने मांडावे. स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीस न पटणाऱ्या गोष्टी त्याने मांडू नयेत. विशेषतः जेथे अनेकांच्या मतांचा–मनाचा संबंध येतो तेथे त्याने असे लक्षात ठेवावे की, पक्क्या वैयक्तिक निवाड्यावरच सामुदायिक निवाडा अवलंबून असतो. म्हणूनच विचारपूर्वक बनलेल्या वैयक्तिक मतांचा आदर व्हावा.

या आचारसंहितेच्या जोडीसच लक्षात घ्यावयाची एक व्याख्या म्हणजे–मत आणि वस्तुस्थिती या गोष्टी थोडक्यात, तर्कशुद्धपणे, रंजक पद्धतीने वाचकांच्या मनावर परिणाम करण्याच्या दृष्टीने ज्यामध्ये व्यक्त केलेल्या असतात त्यास संपादकीय अग्रलेख म्हणावयाचे. वैशिष्ट्यपूर्ण बातम्या अग्रलेखामध्ये अशा प्रकारे समजावून दिल्या जाव्या की त्यांचे महत्त्व वाचकांस नेमके स्पष्ट व्हावे.

परंतु, कित्येक अग्रलेख केवळ स्पष्टीकरणात्मकच असतात. आणि मग वाचक त्यावर नाराज झालेले दिसतात. केवळ माहितीपर अग्रलेखासंबंधी ५२ टक्के वाचकांनी नाराजी व्यक्त केली, असे प्रस्तुत पाहणीमध्ये आढळून आले. या वाचकांना माहितीपेक्षा आपल्या आवडत्या वृत्तपत्राने 'बाजू घेणे' हवे असते. मग असे अग्रलेख त्यांना पहिल्या पानावर एखाद्या महत्त्वाच्या बातमीच्या जोडीनेच वाचावयास दिले तरी पाहिजे असतात. अग्रलेख दररोज असलाच पाहिजे ही प्रथा किंवा कर्तव्यबुद्धीमुळे पाळावी लागणारी अट अग्रलेखांना मारक ठरते काय? पाहणीत एका वाचकाने म्हटले आहे की, 'समाज आणि त्याचे राजकारण या विषयावर वर्षाचे सगळे दिवस अभ्यासपूर्ण आणि मूलगामी लेखन होणार तरी कसे!'

नवीन माहिती मिळविण्यासाठी आणि विचार समजावा, मत कळावे यासाठी—अशा दोन्ही हेतूंनी अग्रलेख वाचले जातात. निव्वळ माहिती मिळविण्यासाठी किंवा बातमीचा पुरा संदर्भ आणि पार्श्वभूमी समजावी म्हणून आम्ही अग्रलेख वाचतो असे ४७.६ टक्के वाचक म्हणतात. अग्रलेखामुळे प्रथम कळलेली अथवा न कळलेली बातमी (अधिक) समजली असे अनेकदा होते. बातमीचा अन्वयार्थ लागतो. कित्येकदा मुळातील बातमीकडे

दुर्लक्ष झालेले असते तेव्हा या अन्वयार्थाचे महत्त्व जास्त वाटते. माहितीपैकी अतिशयोक्त कोणती, जाणूनबुजून पक्षीय हितासाठी खुलवलेली कोणती याचे आडाखे जमले की तसली माहिती आपोआप वजा होते. उरलेली माहितीच स्मरणात वसते. त्यातून ज्याला सामान्य ज्ञान म्हणतात त्यात भर पडते. संबंधित विषयाच्या ग्रहणात मदत होते. स्वतःचा विचार सांगोपांग म्हणून अधिक मजबूत होऊ शकतो.

'सामान्यतः आपलेच मन व्यक्त झालेले दिसते म्हणून अग्रलेख वाचता काय?' असे विचारले असता त्यास नकार देणारे ६० टक्के वाचक आढळले. त्यांचे म्हणणे असे की, 'अनेकदा त्या त्या प्रश्नावरील संपादकीय मतांचा अंदाज असतो, नव्हे खात्री असते. तरीही कित्येकदा आपल्या मताशी न जुळणारा अग्रलेखही प्रश्नाची दुसरी बाजू उमजायला मदत होते म्हणून आम्ही वाचतो.'

'राजकारणासंबंधीचे अग्रलेख नेहमीच परके व दूरचे वाटतात. जिव्हाळ्याने लिहिलेल व भावनेला स्पर्श करणारा अग्रलेख-विषय हाच जवळचा वाटू शकतो.' असा अभिप्राय ५५ टक्के वाचकांनी व्यक्त केला आहे. वाचकांच्या मताने इतरांच्या विचाराला चालना देणारा अग्रलेख-लेखक स्वतः विचारवंत असला पाहिजे. 'चार वर्तमानपत्रांतल्या बातम्यांच्या संदर्भावर विसंबून लिहिला गेलेला अग्रलेख विचारचक्र चालू करणारा ठरावा अशी अपेक्षा कशी करता येईल?'

विचारांना निश्चित दिशा असेल तर त्यांचा शेवटचा टप्पा म्हणून मत बनते. या कामी अग्रलेखांचा उपयोग किती होत असावा असा अंदाज घेतला असता फारसे हाताशी काही लागत नाही. किंबहुना मत बनविण्याच्या, बदलविण्याच्या किंवा प्रस्थापित करण्याच्या हव्यासाने अग्रलेख लिहिले जाऊ नयेत असे ४५ टक्के वाचकांना वाटते.

"अग्रलेखामधील 'स्वतंत्र' अथवा 'तटस्थ' भूमिकेबद्दल नाराज होण्याचा प्रसंग कधीच आला नाही, कारण आम्ही 'स्वतंत्र' अथवा 'तटस्थ' भूमिकेची फारशी अपेक्षाच ठेवीत नाही." असे ३१ टक्के वाचक म्हणतात. "अग्रलेखांचे विषय जवळचे थोडे आणि लांबचे जास्त असतात असे वाटत नाही. जवळचे-लांबचे हे शब्दच वाचक-सापेक्ष आहेत. ज्याच्या बौद्धिक जीवनाची कक्षा मोठी, संदर्भ व्यापक, त्याला फार थोडे लांबचे असते. आणि ते काहीसे संपादक-सापेक्षही असते. जाणकार संपादक "लांबच्यांचा" जवळपणा ठसवू शकतो. अडाणी संपादक जवळच्यांचेही लांबचे करून दाखवितो. अथवा लांबच्या-विषयी इंग्रजीतून वाचलेल्यांची पोपटपंची करतो." हे एक लक्षणीय अभिमत होय.

भाषा हे अग्रलेखाचे, त्यातील प्रतिपादनाचे मुख्य वाहन. विषय चटकन समजणे, तो मनावर बिंबणे, पटणे इत्यादी गोष्टींस साहाय्यभूत होणाऱ्या भाषेसंबंधीचा विचार महत्त्वाचा ठरतो. "सुदैवाने अग्रलेखांची भाषा सोपी आणि साधी असते. तरीही भारदस्त आणि डौलदार असते — खऱ्या अर्थाने...खोट्या अर्थाने 'भारदस्त' असणारी आणि पांडित्याचा पोकळ डौल आणणारी भाषा आजकाल फार बोकाळली आहे म्हणून तुलनेने महाराष्ट्र

टाइम्सच्या अग्रलेखांची भाषा अभिनंदन करावी अशी आहे. ती ' वर्तमानपत्री ' म्हणून काही वेगळी – निकृष्ट असते असे वाटत नाही. ' वर्तमानपत्री ' वेगळी आणि ' साहित्यिक ' वेगळी असल्या कल्पनांनी मराठीचे फार नुकसान केले आहे." असा अभिप्राय एका साक्षेपी तज्ज्ञाने व्यक्त केला. पाहणीमध्ये ' महाराष्ट्र टाइम्स 'च्या ९६ टक्के वाचकांनी अग्रलेखान्च्या भाषेबद्दल पसंती व्यक्त केली. अग्रलेखांची भाषा जेवढ्या प्रमाणात सोपी असावयास पाहिजे तेवढी ती आज आहे. यापेक्षा अधिक सोपी झाल्यास भाषा निकृष्ट होण्याचा संभव आहे, अशी भीती सहा वाचकांनी व्यक्त केली आहे. " पूर्वीच्या संपादकांच्या अग्रलेखान्च्या भाषाशैलीत वाङ्मयीन गुण होते, ते सध्याच्या संपादकांच्या कारकीर्दीत तेवढे आढळत नाहीत. त्यामुळे एक प्रकारचा ' स्मार्ट ' सवंगपणा अनेकदा बोचतो. अग्रलेखांची भाषा तरी अगदीच जरनॅलीज नसावी," असे महाराष्ट्र टाइम्सच्या अग्रलेखांसंबंधीचे एक मत आहे.

" अग्रलेख वाचण्याचा नेमका फायदा काय होईल ? "—असे विचारले असता पुढील स्वरूपाचे मतप्रदर्शन करण्यात आले :–

( १ ) अग्रलेखवाचनाचा फायदा बहुश्रुततेचे श्रेय मिळवून देतो.

( २ ) दुसऱ्यावर वजन पाडण्यासाठी अग्रलेखांच्या वाचनाचा उपयोग होतो, असे अल्पशिक्षितांच्या विभागातील ८२ टक्के वाचकांचे म्हणणे आहे.

( ३ ) अग्रलेखवाचनाने वेळ ' वरा ' जातो म्हणण्यापेक्षा तो सत्कारणी लागतो आणि असे ज्याला वाटते तोच वेळात वेळ काढून अग्रलेख वाचण्याची तसदी घेतो.

( ४ ) आपल्या मनाचे वैचारिक पोषण होण्याच्या दृष्टीने अग्रलेख उपयुक्त होतात, असे ८६ टक्के वाचक मान्य करतात. ( खालील वर्गीकरणापैकी ' तसे विशेष नाही ' आणि ' बेताचे ' नमूद करणारे, प्रस्तुत बाब मान्य न करणारे होत. )

या बाबतीतील ( मनाचे वैचारिक पोषण ) प्रमाण विचारण्यासाठी भरपूर / पुष्कळच/ साधारण / मध्यम / तसे विशेष नाही / बेताचे असे सहा प्रकार नमूद केले होते. यांपैकी स्वतःसंबंधीचा निर्वाळा म्हणून कोणत्या तरी एका प्रकारास खूण करावी आणि बाकीचे खोडून टाकावे असे सुचविले होते. तेव्हा ' भरपूर ' म्हणणारे १३०, ' पुष्कळच ' म्हणणारे १२०, ' साधारण ' म्हणणारे ९०, ' मध्यम ' म्हणणारे १२०, ' तसे विशेष नाही ' म्हणणारे ३८ आणि ' बेताचे ' म्हणणारे ३२ वाचक आढळले.

अग्रलेखास वाचक कमी का ? वृत्तपत्रातील इतर मजकूर वाचणाऱ्यांच्या तुलनेने अग्रलेख वाचणारे फारच थोडे असतात. याबद्दलचे मत विचारताना त्यासंबंधीचा दोष अग्रलेखांकडे जातो काय ? असा प्रश्न विचारण्यात आला. त्यास उत्तर देताना अग्रलेखांवर दोषारोप करण्यास सामान्यतः कोणीच तयार नाही असे दिसून आले. " बातम्यांच्या आणि इतर माहितीच्या तुलनेने पाहता अग्रलेख वाचणारे फारच थोडे असतात " हे म्हणणे खरे आहे. एक तर बहुतेक वाचकांच्या ग्रहणशक्तीची झेप बातम्या आणि त्याही मर्यादित विषया-

संबंधीच्या आणि तत्सम माहिती यापलीकडे जाणारी नसते. तोच अग्रलेख ओळीने सात दिवस छापला तरी ते त्यांच्या लक्षात येईल असे वाटत नाही......अग्रलेखांकडेही याबाबत थोडासा दोष आहेच. " कृत्रिम बोजड भाषा लिहून शब्दांखाली विचार झाकून टाकणाऱ्या संपादकांची ही त्या व्यवसायाला देणगी आहे. " हे एक अभिमत वगळता महाराष्ट्र टाइम्सच्या सर्व वाचकांनी अग्रलेख न वाचले जाण्याच्या कामी दोष अग्रलेखांचा नाही, असा निर्वाळा दिला आहे. 'सकाळ'च्या ४० टक्के वाचकांनी अग्रलेखांची भाषा निकृष्ट असते असे म्हटले आहे.

अग्रलेखाच्या वाचनाने होणारी माहिती अथवा एखाद्या विषयाच्या पार्श्वभूमीबद्दलचे ज्ञान अन्य वर्तमानपत्रांतून ताडून पाहता काय या प्रश्नास होकारार्थी उत्तर देणाऱ्यांमध्ये वय पंचवीस ते चाळीस आणि शिक्षण एस. एस. सी. किंवा कॉलेजची एक-दोन वर्षे असणाऱ्या ७२ टक्के वाचकांनी होकारार्थी उत्तर दिलेले आढळते. तर दोन पदव्या असणाऱ्यांनी (९६ टक्के) 'या कामास वेळ आहे कोठे?' किंवा 'तशी आवश्यकता वाटत नाही.' अशी उत्तरे दिली आहेत. " अग्रलेखवाचनाने मिळणाऱ्या माहितीचा उपयोग कायम स्वरूपाचा होतो असे वाटते काय ? " या प्रश्नाचे उत्तर 'फारच थोडा उपयोग होतो', असे सकाळच्या ४१ वाचकांनी आणि महाराष्ट्र टाइम्सच्या २३ वाचकांनी दिले आहे. सकाळच्या पाहणीत एका सुशिक्षित महिलेने 'वाचक फारसा शिक्षित नसेल तर दैनंदिन व्यवहारात या वाचनाचा फायदा होईल' असे नमूद केले आहे.

'वर्तमानपत्रांची मते बिनबुडाची असतात. या महिन्यातील मत त्या महिन्यात आढळेलच असे म्हणता येणार नाही. जसे हल्ली पक्षांतर चालते तसे वर्तमानपत्रांचे मतांतर चालू असते असे वाटते.' असे सतत ३५ वर्षे वाचन करणाऱ्या सेवानिवृत्त जिल्हा न्यायाधीशांनी सकाळच्या संदर्भात नमूद केले आहे. "अग्रलेखातून बातमीसंबंधी उपयुक्त मार्गदर्शक टीका असते. त्यामुळे बातमीचे महत्त्व समजते." असे नमूद करणारे एक सेवानिवृत्त प्राचार्य म्हणतात. " मत पक्के असल्यामुळे बनण्याचा प्रश्न नाही. पहिले मत, दुसरे मत, तिसरे मत असे सोयीनुसार मत मी बदलत नाही." या प्रकरणी अशा प्रकारे टोकाचा अभिप्राय (मत न बदलण्याबाबतचा) व्यक्त करणारे सर्व वाचक वयाने साठच्या पुढचे आहेत. तर 'मत बनविण्यास अग्रलेखांचा उपयोग होतो" असे मानणारे ८६ टक्के वाचक वयाने तीसच्या आतील आहेत.

'बातमी' म्हणून फारसे लक्ष न वेधलेले विषय अग्रलेखामुळे समाजापुढे आले ते कसे यासाठी उदाहरणे विचारली असता सकाळच्या ४६ टक्के वाचकांनी ती दिली. महाराष्ट्र टाइम्सच्या ५२ टक्के वाचकांनी दिली. 'आठवत नाही' असे उत्तर २७० वाचकांनी दिले. हे उत्तर देणाऱ्यांच्यात पन्नासच्या पुढचे १८० वाचक आहेत.

विशिष्ट तत्त्वासाठी अग्रलेखात लढाऊ भूमिका घेतली आणि ती आपणास आवडली त्याची आणि वृत्तपत्राच्या समाज-सेवेच्या दृष्टीने अग्रलेख उल्लेखनीय वाटले, यासंबंधीची

आणि वृत्तपत्राच्या जागरूकतेचे अथवा दक्षतेचे नमुने म्हणून निर्देशिलेली उदाहरणे महाराष्ट्र टाइम्सच्या ६८ टक्के वाचकांनी भरपूर दिली, तर सकाळच्या ६६ टक्के वाचकांनी तशी दिली. ' याचे उत्तर देणे कठीण आहे. ', ' कात्रणे ठेवलेली नाहीत.', ' स्मरण राहावे असे अग्रलेख हल्ली म्हणजे २५–३० वर्षांत आठवत नाहीत. ' अशासारखी उत्तरे पन्नासच्या पुढील वयाच्या १६ वाचकांनी महाराष्ट्र टाइम्सच्या बाबतीत दिली; तर १९ वाचकांनी सकाळच्या बाबतीत दिली.

" विशिष्ट मतांची अथवा व्यक्तींची अग्रलेख नुसती वकिली करीत आहेत असे कधी वाटले का ? " या प्रश्नाचे उत्तर होय, तसे नेहमीच वाटते, असे देणारे १२ टक्के महाराष्ट्र टाइम्सचे आणि ३२ टक्के सकाळचे वाचक आहेत. " इंदिरा गांधींना लाखोली वाहणारे संपादक सध्या गोड गोड लिहितात " किंवा " यशवंतराव चव्हाण यांच्या बाबतीत नुसती वकिली केल्याचे आढळून येते " असे म्हणणारे महाराष्ट्र टाइम्सचे ७ वाचक आढळले.

" धोरणाच्या अथवा मताच्या दृष्टीने तुम्ही वाचता त्या अग्रलेखात विसंगती आढळते का ? तशी ती लक्षात आल्यास तुम्ही काय करता ? संपादकांना पत्र लिहिता ? मित्रमंडळीत चर्चा करता ?" या प्रश्नाच्या उत्तरात महाराष्ट्र टाइम्सचे ९३ टक्के वाचक ' विसंगती आढळत नाही ' तर सकाळचे ६० टक्के वाचक ' तशी विसंगती नसते ' असे म्हणतात. महाराष्ट्र टाइम्सच्या २२ वाचकांना विसंगती आढळते. सकाळच्या ३१ वाचकांना विसंगती आढळते. ( कित्येकांनी याप्रमाणे काहीच उत्तर दिलेले नाही. ) यांपैकी विसंगती आढळल्यानंतर 'काहीही करीत नाही.' असे म्हणणारे महाराष्ट्र टाइम्सचे २१ व सकाळचे १५ वाचक आढळले.

आपल्याला आवडलेले अग्रलेख मी निश्चितपणे इतरांना वाचायला सांगतो, असे म्हणणारे ३१५ वाचक आहेत. मनात वाचताना देखील काही भाग इतरांच्या कानी पडावा म्हणून किंवा चालू विषयाचे महत्त्व आसपासच्यांनाही पटावे म्हणून क्वचित प्रसंगी मोठ्याने वाचून दाखवितो, असे ५३ वाचक म्हणतात.

" तुम्ही वाचता हे अग्रलेख निःपक्षपाती असतात काय ? " या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी देणारे महाराष्ट्र टाइम्सचे ८३ टक्के व सकाळचे ४८ टक्के वाचक आहेत. ' निःपक्षपाती नसतात ' म्हणणारे महाराष्ट्र टाइम्सचे १२ टक्के आणि सकाळचे ३१ टक्के वाचक आढळले. ( काहींनी उत्तर दिलेच नाही.) " राजकीय पक्षांचा उघड अथवा छुपा प्रचार या लिखाणामध्ये केलेला आढळतो काय ? " असे पुढे जाऊन विचारले असता " होय, अनेकदा उघड व काही वेळा छुपा," असे महाराष्ट्र टाइम्सच्या १८ वाचकांनी व सकाळच्या २२ वाचकांनी म्हटले आहे.

" अग्रलेख आपण मनःपूर्वक व संपूर्ण वाचता; का वरवर, अधूनमधून, उडत्याबागडत्या पद्धतीने ? " याचे " होय, मनःपूर्वक व संपूर्ण वाचतो. " म्हणणारे महाराष्ट्र टाइम्सचे ७२ टक्के आणि सकाळचे ७४ टक्के वाचक आहेत. " हे विषयावरून ठरवितो " असे म्हणणारे महाराष्ट्र टाइम्सचे १३ आणि सकाळचे १८ वाचक आहेत.

" अग्रलेख पुष्कळदा मोटे वाटतात. ते लहान असतील तेवढे अधिक परिणामकारक. पाच-सहाशे शब्दांत अग्रलेख आवरायची सवय झाली तर लेखन नेमके मुद्देसूद आणि धारदार होण्याचा अधिक संभव. पुनरावृत्तीही टळेल." अशासारखे अभिमत उभय पत्रांच्या मिळून पाचशेहून अधिक वाचकांनी दिले आहे.

येथे यापुढे काही निवडक मतप्रदर्शन दिले आहे. एका वाचकाचे मत असे जरी त्याचे स्वरूप दिसले तरी प्रत्येक कल्पना लक्षात घेण्यासारखी आहे.

" काही वेळा अग्रलेखातून अधिक तपशीलवार माहिती मिळते. आकडेवारी, मागचे संदर्भ मिळतात. ही माहिती बरोबर असल्याची खात्री असते. कारण अग्रलेख लिहिताना संपादक कात्रणांच्या आणि संदर्भग्रंथांचा वापर करीत असतात अशी खात्री असते."

" अग्रलेख स्वतंत्र आणि तटस्थ असतात असे मानणे हा मला फार मोठा भ्रम वाटतो. या बाबतीत संपादकांचा भ्रमनिरास झाला पाहिजे. त्यांनी आत्मसंतुष्ट असणे ही गोष्ट कीव करावी अशी आहे.... तत्त्वासाठी लिहिणारे संपादक मला दिसत नाहीत. सध्याची मराठी दैनिके तत्त्वनिष्ठ आहेत असे मला वाटत नाही. तत्त्वनिष्ठेचा फक्त बुरखा असतो... विशिष्ट तत्त्वासाठी अग्रलेखात लढाऊ भूमिका घेतली जाते असे फारसे दिसत नाही. काही जिव्हाळ्याचे विषय आस्थेने – थोड्याफार अभिनिवेशाने हाताळले जातात.... काही वर्तमानपत्रांनी वाचकांना चुकीच्या सवयी लावल्या. त्याचा परिणाम म्हणून चांगले अग्रलेखही धडपणे वाचले जात नाहीत."

एका एम्. ए., पीएच्. डी. वाचकाने ' सकाळ ' आणि ' महाराष्ट्र टाइम्स ' या दोन्ही वृत्तपत्रांस अनुलक्षून विचारलेल्या प्रश्नांच्या बाहेर जाऊन स्वतंत्रपणे असे लिहिले आहे की, " आपल्या प्रश्नांची उत्तरे सत्य सांगण्याच्या दृष्टीने लिहिली आहेत.... चहा पिण्याची जी सवय, तसाच प्रकार वर्तमानपत्र वाचण्याचा आहे. त्याचा परिणाम असा काही होत नाही. केवळ सवय. वेळ मोकळा असल्यास बसल्या बसल्या वेळ घालविण्यास उपयोग होतो, हेही एक कारण आहे. माझी मते व या वृत्तपत्रातील लिखाण यांचा शून्य संबंध आहे."

" वृत्तपत्रांच्या जागरूकतेचे अथवा दक्षतेचे नमुने पुष्कळ आहेत, " असे सकाळच्या बाबतीत सांगणाऱ्या पुण्यातील एका वृत्तपत्र-व्यावसायिकाने सांगितले आहे की, " अग्रलेखांचे मथळे लक्षात ठेवणे मूर्खपणाचे द्योतक आहे. "

( सकाळच्या बाबतीत ) " नेहमी अमेरिकेचा पाठपुरावा व रशियाला विरोध केलेला असतो. कारखानदार, मालक-चालक यांचा पाठपुरावा करून कामगारवर्ग व नोकरवर्ग यांची उपेक्षा केली जाते. "

" तसे पाहता प्रत्येक वृत्तपत्राला स्वतःचे पक्षीय लागेबांधे असतात. पक्षाचा प्रचार करणे हाच काहींचा जीवितहेतू असतो. काहींना आर्थिक हित साधावयाचे असते. साधारणतः वृत्तपत्रे आपल्या मताचा वा मतांचा हवा तसा पाठपुरावा करील असाच संपादक नेमतात. आपल्या हिताशी जवळून संबंधित नसलेल्या घटनांवर संपादक निःपक्षपातीपणे

लिहितात. इतर पक्षांच्या कार्यक्रमांच्या बातम्याही नीट दिल्या जातात. पण निवडणुका आल्या आणि एकेका पक्षाच्या जाहीरनाम्याचे विश्लेषण करण्याची वेळ आली की ' त्या ' निःपक्ष धोरणाचा संकोच होतो आहे असे जाणवते. निवडणुकीपूर्वी ८।१५ दिवस काही वृत्तपत्रांचा लेआऊटही हळूहळू बदलतो. आणि निवडणुकांची गरज संपली की पुन्हा वृत्तपत्र निःपक्षपाती बनते. "

लोकसंवादसाधनांच्या व्यवहाराचे परिणाम त्यांच्या गुणवैशिष्ट्यांवर आणि त्याद्वारा दिल्या जाणाऱ्या संदेशाच्या आशयावर अवलंबून असतात. असे आढळते की, वैचारिक आवाहनां-पेक्षा भावनिक आवाहने अधिक प्रभावी ठरतात. असेही निष्पन्न झाले आहे की, कोणत्याही माध्यमाच्या द्वारे संवाद साधण्यापेक्षा तोंडाने बोलून काही संदेश दिला तर त्याचा परिणाम सर्वांत जास्त होतो. लोकसंवादसाधनाशी संबंधित अशा लोकांच्या विशिष्ट सवयी असतात. संवादाचा परिणाम अजमावणाऱ्यांनी या सवयींचाही अभ्यास केला पाहिजे. चित्रपट, टेलिव्हिजन, रेडिओ किंवा वृत्तपत्र ही सर्व लोकसंवादसाधने उपयोजणाऱ्यांनी तो करा-वयास हवा. ज्यांना लोकांवर विशिष्ट परिणाम करावयाचा आहे, प्रभाव पाडावयाचा आहे, वैचारिक आवाहन करावयाचे आहे, त्यांनी आपल्या माध्यमाचा शक्य तेवढ्या खोलात जाऊन विचार करावा. म्हणजे त्यांच्या त्यांच्या कामाची उपयुक्तता आपोआप वाढेल. अग्रलेखांसंबंधीच्या प्रस्तुत पाहणीचा प्रमुख उद्देश हाच आहे की, वृत्तपत्रांच्या माध्यमातून प्रतिदिनी जे वैचारिक मंथन केले जाते किंवा काही विशिष्ट हेतू मनात धरून जी माहिती पुरविली जाते, वाचकांना, सरकारला अथवा संस्थाचालकांना जे आवाहन केले जाते त्याबाबतची वाचकांची प्रतिक्रिया प्रातिनिधिक स्वरूपात कितपत समजते हे पाहावे. लोकसंवादामुळे माणसे कृती करण्यास उद्युक्त होत नसतील, परंतु त्यांच्यातील जागृतीचा स्तर खासच उंचविता येतो. अग्रलेख-लेखकांस वाचकांच्या या प्रतिक्रिया सतत कळण्याची यंत्रणा उपलब्ध नसते. त्या कामी अशा अभ्यासाचा उपयोग होण्यासारखा आहे. अर्थात अशा पाहण्या वरचेवर आणि विविध दृष्टिकोणांतून झाल्या पाहिजेत. वाचकांची जाण कसकशी समृद्ध होत आहे आणि अग्रलेख-वाचनामध्ये त्यांची मनःपूर्वकता, निष्ठा किंबहुना ध्येयदृष्टी वाढल्या प्रमाणात गुंतत आहे काय, हे जर अग्रलेख लिहिणाऱ्यांना अशा संबोध-नातून समजू शकले तर त्यांना आपले काम अधिक जाणीवपूर्वक करता येईल. आपण प्रतिदिनी निष्ठापूर्वक जो उद्योग करतो, तो वाऱ्यावर जाणाऱ्या शब्दाप्रमाणे वाया जात नाही, असे अग्रलेख लिहिणाऱ्यांच्या लक्षात यावे आणि आपल्या कामासंबंधीचा त्यांचा आत्मविश्वास वाढावा हा या पाहणीमागचा एक उद्देश आहेच.

वाचकांना मनापासून काही विषय आवडत असतात. वर्तमानपत्राचा सगळा प्रपंच जर वाचकांसाठी आहे, तर त्यांच्या आवडीच्या या विषयांचा शोध वर्तमानपत्रांनी घेतलाच पाहिजे. वाचकांच्या आवडीच्या विषयांच्या बातम्या सतत मोठ्या प्रमाणात एकवेळ पुरविता येणार नाहीत, कारण त्यांच्या स्वतः होऊन लिहितो त्या मजकुराची गोष्ट आहे. लिहिण्या-

सारख्या म्हणजे अभिमत व्यक्त करण्यासारख्या बातम्या मिळणार नाहीत तेव्हा आपल्या स्वतःच्या कल्पना लढवून नवनवीन विषय संपादक उत्पन्न करू शकतो. त्याच्या सर्वच निवडीचे निकष सामान्यतः वाचकप्रियतेवर ठरविले जावेत. प्रस्तुत पाहणीत असे निष्पन्न झाले की आपणास काय हवे–नको किंवा आपल्या प्रतिक्रियांचे स्वरूप काय हे काही वाचक आपण होऊन संपादकांना कळवीत नाहीत. तेव्हा यासंबंधीच्या कल्पना करून अंदाज–आडाखे बांधून अग्रलेख-लेखन करणे भाग पडते. विशिष्ट विषयात वाचकास रस वाटत असला म्हणजे त्याच्याशी संवाद साधणे तर सोपे होतेच, परंतु त्यास काही शिकविणेही आपोआप शक्य होते.

हे जसे खरे, तसेच विशिष्ट विषयांबाबत वाचकाच्या मनात प्रतिकूल मत असेल किंवा काही अढीच बसलेली असेल तर त्यास काही नवे शिकविणे तेवढे सोपे नसते. या बाबतीत पुरुष व स्त्री वाचकांच्या प्रतिक्रिया लक्षात घेण्यासारख्या आहेत. अग्रलेखामधील माहिती, मत अथवा विचार जेवढ्या गांभीर्याने स्त्रीवाचक ग्रहण करावयास तयार आहे, तेवढ्या गांभीर्याचा पुरुष वाचकात आढळ होत नाही. दोन्ही वृत्तपत्रांच्या एकूण संख्येमध्ये १३० स्त्रिया होत्या. त्यांनी अग्रलेखांची परिणामकारकता वा त्यांचा प्रभाव यासंबंधी जसे स्पष्ट मत दिले आहे तसे पुरुषवाचकांनी दिलेले नाही. अग्रलेख लिहिणाऱ्यास निरनिराळ्या स्थानी असणाऱ्या आपल्या या बहुविध वाचकांच्या म्हणजे त्यांच्या प्रतिक्रियांचा शोध पद्धतशीरपणे लागत राहील तर त्यास आपल्या कामात सतत सुधारणा करता येतील. वाचकांच्या प्रवृत्ती-मध्ये दीर्घकालीन बदल साधण्याचा प्रयत्न करण्यात वास्तविक वृत्तपत्रांना इतर लोकसंवाद-साधनांपेक्षा निश्चित स्वरूपाचे काम करता येते. छापील शब्दाचा उपयोग प्रभाव वाढ-विण्याच्या दृष्टीने, चर्चाचिकित्सा यासंबंधीच्या लोकांच्या प्रवृत्ती प्रगल्भ करण्याच्या दृष्टीने विशेषच असतो. इतर माध्यमांच्या मुळाशीही कोणत्या ना कोणत्या स्वरूपात लिखित शब्दच असतो.

वरील विचाराच्या अनुषंगाने महाराष्ट्र टाइम्स आणि सकाळ या दैनिकांच्या सहा महिन्यांतील अग्रलेखांच्या आशयाचे पृथक्करण केले आहे. अशा चिकित्सेस सहा महिन्यांच्या कालखंडाच्या (१ जुलै ते ३१ डिसेंबर १९७१) हिशेबात आवश्यक तेवढे अग्रलेख विविध निकषांवर अगदी जवळून तपासून पाहिले. (या पाहणीत रविवारच्या अंकातील अग्रलेख मुद्दामच धरण्यात आले नाहीत. एक तर त्या अग्रलेखांची प्रकृती दैनिकाच्या अग्रलेखांच्या स्वरूपाहून बरीच भिन्न असते. वाचकांची त्याकडे पाहण्याची दृष्टीही निराळी असल्याचे आढळून आले. साप्ताहिक अग्रलेखांचे एकंदर रंगरूप दैनिक वृत्तपत्राच्या अग्रलेखांपेक्षा स्पष्टपणे वेगळे झालेले आहे.) रविवारव्यतिरिक्त असणाऱ्या सहा दिवसांतील अग्रलेख एका महिन्यामध्ये सहा या प्रमाणात निवडले. कोणते सहा हे सदृच्छा आकड्यांच्या (रॅण्डम नम्बर्सच्या) कोष्टकावरून ठरविले. अभ्यास-कालखंडात दोन्ही वृत्तपत्रांचे पुढील अग्रलेख तपासले. (प्रत्येकी ३६). ते असे :–

महाराष्ट्र टाइम्स : ( १ ) सचिवालयातील जिवाजी कलमदाने ( ३ जुलै ); ( २ ) कापडगिरण्यांचे दुखणे ( ८ जुलै ); ( ३ ) निक्सन यांची पेकिंग भेट ( १७ जुलै ); ( ४ ) बदलता राजकीय पट ( २४ जुलै ); ( ५ ) नवी दिशा कोणती ? ( २७ जुलै ); ( ६ ) महिला कर्मचाऱ्यांची गाऱ्हाणी ( २८ जुलै ); ( ७ ) विद्यार्थ्यांचा संप मिटला ( ३ ऑगस्ट ); ( ८ ) दुष्काळाच्या छाया ( ५ ऑगस्ट ); ( ९ ) रशिया-भारत करार ( १० ऑगस्ट ); ( १० ) शमीम व नुराणींची चलाखी ( ११ ऑगस्ट ); ( ११ ) चीनवाद्यांचा गोंधळ ( १७ ऑगस्ट ); ( १२ ) शिलकी धान्याची डोकेदुखी ( २४ ऑगस्ट ); ( १३ ) दलित व्यासपीठ ( ४ सप्टेंबर ); ( १४ ) औद्योगिक शांतता ( ९ सप्टेंबर ); ( १५ ) शिवाजी विद्यापीठ ( १३ सप्टेंबर ); ( १६ ) महाराष्ट्राचे मुख्यमंत्री ( १५ सप्टेंबर ), ( १७ ) कोल्हापुरातील चौदावे लुई ( २४ सप्टेंबर ); ( १८ ) गजेंद्रगडकर यांना निरोप ( ३० सप्टेंबर ); ( १९ ) बेस्ट वादाच्या निमित्ताने ( ६ ऑक्टोबर ); ( २० ) थंडे अधिवेशन ( १२ ऑक्टोबर ); ( २१ ) सदोष विमाने ( २२ ऑक्टोबर ); ( २२ ) माओपुढील शृंगापत्ती ( २५ ऑक्टोबर ); ( २३ ) संयुक्त राष्ट्रात चीन ( २७ ऑक्टोबर ); ( २४ ) उपेक्षित मुंबई ( ३० ऑक्टोबर ); ( २५ ) महात्मा फुले कृषी विद्यापीठ ( २ नोव्हेंबर ); ( २६ ) नुराणी यांचे बंधू बझार ( ६ नोव्हेंबर ); ( २७ ) बद्रुद्दीन यांचा वकवास ( १० नोव्हेंबर ); ( २८ ) "भारताची तसबीर" ( १३ नोव्हेंबर ); ( २९ ) कशासाठी ही हुल्लडबाजी ? ( १६ नोव्हेंबर ); ( ३० ) राजनीतीचा नवा आविष्कार ( २२ नोव्हेंबर ); ( ३१ ) जनसंघाचा नवा अवतार ( १ डिसेंबर ); ( ३२ ) सर्वांची जबाबदारी ( ८ डिसेंबर ); ( ३३ ) सणसणीत चपराक ( १३ डिसेंबर ); ( ३४ ) रशियन धोरणाचा अर्थ ( १६ डिसेंबर ); ( ३५ ) विजयानंतर ( १८ डिसेंबर ); ( ३६ ) दिवाळखोर बुद्धिमंत ( २७ डिसेंबर ).

या अग्रलेखांतील एकेका विधानाची मोजणी करून ते ( १ ) मत, ( २ ) माहिती, ( ३ ) मत व माहिती संमिश्र आणि ( ४ ) कोणास तरी आवाहन यांपैकी काय आहे ते तपासले असता या चार गोष्टींचे प्रमाण मत : ३२·८२ टक्के, माहिती : ५३·८२ टक्के, मत व माहिती : ५·७३ टक्के आणि आवाहन : ७·६३ टक्के अशी विभागणी झालेली आढळते.

सकाळ : ( १ ) सुखाडिया का गेले ? ( १ जुलै ); ( २ ) कापूस व्यापाराचा घोळ ( ५ जुलै ); ( ३ ) घोड्यापुढे गाडी ( ८ जुलै ); ( ४ ) फर्नांडिसना धडा ( १४ जुलै ); ( ५ ) घसरलेली गुणवत्ता ( २५ जुलै ); ( ६ ) तेलकिंमतीत वाढ ( २७ जुलै ); ( ७ ) झोटिंगशाही ( २ ऑगस्ट ); ( ८ ) खुनाचे राजकारण ( ५ ऑगस्ट ); ( ९ ) पोलाद–टंचाई ( ८ ऑगस्ट ); ( १० ) दयेचे मरण ( १४ ऑगस्ट ); ( ११ ) पळवाटा ( १९ ऑगस्ट ); ( १२ ) समाजवाद कोठे गेला ? ( २१ ऑगस्ट ); ( १३ ) अरब ऐक्याचा शोध ( ४ सप्टेंबर ); ( १४ ) भिक्षेच्या मार्गावर ( ९ सप्टेंबर ) ( १५ ) पोलिसांचा लोकसंपर्क ( १२

सप्टेंबर ); ( १६ ) क्रीडाजगात स्थान ( १९ सप्टेंबर ); ( १७ ) धोक्याचे धनी कोण ? ( २३ सप्टेंबर ); ( १८ ) खल्याळपणा ( ३० सप्टेंबर ); ( १९ ) चव्हाण विरुद्ध धारिया ( ८ ऑक्टोबर ); ( २० ) संपवाल्यांची भाषा ( ९ ऑक्टोबर ); ( २१ ) बांगला देश धोरण ( १४ ऑक्टोबर ); ( २२ ) रशियन शस्त्रांचे मोल ( १८ ऑक्टोबर ); ( २३ ) करवाढ ( २५ ऑक्टोबर ); ( २४ ) लोक मदतीस आले ( २६ ऑक्टोबर ); ( २५ ) काँग्रेसची सत्तास्पर्धा ( १२ नोव्हेंबर ); ( २६ ) सलोखा का हवा ? ( १६ नोव्हेंबर ); ( २७ ) -होडेशियाचा बळी ( १९ नोव्हेंबर ); ( २८ ) लाल क्रांतीचा मार्ग ( २३ नोव्हेंबर ); ( २९ ) ग्राहकांची संघटना ( २८ नोव्हेंबर ); ( ३० ) मान्यता हाच मार्ग ( ३० नोव्हेंबर ); ( ३१ ) युद्धाची वाढती कक्षा ( ६ डिसेंबर ); ( ३२ ) बांगला देशाचा जन्म ( ७ डिसेंबर ); ( ३३ ) आघाडीवर आगेकूच ( १० डिसेंबर ); ( ३४ ) याह्यांचे बचावास ( १६ डिसेंबर ); ( ३५ ) भुट्टोंना सर्वाधिकार ( २१ डिसेंबर ); ( ३६ ) डॉलर घसरला ( २६ ऑक्टोबर ).

या अग्रलेखांच्या पाहणीत मत : ४६·०४ टक्के, माहिती : ३७·६२ टक्के, मत व माहिती : ८·४२ टक्के व आवाहन : ७·९२ टक्के अशी विभागणी झालेली आढळते.

प्रस्तुत पाहणीत 'महाराष्ट्र टाईम्स' व 'सकाळ' या वृत्तपत्रांची कोणत्याही बाबतीत तुलना करण्याचा दृष्टिकोण ठेवलेला नव्हता. या दोन वृत्तपत्रांतील अग्रलेखांच्या अनुषंगाने वाचकांवर झालेला परिणाम तपासण्याचा प्रयत्न तेवढा केला.

अग्रलेखासंबंधीचा मूळ गृहीत सिद्धान्त सर्वसाधारणपणे सिद्ध होत असला तरी अग्रलेखांची उपयुक्तता आणि परिणामकारकता वाढविण्याच्या दृष्टीने विविध पातळ्यांवर अधिक जाणीवपूर्वक प्रयत्न व्हावयास हवे आहेत यात शंका नाही.

## साभार पोच

**विश्वमोहिनी प्रकाशन** : टिळक रस्ता, पुणे ३०. दिनकर देशपांडे; जंगलातील वेताळ ( नाटक ); पृ. ५२; किं. ३ रु.

**अनवांछित** : अरविंद गोखले; कॉन्टिनेंटल प्रकाशन, विजयानगर कॉलनी, पुणे ३०; पृ. १६८; किं. ७ रु.

**मी एक कार्यकर्ता** : विश्वनाथ आण्णा तथा तात्यासाहेब कोरे–षष्ठ्यब्दिपूर्ती समारंभ समिती, वारणानगर; ग्रंथ प्रकाशक; स. आ. गुळवणी; पृ. २८०; किं. १० रु.

अनुक्रमणिका

## शब्दवेध :

प्रा. रा. श्री. जोग

मराठीमध्ये संस्कृतमधून असे काही शब्द आले आहेत की, ज्यांच्या रूप-लेखनाबद्दल मनात नेहमीच संदेह राहतो. त्यांची दोन-दोन रूपे असलेली दिसतात. सूचि-सूची, रुक्ष-रूक्ष, कुष्ट-कुष्ठ या जोड्या अशा आहेत. संस्कृत कोशामध्ये त्यांची दोनही रूपे दिलेली असतात. याचा अर्थ संस्कृतमध्येच त्यांची ही दोनही रूपे उच्चारणात आणि ऐकण्यात येत असत. तेव्हा कोशकारांना ती दोन्ही नमूद करावी लागत. यांपैकी मूळचे कोणते आणि नंतरचे कोणते हे ठरविणे कठीण आहे. कदाचित अधिक रूढ आणि कमी रूढ असा फरक करणे शक्य असेल. अधिक रूढ रूप प्रधान मानून त्याखाली त्याचा एक वा अनेक अर्थ क्रमाने आणि उदाहरणासह द्यावयाचे आणि कमी रूढ असलेल्या रूपापुढे अर्थ दुसऱ्या रूपाखाली पाहा असे म्हणावयाचे असे करण्यात अर्थ देण्यात मागे पुढे झाले तरी चाले. उदाहरणार्थ रुक्ष हे रूप वर्णानुक्रमाप्रमाणे आधी आले असले तरी ' पुढे रूक्ष खाली पाहा ' असे म्हटले आहे. उलट वेष शब्दाचा अर्थ वेश खाली पाहा असे आधीच्या रूपाचा हवाला देऊन म्हटले आहे. सूचि आणि सूची यांना एकच शब्द मानून एकाच ठिकाणी अनेक अर्थ दिले आहेत. माणसाची उच्चारसौकर्याकडे असणारी स्वाभाविक प्रवृत्ती पाहून असे म्हणावेसे वाटते की, अधिक उच्चारसुकर असणारे रूप हे नंतरचे आणि दुसरे रूप आधीचे असावे. कारण अधिक उच्चार सुकर असल्याविना दुसरे रूप सहसा अस्तित्वात येणार नाही. या दृष्टीने पहिले रूप ' सूचि ' असे ऱ्हस्वान्त असावे आणि अंत्याक्षराची प्रवृत्ती दीर्घीकरणाकडे असल्यास दुसरे रूप कदाचित नंतरचे असावे. पण त्याबद्दल नक्की सांगणे कठीण आहे. रुक्ष आणि रूक्ष यांमध्ये रूक्ष शब्द अधिक रूढ असावा, कारण त्याचे अर्थ त्या रूपाखाली दिले आहेत. रुक्ष वर्णानुक्रमाने आधी येऊन सुद्धा पुढील रूपाकडे बोट दाखवून त्याची बोळवण केली आहे. दोन्ही रूपांत मात्रांचे वजन सारखेच–म्हणजे ३ मात्रांचे आहे. रुक्षमध्ये पुढील अक्षर जोडाक्षर असल्याने आधीच्या ऱ्हस्व ' रु ' वर आघात येऊन एकंदर मात्रासंख्या ३ होतात. असे असले तरी या साघात उच्चारणामुळे रुक्ष या रूपात उच्चारणात अधिक जोर येतो.

आणि त्यामुळे अर्थामध्येही तो येतो असा भास होतो. म्हणून मराठीत अनेक लोक तसे उच्चारण आणि लेखन करिताना दिसतात. 'रू' दीर्घ उच्चारल्याने तो भास होत नाही व ते उच्चारणही लक्ष ठेवून करावे लागते. पण बहुधा तेच संस्कृतमध्ये अधिक रूढ होते. तथापि दुसरेही उच्चारण अधूनमधून का होईना होत असावे, म्हणून त्याही रूपाचा कोशात तांत्रिकरीत्या समावेश केला आहे.

कुष्ट आणि कुष्ठ या रूपांबाबतही असेच काही झाले असावे; जसे शिष्ट आणि शिष्ठ या रूपांचे आज झालेले आहे. शिष्ठ या रूपाला अजून कोशाची मान्यता मिळालेली नाही, पण ती लौकरच द्यावी लागेल असे वाटते. त्या रूपाला आज काही कुत्सितार्थही प्राप्त झाला आहे. पण मूळ चांगल्या अर्थाच्या या शब्दास उपरोधाने तो योजिल्याने आला आहे. मूळचा नव्हे. 'मोठा शिष्ट-ष्ठ आहे,' असे म्हणताना तो अर्थ मनात असतो. तेव्हा हा औपरोधिक अर्थ असणारा शब्द मूळ शब्दापेक्षा वेगळा वाटावा म्हणून त्याच्या उच्चारणात फरक केला व अर्थदृष्ट्याही तो शब्द वेगळा झाला. कुष्ट आणि कुष्ठ यांत अर्थदृष्ट्या काही वेगळेपण नसताना रूपे मात्र भिन्न झाली आहेत.

मिलन – मीलन या शब्दांच्या जोडीची तर गंमतच झाली आहे. ही एकाच अर्थाच्या शब्दाची दोन रूपे असावीत असे वाटते, पण ती तशी नाहीत. मिलन म्हणजे मिळणे, एकत्र येणे, जमणे, एक होणे आणि मीलन म्हणजे मिटणे, झाकणे, मिटवणे. दोन्हींचे मूळ धातूही कोशात भिन्न दिलेले आहेत. मिलनमध्ये मूळ धातू मिल् असा असून तो सहाव्या गणाचा उभयपदी आहे. मीलनमध्ये तो मील् असा परस्मैपदी पहिल्या गणाचा आहे व त्याच्या अर्थात वर दिल्याप्रमाणे भेद आहे. या दोन शब्दांपैकी मिलन हा शब्द मराठीमध्ये नसल्यासारख्याच आहे. महाराष्ट्र शब्दकोश (दाते–कर्वे) मध्ये तो दिलेलाच नाही. मात्र त्याचा अर्थ मीलन याने बळकावलेला आहे व तोच त्याचा प्रधान अर्थ म्हणून कोशात दिलेला दिसतो. त्यातील पहिले चार अर्थ मिश्रण, भेट, मिळणी, ऐक्य असे जवळजवळ एकाच अर्थाचे देऊन पुढे उघडझाक व खग्रास ग्रहण असे दुसऱ्या अर्थाचे वाचक शब्द दिले आहेत. वस्तुतः मीलन या क्रियेत मिटणे, झाकणे एवढाच अर्थ आहे. उघडण्याचा अर्थ नाही. तो उन्मीलन या शब्दाचा आहे, व उघडझाक हा अर्थ मीलनोन्मीलन या दुहेरी शब्दाचा आहे, आणि त्यातही आधी मिटणे व नंतर उघडणे असे अर्थ येतात. या अर्थी मीलनोन्मीलन या शब्दाचा उपयोग ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत अ. १७, ओवी ५ मध्ये केलेला आहे आणि त्यामध्ये दोन्ही क्रिया त्यांना अभिप्रेत दिसतात. ( दैविसी दिठी पाहतां सानी। तऱ्ही मीलनोन्मीलनी इत्यादी ). मीलन शब्दाने मराठीमध्ये मिलनचा ग्रास करून त्याचा अर्थही बळकावलेला आहे. एवढेच नव्हे, तर त्याचा अर्थच आपला मुख्यार्थ केला आहे आणि आपला मूळ अर्थ विस्मृतप्राय केला आहे.

वेश–वेष या जोडीचीही काहीशी अशीच स्थिती आहे; पण ती मराठीने करण्यापेक्षा संस्कृतनेच करून ठेवली आहे. यातही मूळ धातू भिन्न आहेत आणि त्यांच्या अर्थामध्येही

काहीसा भेद आहे. वेश याचे मूळ विश् हा ६ व्या गणाचा परस्मैपदी धातू आहे, तर वेष याचा विष् हा ३ ऱ्या गणाचा उभयपदी धातू आहे. विश् धातूच्या अर्थच्छटा चारपाच असल्या तरी प्राधान्याने प्रवेश करणे, आत जाणे, वसणे हा त्याचा अर्थ आहे. विष् धातूचे तसेच असले तरी त्याचा अर्थ आत जाणे, प्रवेश करणे असा नसून बाहेरून एखाद्या वस्तूस वेढणे, आवरण घालणे असा आहे. यावरून वेश याचा मुख्य अर्थ घर, प्रवेश करण्याची, राहण्याची जागा असा होतो, तर वेष याचा अर्थ वरून घालण्याचा पोशाख असा होतो. पोशाख या अर्थी वेष ( ष पोटफोड्या ) हेच रूप संस्कृतमध्ये बहुधा योजिलेले असते; क्वचितच वेश असे अपवादादाखल दिसेल. उलट वेश्या किंवा त्यांची वसती इत्यादी अर्थी बहुधा वेश हेच रूप योजिले जाई. याचा अर्थ असा की हे दोन शब्द भिन्न असून त्यांचे अर्थही प्रथम तरी भिन्न असावे. तथापि काहीजण त्या दोन शब्दांत गल्लत करीत आणि त्यामुळे कोशकारांना ते ते अर्थ या दोन्ही शब्दांना द्यावे लागत. वेश शब्दाचा एक अर्थ जरी पोशाख असा दिला असला तरी इतर अर्थ घर, वसती, वेश्यांचे निवासस्थान असे दिले आहेत. वेश्या किंवा वेशवनिता, वेशनारी इत्यादी संबद्ध अर्थांच्या शब्दांत ' श ' च आहे; ' ष ' नाही. या घोटाळ्यामुळे वेश्या शब्दाचे वेष्या असेही रूप कोशात दिले आहे. पण त्या शब्दाची योजनास्थळे सहसा आढळत नाहीत. असावधपणे लेखन करणारे काही शिष्ट लोक तेव्हाही होतेच. पोशाख या शब्दार्थाचा वेश्यांशी मुळीच संबंध नसेल, तेथे तो आपण वेश असा न लिहिता वेष लिहावा हे बरे; नाहीतर मनात नसलेला, अनिष्ट अर्थ त्यातून किंवा त्याबरोबर सूचित व्हावयाचा.

## साभार पोच

**श्रीरामकृष्ण विवेकानंद साहित्य** : ( नवीन सूचिपत्र ); श्रीरामकृष्ण आश्रम धंतोली नागपूर १२.

**मराठी व्याकरण काही समस्या** : प्र. ना. दीक्षित – शुभदा प्रकाशन, लक्ष्मीनगर फलटण. पृ. १४२; किं. १० रु.

**सुवर्ण संगम** ( कवितासंग्रह ) : र. रा. भांबे, गुरुकृपा, ब्लॉ. नं. १०, शिवाजीनगर, इचलकरंजी; पृष्ठे ५२; किंमत ४ रु.

**भारत ईराणी संश्लेष** ( लेखसंग्रह भाग १ ) : देवीसिंग चौहान; सचिव महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, राष्ट्रभाषा भवन, नारायण पेठ, पुणे ३०; पृष्ठे ३००; किंमत १५ रु.

अनुक्रमणिका



# " गोरक्ष अमरनाथ संवाद " ग्रंथाचा कर्ता अमरनाथच होय.

प्रा. मधुकर रामदास जोशी



विदर्भ संशोधन मंडळाच्या १९६९ वार्षिकात मी गोरक्ष अमरनाथ संवाद नावाच्या प्राचीन ग्रंथाची त्रुटित प्रत प्रसिद्ध केल्यानंतर ह्याच ग्रंथाची नोंद भारत इतिहास संशोधन मंडळाच्या हस्तलिखित सूचीत आढळली.[१] दरम्यानच्या काळांत उस्मानिया विद्यापीठातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिकेतून प्रा. व. दा. कुलकर्णी यांनी मानभाव संग्रहांतील ह्या ग्रंथाची प्रत प्रसिद्ध केली.[२]

प्रा. कुलकर्णी यांना मिळालेली प्रत अस्सल व विश्वसनीय नाही. त्यावर मानभावी संस्करण झालेले दिसतात. एवढेच नव्हे तर मूळ ग्रंथांत जाणीवपूर्वक फेरफार केल्याची संभवनीयता दिसून येते. उदाः–

येक म्हणती हा अष्टांग : चौऱ्याशी लक्ष जीव योनी : यैसी संख्या बोलीली आसे : तो जीव जैसा वैसे तयासि ते चि आसन : तयामध्ये श्रीनाथी सोळ उणे ऽत केले : त्या चौऱ्यांस्या मध्ये संती दोनि अंगी करीली : ॥

हा उतारा मूळ ग्रंथातील नाही. उत्तरकालीन प्रतलेखकाला अभिप्रेत असलेल्या संज्ञा तो वापरतो. परिभाषा नाथसंप्रदायाशी विसंगत आहेत. ' तो जीव जैसा वैसे ' या वाक्यातील जीव संज्ञा नाथसंप्रदायाच्या तत्त्वज्ञानाशी विसंगत आहे. महानुभावीय संज्ञा प्रतलेखकाने समाविष्ट केली. नाथपंथात " पिंड " संज्ञा आढळते. स्वतःच्या पंथातील काही संज्ञा जाणीवपूर्वक दुसऱ्या ग्रंथात समाविष्ट करून मूळ ग्रंथ संहिताभ्रष्ट करण्याचा प्रयत्न महानुभावीयांनी विवेकासिंधूत केला आहे.

" त्या चाऱ्यांस्यामध्ये संती दोनी अंगी करीली " या विधानात चौऱ्हायंशी आसनांपैकी

---

१. गोरक्ष अमरनाथ संवाद क्र. ३६, १२४८ भारत इतिहास संशोधक मंडळ हस्तलिखित सूचि.

२. मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका; अंक ६; उस्मानिया विद्यापीठ हैदराबाद.

अनुक्रमणिका

संतांनी दोन आसनांचा अंगीकार केला असे प्रतलेखक म्हणतो. वारकरी संप्रदायात संत संज्ञा आहे. ज्ञानेश्वरांनी श्रोते व संतसभा असे शब्द योजिले आहेत. ज्ञानेश्वरांनी दोनच आसनांचा अंगीकार केला हे प्रतलेखकाचे विधान बरोबर नाही. शिवाय पुढच्या उताऱ्यातील पद्मासन व वज्रासनाचा उल्लेख ज्ञानेश्वरीशी विसंगत आहे.

गोरक्ष अमरनाथ संवाद ग्रंथ नावावरून नाथसंप्रदायाचा आहे हे स्पष्ट दिसत असताना प्रा. व. दा. कुलकर्णी यांनी मात्र महानुभाव संप्रदायातील त्या ग्रंथाची संहिता प्रमाण समजून तिचे संपादन केले आहे ! !

ग्रंथाच्या समाप्तिमुद्रेत, " इति गोरक्षनाथ वचनी आमरनाथ कथयेती वीवेक दर्पणू ग्रंथु संपूर्ण सूभम् भवतु ॥ छ ॥ " असा उल्लेख आहे. प्रा. व. दा. कुलकर्णी यांच्या मते अमरनाथ ऐतिहासिक व्यक्ती नाही. मात्र अमरनाथाच्या नावावरील नाथपंथातील उपशाखेची नोंद प्रा. कुलकर्णी करतात. अमरनाथ झाला नसताना त्याच्या परंपरेत नाथसंप्रदायाची उपशाखा कशी निर्माण होते याचा खुलासा प्रा. व. दा. कुलकर्णी करतील काय ?

श्रीनिवृत्तीनाथांच्या अभंगात पुढील चरण प्रसिद्ध आहे.

" निवृत्ति परिवार । गुरू गयनि अमर ॥
गोरक्ष कंदर । ब्रह्म माझे ॥ "

यामधील अमर हे व्यक्तिनाम नसून गहिनीचे विशेषण असावे असे प्रा. कुलकर्णी म्हणतात. वास्तविक श्रीनिवृत्तींनी आपल्या गुरुपरंपरेतील गुरूंचा उल्लेख ह्या ठिकाणी ' नाथ-पदान्त ' नावाने न करता केवळ नावाने केला. गोरक्ष, गयनि प्रमाणेच अमर नाव त्यांना अभिप्रेत आहे. अमर हे उत्तरपदी विशेषण योजिलेले इतर पुरावे निवृत्तिनाथांच्या अभंगात आढळत नाही. निवृत्तिपरिवारांत गुरुंचे विशेषण उत्तरपदी तुटक व स्वतंत्रपणे योजण्याची पद्धत होती असे कुलकर्णी यांनी दाखवून दिले नाही.

ग्रंथाच्या समाप्तिमुद्रेत गोरक्षनाथप्रमाणेच अमरनाथ नाव स्पष्ट आहे. काही प्रकरणांत " इति गोरक्षनाथ वचनी अमरनाथ कथनी नीजविचारे चंद्रसूर्यविवेक " असाही उल्लेख येतो. या ठिकाणी अमरनाथ गोरक्षनाथांचे विशेषण कसे काय ठरते ? अशा प्रकारचे विशेषण वापरण्याचे अद्भुत व्याकरण पूर्वी होते काय ? शिवाय ' अमर 'ऐवजी अमरनाथ अशी शब्दयोजना आहे. " अमरनाथ गोरक्षनाथ " असा गोरक्षनाथांचा उल्लेख संपूर्ण नाथ-संप्रदायाच्या वाङ्मयांतून एकतरी पुरावा प्रा. कुलकर्णी यांनी दाखवून द्यावा.

कुलकर्णी–मताला पाठिंबा देण्यासाठी प्रा. कहाळेकर पुढे सरसावले. मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिकेच्या सातव्या अंकात विवेकदर्पण नावाखाली एक टिपण त्यांनी लिहिले असून प्रा. कुलकर्णीच्या मताची री ओढली. प्रा. कहाळेकर लिहितात, [३] " प्रा. व. दा. कुलकर्णी

३. मराठी–स्वाध्याय संशोधन पत्रिका, अंक ७, उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद.

यांनी या चरणांतील ' अमर ' हे व्यक्तिनाम नसून विशेषण मानिले आहे ते योग्य वाटते, परंतु नंतरच्या चरणांतील ' कंदर ' या शब्दाचा अर्थ त्यांनी स्पष्ट केला नाही. ' कंदर ' या शब्दाऐवजी तेथे मछिंदर । मछंदर हा शब्द असावा. पुनर्लेखनाच्या अवस्थेत ' म ' हा गळाला असावा. तसेच ' छ चे वाचन ' कं ' असे होण्याची शक्यता दृष्टिआड करता येत नाही. ' छं ' चा इकार गोरक्षाला लागला असावा. " प्रा. कहाळेकरांचा कल्पनाविलास प्रशंसनीय नाही असे म्हणण्याची कोणाची हिम्मत आहे !

( १ ) पुनर्लेखन अवस्थेत ' म ' गळतो.

( २ ) छ चे वाचन ' क ' होते

( ३ ) छ चा इकार गोरक्षाला लागला असावा. या तीन विधानांना काही तरी अर्थ आहे काय ?

कंदरचा अर्थ नीट लागत नाही असे प्रा. कहाळेकर म्हणतात. त्यांच्या समाधानासाठी ज्ञानेश्वरीतील या शब्दाचा उपयोग त्यांनी पाहावा म्हणून पुढील ओव्या उद्धृत करतो.

शैलकक्षांची कंदरे । जळाशय परिकरे ।
अधिष्ठि जो आदरे । नगरा न ए ॥ ओ ६११–अ. १३ राजवाडे प्रत.
तेणे महाघोष गजरे । दुमदुमिताती गिरिकंदरे
तव दळामाजी रणतुरे । आस्फारिली ॥ १३०–१ दांडेकर प्रत

वरील ओव्यात कंदर म्हणजे गुहा अर्थाने ह्या शब्दाचा वापर ज्ञानेश्वरांनी केला आहे. लक्षणेने हृदय अर्थाने निवृत्तिनाथांनी हा शब्द वापरला.

या प्रश्नांचा विचार करतांना प्रा. कुलकर्णी यांनी अजून एक मुद्दा उपस्थित केला. त्यांच्या मते निवृत्तिपरिवारात गुरूबरोबर गुरुबंधूचा उल्लेख करण्याची पद्धत नव्हती. तर नवरीपेक्षा करवलीचा तोरा जास्त या न्यायाने प्रा. कहाळेकर सुचवितात की, गुरुबंधु, परमगुरुबंधु व परात्परगुरुबंधु यांची नावे सांगण्याची पद्धत निवृत्तिपरिवारात नव्हती. प्राध्यापकद्वयांचे आक्षेप, वस्तुस्थिती न पाहता केलेले आहेत.

( १ ) प्रा. भालचंद्र ( महाराज ) कहाळेकरांनी ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातील गुरुपरंपरा पाहावी. त्यात त्यांना चौरंगीनाथाचे नाव आढळेल. ज्ञानेश्वरांनी परात्परगुरू बरोबर परात्परगुरुबंधु चौरंगीनाथांचा उल्लेख केलेला आहे. ज्ञानेश्वर काय निवृत्ति–परिवाराच्या बाहेरचे आहेत ?

( २ ) तत्त्वसारकर्ता चांगदेव नाथपंथीय आहे. त्याची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे आहे :– गोरक्ष–भर्तृहरि–मुक्तादेवी त्याच्या ग्रंथात चौरंगीनाथाप्रमाणेच इतर नाथसिद्धांचे उल्लेख आहेत. सर्व सुसावरी । नागार्जुन कणेरी । लुरलाला ककुरी । रत्नघोष । या ओवीत कणेरी व रत्नघोष ह्या दोन नागार्जुनशिष्यांचा उल्लेख आहे. नागार्जुन हा मत्स्येंद्रनाथांचा शिष्य आहे. हे मी स्वतंत्र लेखात मांडले आहे.

( ३ ) नाथपंथाच्या इतिहासात जालंदरशिष्य गोपीचंदाचे नाव येते.

गोपीचंद म्हणतो, " गुरू हमारे गोरष बोलियें

चरपट है गुरूभाई ॥

जालंदर व गोरक्ष मत्स्येंद्रांचे शिष्य आहेत. गोपीचंद गोरक्ष चर्पट यांचे उल्लेख करतो.

( ४ ) चर्पट पंचिः मूखर जाणा । पढे पर्वति बोल गंगाण ॥ असे एक गीत उपलब्ध आहे[४] यामधून चर्पटी पार्वती गंगानाथ परंपरा समजते. डॉ. हजारीप्रसाद द्विवेदींनी पार्वती नाथाची सबदी प्रसिद्ध केली असून त्यात गुरुबंधु परंपरेतील कंथडीनाथाचे नाव येते.

( ५ ) नागार्जुनशिष्य कणेरीनाथाचे एक पद डॉ. हजारीप्रसाद द्विवेदींनी छापले आहे.[५]

आदिनाथ नाती मछिंद्रपुता । सती कणेरी हम बोल्या रे लो ॥

( ६ ) गोरक्ष–विमला–बालनाथ नावाची नाथपंथात एक उपशाखा आहे. यामधील बालनाथाने आपल्या गुरुबंधूचा, भर्तृहरीचा उल्लेख एका पदात केला आहे.

( ७ ) संत नामदेवांनी निवृत्तिनाथ समाधिविषयक अभंगात मत्स्येंद्र, सतकाळनाथ, गुप्तनाथ इत्यादी मत्स्येंद्र परंपरेतील नाथसिद्ध यांचा उल्लेख निवृत्तीच्या " नमनात " दिला आहे. सत्यकाळनाथ व अमरनाथ गहिनीनाथांचे गुरुबंधू आहेत.

( ८ ) नरहरिशिष्य महिपती यांनी आपल्या अभंगात गुरुपरंपरेप्रमाणे परात्परगुरू व निवृत्तिनाथपरिवारातील सोपानदेव व मुक्ताई यांना नमन केले आहे.[६]

वरील विवेचनावरून स्पष्ट होईल की, प्रा. कुलकर्णी व प्रा. कहाळेकर यांचे तर्क वस्तुस्थितीशी विसंगत असून अग्राह्य आहेत. अमरनाथ हे गोरक्षाचे विशेषण नाही. अमरनाथ नावाचा नाथसिद्ध गहिनीचा गुरुबंधु व गोरक्षनाथाचा शिष्य आहे.

---

४. काही प्राचीन नाथसिद्ध : मराठी संशोधन पत्रिका अंक ४, जुलै १९७०

५. नाथसिद्धोंकी बॉनिया, द्विवेदी हजारीप्रसाद, नागरी प्रचारसभा.—काशी

६. महाराष्ट्र सारस्वत; पान ४५४; पाचवी आवृत्ती : संपादक तुळपुळे शं. गो.

## ग्रंथपरीक्षण

**' निस्पृह '**
**न. म. जोशी**

संजय प्रकाशन, पुणे ४;
फर्ग्युसन कॉलेज रोड, मूल्य २० रु.

राघोबादादा पेशव्यालाही देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा सुनावणाऱ्या रामशास्त्री प्रभुणे या न्यायाधीशाची जीवनकथा श्री. न. म. जोशी यांनी या कादंबरीत रंगविली आहे. श्री. जोशी यांना लेखनाचा चांगला सराव आहे. आजपर्यंत त्यांनी चरित्र, कादंबरी, एकांकिका इत्यादी वाङ्मयक्षेत्रात भरपूर संचार केलेला आहे. या पूर्व तपश्चर्येचा आधार असल्याने त्यांची निःस्पृह ही कादंबरी वरवर चाळली तरी वाचकाला तल्लीन करून सोडल्याशिवाय राहात नाही. श्री. रणजित देसाई यांच्या ' स्वामी ' कादंबरीनंतर ऐतिहासिक कादंबऱ्यांचे जे नवीन युग सुरू झाले त्या लाटेतच ही कादंबरी निर्माण झालेली आहे. ऐतिहासिकता आणि चरित्रात्मकता अशा दोन्ही अंगांनी या कादंबरीची रचना करण्याचा लेखकाचा उद्देश स्पष्ट आहे. रामशास्त्र्यांच्या चरित्राविषयी विशेषतः पूर्वायुष्यासंबंधी अस्सल साधनसामग्री मिळत नसल्याने लेखकाला कल्पनेचाच धागा पकडून कादंबरीचा पूर्वार्ध लिहावा लागला. या पूर्वभागाचा विचार केला तर तत्कालीन वातावरणाला जुळेल अशा प्रकारचे लेखन करण्यात श्री. जोशी यांनी चांगले यश मिळविले आहे. आपल्या उत्तर आयुष्यात निर्भयपणे खुनी पेशव्यालाही कठोर देहदंडाची सजा फर्मावणाऱ्या रामशास्त्र्यांच्या बेडर व्यक्तिमत्त्वाची घडण लहानपणापासूनच कशी होत गेली याचा धावता चित्रपट कादंबरीकाराच्या सराईत लेखनकौशल्याचा निदर्शक आहे.

रामशास्त्र्यांच्या जीवनाला खरेखरे महत्त्व माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत प्राप्त झाले आणि सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत त्याची खरी कसोटी लागली. या काळातील ज्ञात घटनांचा लेखकाने शक्य तेवढा उपयोग केला आहेच, परंतु अर्धसत्य आणि काल्पनिक असेही प्रसंग रंगवून रामशास्त्र्यांच्या चरित्राभोवती एक तेजोवलय निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. इतिहासाचा विपर्यास करणे ही गोष्ट जेवढी आक्षेपार्ह आहे तेवढी ऐतिहासिक

अनुक्रमणिका

सत्याचा अतिरिक्त गौरव करणे ही गोष्ट आक्षेपार्ह वाटणार नाही. परंतु वेठविगारपद्धत नाहीशी करणे, कायस्थ प्रभूंना वेदोक्त संस्काराची परवानगी देणे, पुनर्विवाहाचे समर्थन करणे इत्यादी गोष्टींना इतिहासाचा बळकट आधार नाही ही गोष्ट सुजाण वाचकाने लक्षात ठेवली पाहिजे.

तरीही तत्कालीन इतिहासाला अगदी विसंगत दिसतील अशा घटना रेखाटण्याचे त्यांनी टाळले असते तर बरे झाले असते. पाठशाळेच्या गुरुजनांकडून अध्ययन पूर्ण केलेल्या रामला निरोप, न्यायाधीशपदावर नियुक्त झालेल्या रामशास्त्र्यांच्या सत्काराची माहुली येथील जाहीर सभा, शनिवारवाड्यातील गणेशोत्सवात स्त्री-कीर्तनकाराने केलेले पुनर्विवाहाचे मंडन या-सारखी वर्णने विसाव्या शतकातच शोभणारी आहेत.

ऐतिहासिक कादंबरी लिहिताना भाषेच्या साहाय्याने समकालीन वातावरणाचा आभास निर्माण करणे अवश्य असते. बखरवाङ्मय आणि ऐतिहासिक पत्रव्यवहार यांच्या मदतीने निदान दरबारी मुत्सद्द्यांच्या भाषेत अठराव्या शतकाचा प्रत्यय आणून देणे अवघड नाही. परंतु श्री. जोशी यांनी तसा प्रयत्न केल्याचे दिसत नाही. त्यांच्या कादंबरीतील सर्व लहान-थोर स्त्री-पुरुष आजच्या पांढरपेशा समाजाची भाषा योजताना दिसतात. राणोजीसारखा पेशव्यांचा सेवकही ' स्वामिनिष्ठा बोलत नाही, करते " असे प्राज्ञ मराठी बोलतो. भाषिक दृष्टीने ही उणीव साऱ्या कादंबरीत सतत जाणवणारी आहे. ऐतिहासिक दृष्टी बाजूला ठेवली तर मात्र श्री. न. म. जोशी यांच्या प्रसन्न भाषाशैलीने वाचक सुखावल्याखेरीज राहात नाही. पाल्हाळिक वर्णने न करता मोजक्या शब्दांत प्रसंग उभे करण्यात श्री. जोशी यांचा हातखंडा आहे.

' स्वामी ' च्या अनुकरणाने रामशास्त्र्यांच्या कौटुंबिक जीवनाचे हळुवार चित्रण करण्याची श्री. जोशी यांची धडपडही कौतुकास्पद वाटण्याइतकी सरस झाली आहे. रामशास्त्र्यांचे कौटुंबिक आणि लौकिक व्यक्तिमत्त्व रेखाटताना श्री. जोशी यांना ' स्वामी ' या कादंबरीप्रमाणेच ' प्रभात ' च्या रामशास्त्री या गाजलेल्या बोलपटाचेही थोडेफार साह्य झाले असावे. अर्थात वरील दोन्ही कलाकृतींचा पावलोपावली आधार घेतच ' निःस्पृह ' कादंबरीची वाटचाल झाली आहे असे कोणीच म्हणणार नाही.

— डॉ मु. श्री. कानडे

## वनवळ्यांचॉ मळॉ

( पाद्री मिगेल. द–अहमैद )

**संपादक : डॉ. वि. वा. प्रभुदेसाई** प्रकाशक, नागपूर विद्यापीठ नागपूर; पृष्ठे ११४.

भारतात प्रवेश केलेल्या जेजुइट पंथाच्या मिशनऱ्यांनी आपले ख्रिस्ती धर्मप्रसाराचे उद्दिष्ट सुकर होण्याच्या दृष्टीने मराठीत ग्रंथरचना करून ख्रिस्ती पुराणकथांना मराठी स्वरूप देण्याचे अनेक प्रयत्न केले. प्रस्तुत ग्रंथ हा अशाच प्रकारचा एक गद्य स्वरूपातील प्रचारात्मक ग्रंथ असून तो पाद्री मिगेल–द–आहमैद याने इ. स. १६५८ मध्ये रचलेला आहे.

ख्रिस्ती धर्माची शिकवण आणि ती परिणामकारक होण्यासाठी येशू ख्रिस्त, सेंट मेरी, सेंट पीटर इत्यादी ख्रिस्ती संतपुरुषांच्या जीवनातील कथा हे या ग्रंथाचे स्वरूप आहे. मूळ ग्रंथ पंचखंडात्मक लिहिला गेला असला तरी आता त्याचे दोनच खंड उपलब्ध असून त्यांपैकी तिसरा खंड हा डॉ. प्रभुदेसाई–संपादित पुस्तकाचा आधार आहे.

फादर स्टीफन्सच्या क्रिस्तपुराणाप्रमाणेच, हे सारे जेजुइट पंथाचे वाङ्मय, मराठी भाषेत लिहिलेले असले तरी ते रोमन लिपीत आहे. या लिपीचा स्वीकारही, ती ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराला पोषक होईल या दृष्टीनेच करण्यात आला होता. रोमन लिपीतून देवनागरीत आणण्याचे काम अत्यंत जिकिरीचे असते. पण डॉ. प्रभुदेसाई हे कै. प्रा. प्रियोळकर यांच्यासारख्या संशोधनकार्यात अपार कष्ट घेणाऱ्या गुरूच्या तालमीत तयार झालेले असल्याने त्यांनी हे लिप्यंतरीकरणाचे काम निर्दोष पद्धतीने केलेले आहे. ग्रंथकार, ग्रंथाचे देवनगरीत अवतरण आणि ग्रंथाचा आशय यासंबंधी डॉ. प्रभुदेसाई यांनी आपल्या प्रस्तावनेत कितीतरी नवीन माहिती नमूद केली आहे. वर्णनशैली, समकालीन परिस्थितीचे निर्देश, ग्रंथातील अपरिचित असे पोर्तुगीज शब्द आणि परिचित असे ग्रंथिक मराठीतील शब्द, त्याचप्रमाणे गोमंतकी बोलीतील वैशिष्ट्यपूर्ण शब्द इत्यादी विषयांचा प्रस्तावनेत पद्धतशीरपणे परामर्श घेण्यात आलेला आहे. त्याचबरोबर ग्रंथातील कथाभागही संक्षेपाने दिला असता तर अभ्यासकांच्या दृष्टीने बरे झाले असते. ग्रंथ देवनगरीत आणताना डॉ. प्रभुदेसाईंनी मूळ रोमन ओळीबरहुकूम देवनागरी ओळ मुद्रित करण्याचे धोरण ठेवले आहे. यामुळे त्यांना ये-क, व-स्तुं,चो आ–णी, प–वित्र अशी शब्दांची विचित्र मोडतोड करणे भाग पडले आहे. त्याऐवजी प्रत्येक परिच्छेदाचे मुद्रण धावत्या पद्धतीने केले असते तरी चालले असते.

ग्रंथातील शब्दांचा अकारविल्ह्याने रचलेला कोश शेवटी जोडून संपादकांनी ग्रंथाची उपयुक्तता वाढविली आहे. त्यातील तद्भव शब्दांचे अर्थ समजणे सोपे आहे, परंतु गोमंतकी बोलीतील अनेक शब्द मात्र प्रमाण मराठीत रुळलेले नसल्याने त्यांचा चटकन अर्थ ध्यानात येत नाही. त्यांचे अर्थही नमूद करणे अवश्य होते.

१७ व्या शतकातील मराठी गद्याचा सांगोपांग असा भाषाशास्त्रीय अभ्यास करण्याच्या दृष्टीने या ग्रंथाचे संपादन अतिशय उपयोगी ठरणारे आहे. कारण या काळातील बखरींच्या मूळ प्रती उपलब्ध नसल्याने अस्सल स्वरूपाची साधनसामग्री म्हणून ' वनवाळ्यांचें मळॉ ' या ग्रंथाचे महत्त्व निर्विवाद मान्य होणारे आहे. जेजुइट ग्रंथाचे हे वाङ्मय प्रकाशित होतानाही त्याला कोणकोणत्या अडचणींना तोंड द्यावे लागले याची माहिती देणारे एक परिशिष्ट डॉ. प्रभुदेसाई यांनी अखेरीस जोडले आहे, त्याचीही प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना मुद्दाम दखल घ्यावी लागेल.

अशा प्रकारचा, अनेक बाबतीत विपुल नवीन माहिती देणारा ग्रंथ हाती देऊन डॉ. प्रभुदेसाई यांनी अभ्यासकांना उपकृत करून ठेवले आहे. त्यांना मनःपूर्वक धन्यवाद.

**— डॉ. मु. श्री. कानडे**



**' विकत घेतला न्याय '** मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४;
**प्रा. मधुकर तोरडमल** मूल्य ५ रु.

—आज प्रा. मधुकर तोरडमल या नावाला नट, नाटककार व दिग्दर्शक या नात्याने रंगभूमीच्या क्षेत्रात प्रतिष्ठा लाभलेली आहे. नवनवे–प्रयोग करून मराठी रंगभूमीचा विकास करण्याची जाणीवपूर्वक धडपड करणारे महत्त्वाकांक्षी कलावंत म्हणून ते प्रसिद्ध आहेत. जानेवारी १९७२ मध्ये रंगभूमीवर आलेले ' विकत घेतला न्याय ' हे त्यांचे गंभीरप्रकृती रूपांतरित नाटक आहे. त्यांची प्रारंभीची ' काळे बेट लाल बत्ती ' आणि ' भोवरा ' ही गंभीर प्रकृतीची नाटके आहेत. त्याच परंपरेत बसणारी ही नाट्यकृती आहे. प्रस्तुत नाटक हे फ्रेड्रिक ड्यूरेनमेंट यांच्या ' द व्हिजिट 'चे रूपांतर असल्याचा खुलासा लेखकाने प्रस्तावनेत केला आहे. या खुलाशाबद्दलही लेखकाचे अभिनंदन केले पाहिजे, कारण असे ऋण मानण्याची प्रवृत्तीही दुर्मिळ होऊ लागली आहे.

नाटकाची कथावस्तू अनुराधा गव्हाणकर या महत्त्वाकांक्षी स्त्रीच्या जीवनातील घटनांशी निगडित आहे. ही कथावस्तू मराठी रंगभूमीवर सहज संपादली जाईल अशा रीतीने मांडलेली आहे. कथानकाचा विषयही नवीन आहे. आनंदराव शेळके यांचे अनुराधा गव्हाणकर या मुलीवर एके काळी प्रेम होते. या प्रेमसंबधातून त्यांना मूल झाले, परंतु आनंदरावाने मुलाची जबाबदारी नाकारली. पुढे प्रकरण कोर्टात गेले. आनंदरावाने खोटे साक्षीदार उभे करून अनुराधेलाच कुल्टा ठरविले आणि जीवनातून उठविले. तिचे मूल अनाथाश्रमात गेले आणि ती वेश्याव्यवसायात पडली. मूल वर्षाचे होऊन मेले.

त्यानंतर फार वर्षांनी ( नेमकी वीस वर्षे ते स्पष्ट असल्याने अनुराधेचे वय सदतीस वर्षे.) अनुराधा ' नागेशकर ' हे उपनाव धारण करून आपल्या मूळ ' तिसगाव ' या खेड्यात हावरा एक्स्प्रेसची साखळी ओढून उतरते. ती भुसावळ पॅसेंजरने येणार म्हणून गावकऱ्यांनी केलेली स्वागताची तयारी कोलमडते. तिचे स्वागत करण्यासाठी आलेल्या मंडळींत नगराध्यक्ष या नात्याने आनंदराव शेळकेही आलेला आहे. या घटनेपासून कथानक गतिमान होते. तिसगाव हे एक उद्ध्वस्त झालेले गाव आहे. ही बाई आपल्या गावचा विकास करील या आशेने सर्वजण तिच्याभोवती घोटाळत आहेत. आपल्या खटल्यातील न्यायधीश व साक्षीदार तिचे पगारी नोकर आहेत. हळूहळू एक कारस्थान रंगले आहे. अनुराधा गावकऱ्यांसमोर आनन्दरावाच्या पापाचा पाढा वाचून त्याचा खून केल्यास गावाच्या विकासासाठी पाच कोट रुपये देण्याचे कबूल करते. आनंदरावाच्या प्राणाच्या मोबदल्यात गावकरी ही मदत नाकारतात. आनंदरावाने जसा फार वर्षांपूर्वी दहा रुपये आणि दारूची बाटली यांच्या मोबदल्यात न्याय विकत घेतला तसाच आता आपणही न्याय विकत घ्यावा असा अनुराधेचा निर्धार आहे. तिने आपल्या टॉम नावाच्या भावी नवऱ्यापासून लाभलेल्या सहकार्याने गुप्तपणाने आनंदरावाची माणसे फोडलेली आहेत. तिने वाटलेल्या पैशामुळे मिंधे झालेले गाव-

करी शेवटी गावाच्या कल्याणासाठी आनन्दरावचा खून करतात.

हे सारे कथानक एका लहान गावी सहजपणे घडल्याचे दाखविण्यात नाटककार यशस्वी झाले आहेत. तथापि या कथानकातील घटना कितपत स्वाभाविक ठरतील हा एक प्रश्नच आहे. कारण वेश्याव्यवसाय करून कोट्याधीश होण्याइतके परिवर्तन अनुराधेच्या जीवनात कसे घडले हे वाचकांना कुठेही स्पष्ट होत नाही. तिच्या पहिल्या नवऱ्याचे काय झाले? आपल्या जन्मगावी येऊन थाटामाटाने लग्न करण्याची तिची कल्पना, त्याचप्रमाणे आनंदरावावरील प्रेमापोटी त्याला मारून त्याची समाधी बांधणे व समाधीची पूजा करणे या कल्पना चमत्कारिक व अघटित वाटतात. वेश्याव्यवसाय करणाऱ्या व चाळिशी गाठलेल्या स्त्रीने तिसरे लग्न करण्याची व प्रियकरास बरोबर घेऊन फिरण्याची योजना आपल्या सामाजिक परिस्थितीत स्वाभाविक वाटत नाही. अर्थात यासाठी प्रा. तोरडमल जबाबदार नाहीत, कारण मूळ कथेशी प्रामाणिक असल्याची ग्वाही त्यांनी दिली आहे.

नाटकाची रचना पाहिली असता अनुराधा हीच या कथानकाचा केन्द्रबिंदू आहे. इतर पात्रे त्या मानाने दुबळी आहेत. प्रारंभी आनंदराव आणि अनुराधा यांच्यामध्ये असलेला संघर्ष गावकरी व आनंदराव यांच्यामधील व्यापक संघर्ष ठरतो आणि प्रतिकूल परिस्थितीस आनंदराव असहायपणे शरण जातो. हे एक समूह नाट्य आहे. त्यामुळे मास्तर, फौजदार, पेंटर, नगराध्यक्ष, नागरिक अशा अनेक व्यक्ती येथे येऊन जातात. अनेक घटना रेल्वे प्लॅटफार्मवर घडलेल्या आहेत. मानवी स्वभावातील विविध छटांचे दर्शन या नाटकात चांगल्या प्रकारे घडते. वेगवेगळ्या दृश्यांची योजना झाल्याने कथावस्तूची परिणामकारकता वाढली आहे. दोन आंधळे, चित्ता, अस्थिकलश यांची योजना नाटकाचा परिणाम वाढविते. एकंदरीत वेगळा विषय असलेले, रंगभूमीच्या दृष्टीने समर्थ असे गंभीरप्रकृती नाटक प्रा. तोरडमल यांनी यशस्वीपणे रंगविले आहे.

**प्रा. चंद्रकांत धांडे**

## ' डॉ. दप्तरी यांची धर्ममीमांसा '
## प्रा. सुरेश म. डोळके

प्रकाशक : या. के. दप्तरी, दप्तरीभवन, महाल, नागपूर २ : १९६९

' डॉ. दप्तरी यांची धर्ममीमांसा ' हा प्रा. सुरेश डोळके यांचा ग्रंथ आकाराने आणि पृष्ठसंख्येनेही छोटा असला तरी वाचकांच्या विचाराला खाद्य पुरविण्याच्या दृष्टीने तो निश्चितच मोठा आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांपैकी पहिल्या पुरुषार्थाची सूक्ष्म चिकित्सा करण्यास कटिबद्ध झालेला हा ग्रंथ धर्मतत्त्वजिज्ञासूंना आव्हान देणारा आहे. हे आव्हान मात्र ग्रंथकाराने म्हणजे प्रा. डोळके यांनी दिलेले नसून डॉ. दप्तरी या महापंडिताने दिलेले आहे.

१. प्रा. डोळके यांनी डॉ. दप्तरींच्या धर्मविषयक विचारांचे जे प्रतिपादन केलेले आहे ते यथार्थ आणि न्याय्य आहे काय? या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी दप्तरींची समग्र धर्म-

मीमांसा वाचून, अभ्यासून प्रा. डोळक्यांच्या पुस्तकात तिचा योग्य सारांश उतरलेला आहे काय ? याचा तपास करणे आवश्यक आहे. हे जिकिरीचे काम डॉ. दप्तरींनीच अनावश्यक करून सोडलेले आहे; कारण त्यांनी डोळके यांना पुढील सर्टिफिकेट दिलेले आहे : " त्यांनी ( म्हणजे श्रीयुत सुरेश डोळके यांनी ) माझे संपूर्ण ग्रंथ वाचून त्यातील सिद्धान्तांचे वर्णन अगदी यथार्थपणे केले आहे." प्रा. डोळके यांनी हे सर्टिफिकेट आपल्या पुस्तकात उद्धृतही केलेले आहे. दप्तरींनी हे सर्टिफिकेट ममतेच्या पोटी कशावरून दिले नसेल अशी शंका काढणे व्यर्थ आहे, कारण निरपवाद, प्रखर तत्त्वनिष्ठेने संपन्न असलेले डॉ. दप्तरी अशा मोहाला बळी पडतील हे केवळ अशक्य आहे.

२. डॉ. दप्तरींचा धर्मविचार हा त्यांनी उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचा जो परामर्श घेतलेला आहे त्यातून स्फुरलेला आहे. त्यांचा हा परामर्श आजपर्यंतच्या उपनिषदांच्या विख्यात भाष्याकारांच्या भाष्यांहून अगदीच निराळा आहे; आणि म्हणूनच तो अत्यंत विवाद्य झालेला आहे. दप्तरींनी उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचा जो अर्थ लावलेला आहे तो उपनिषदांच्या मूळ भूमिकेशी कितपत सुसंगत आहे ? या प्रश्नाचे उत्तर देणे हे निःसंशय व्यासंगाचे काम आहे.

३. ' डॉ. दप्तरी यांची धर्ममीमांसा ' या पुस्तकावरून दप्तरींच्या धर्मविषयक विचारांची जी ओळख होते. ती लक्षात घेऊन त्या विचारांचे स्वतंत्रपणे, केवळ स्वानुभूतीच्या बळावर परीक्षण करणे शक्य आहे. अलीकडच्या काळातील पी.एच. डीच्या किंवा अन्य कोणत्याही विद्वत्ताजड स्वरूपाच्या प्रबंधात जे विचारप्रतिपादन असते त्याला ग्रंथग्रंथांतरीच्या विचारांच्या आधारांनी सजविलेले आढळते. या प्रबंधाचे कोणतेही पान उघडून पाहा, त्यातील विचाराचा विठोबा हा तळटीपांच्या विटांच्या आधारावर उभा असलेला दिसून येतो. उपनिषदांमध्ये जे वैचारिक चिंतन आहे त्याला अशा आधाराच्या कुबड्या लावलेल्या नाहीत. ते स्वतंत्र आहे. अंतरीच्या जिवंत साक्षीने ते प्रकट झालेले आहे. पांडित्याच्या जोरबैठका मारण्यापेक्षा ही स्वतंत्र चिंतनसाधना निर्विवाद जास्त कठीण आहे. ही वेगळीच तपस्या आहे. एवढे तपस्येचे बळ अंगी नसले तरी प्रत्येक मनुष्यमात्राच्या ठिकाणी जी मूळचीच मौलिक विचार करण्याची शक्ती असते ती निःसंकोचपणे इरेला लावून ग्रंथपरीक्षण करणे शक्य आहे. पुन्हा, कोणताही प्रश्न सोडविण्यासाठी आपल्या स्वतंत्र बुद्धीचा वापर करण्याला खुद्द डॉ. दप्तरींचेच अनुमोदन आहे. नव्हे, आपल्या स्वतंत्र बुद्धीचा उपयोग करा अशी त्यांची आग्रही शिफारस आहे.

' डॉ. दप्तरी यांची धर्ममीमांसा ' यातील विवेचन प्रमाणभूत मानून त्या आधारे डॉ. दप्तरींच्या धर्मविषयक विचारांचे सार थोडक्यात खालीलप्रमाणे मांडता येण्यासारखे आहे.

१. कोणत्याही प्रश्नाचा निर्णय–त्यात अर्थातच धर्मनिर्णयही आला–हा नेहमी बुद्धीच्या साहाय्याने करावा. बुद्धी जो निर्णय देईल तोच प्रमाण मानावा. बुद्धीच्या टप्प्यात जे येत नसेल ते उदाहरणार्थ, पुनर्जन्म, अवतारवाद, स्वर्ग इ० सगळेच वर्ज्य मानावे.

२. डॉ. दप्तरींच्या बुद्धीने धर्मस्वरूपनिर्णयासंबंधी विचार केला तेव्हा तिला असे दिसून

आले की, धर्माची व्याप्ती ही फक्त इहलोकापुरतीच मर्यादित आहे. धर्म फक्त इहलोकातील सुखसिद्धीसाठीच आहे. पुढे, काय झाले, कोणास माहीत! त्यांच्या बुद्धीला नवा अनुभव आला आणि परलोकाला त्यांच्या धर्मविचारात प्रवेश मिळाला. अर्थात इहलोकनिष्ठेच्याच ग्रंथाला जोडलेले एक परिशिष्टवजा प्रकरण, एवढेच त्यांच्या परलोकविचाराला स्वरूप प्राप्त झाले. परलोकाच्या सुखाच्या साधनांची कल्पना मनुष्याची बुद्धी करू शकते, असे त्यांना पुढे वाटू लागले.

३. धर्म कशासाठी ? इहलोकातील सुख मिळविण्यासाठी.

४. सुख तर अनेक प्रकारचे असते; पण कोणत्या प्रकारचे सुख धर्माला अपेक्षित आहे ? दप्तरींचे उत्तर असे की आत्यंतिक स्वरूपाचे, श्रेयस्कर स्वरूपाचे, वासनारहित स्वरूपाचे सुख मिळविण्यासाठी धर्म आहे.

५. डॉ. दप्तरींच्या धर्मविचाराला अद्वैताचे अधिष्ठान आहे. जीव अनेक दिसत असले तरी त्या सर्वांत एकच तत्त्व, एकच आत्मा आहे. दप्तरींच्या धर्मदृष्टीचे हे ज्ञानांग आहे.

६. सर्वभूतहितार्थ कर्मे करणे, हे त्यांच्या धर्मदृष्टीचे कर्मांग. हे अर्थातच त्यांच्या अद्वैत-बुद्धीतूनच स्फुरलेले.

७. यमनियमांचे पालन करावे हे धर्माचे सार. यमांचे आचरण व्यवस्थित करण्यासाठीच नियमांची रचना व योजना. यम हे धर्माचे नित्य व शाश्वत स्वरूप तर नियम हे धर्माचे अनित्य व परिवर्तनशील स्वरूप.

८. धर्म हे केवळ कर्तव्याकर्तव्याचा निर्णय करणारे शास्त्र आहे. नीतिविचार हाच धर्माचा नियंत्रक गाभा आहे.

९. मूळ ब्रह्माच्या ठिकाणी ज्ञान नाही, आनंदही नाही. जीव हे ब्रह्माचे विकसित रूप.

प्रा. डोळके यांच्या पुस्तकात आलेल्या डॉ. दप्तरींच्या धर्मविचारांचे जे सार, त्याचा हा नवरत्नहार आहे. त्यातल्या काही रत्नांच्या तेजाचे थोडक्यात मूल्यमापन करावयाचे आहे. डॉ. दप्तरी वेदांना अपौरुषेय मानीत नाहीत, पौरुषेयच मानतात हे त्यांच्या बुद्धिप्रामाण्य-वादी भूमिकेशी सुसंगतच आहे; पण त्यांच्या बुद्धिप्रामाण्यवादाला एक लहानसा चिरा गेलेला आहे. बुद्धीच्या प्रकाशात न दिसणारा जो परलोक, तो असावा, अशी त्यांनी अप्रत्यक्षपणे कबुली दिलेली आहे. परलोकाला मान्यता हे त्यांच्या निरपवाद बुद्धिप्रामाण्यवादाचे स्खलन झाल्याचेच चिन्ह नव्हे काय ?

दप्तरी म्हणतात, धर्माचा विचार हा इहलोकापुरताच मर्यादित ठेवावयाचा आहे. इह-लोकाची व्याप्ती किती ? कोणती ? इहलोकाच्या बाहेर जे आहे त्याचा इहलोकाच्या जीवनावर येथील रहिवाश्यांच्या सुखदुःखांवर काहीच परिणाम होत नाही काय ? धर्माचा विचार हा मनुष्यजीवनापुरताच सीमित ठेवावयाचा असला तरी या जीवनावर त्याच्याबाहेरील दृश्य-अदृश्य शक्तींचा परिणाम होतो असा अनुभव आहे ना ? मग धर्माचा विचार करताना त्या शक्तींचाही विचार करणे आवश्यक नाही काय ? डोकेदुखीवर औषध देताना डॉक्टर रोग्याच्या

केवळ डोक्याचाच विचार न करिता त्याच्या संपूर्ण शरीराचा, त्याच्या समग्र प्रकृतीच विचार करीत असतो ना? समजा, एक विदर्भवादी माणूस आहे. विदर्भाच्या बाहेर विश्वच नाही अशी त्याची पक्की समजूत. त्याला आगगाडी फक्त मलकापूर ते गोंदिया एवढीच माहीत. ही गाडी नियमित कशी येईल याची त्याला काळजी; पण तिचे नियमित येणे-जाणे हे तिच्या मुंबईहून–म्ह. विदर्भाबाहेरून–वेळेवर सुटण्यावर अवलंबून आहे हे त्याने विचारात घ्यावयास नको काय? एक मुलगा आहे. निरोगी. आरोग्याचे सगळे नियम कटाक्षाने पाळणारा. उत्तम चारित्र्यसंपन्न घराण्यातला. दरवर्षी वर्गात परीक्षेत पहिला क्रमांक मिळविणारा. एका वर्षी परीक्षेच्या वेळी अचानकपणे तो आजारी पडतो वा अपघातात सापडतो. त्याला परीक्षेला बसता येत नाही. बुद्धीला पटेल अशी यामागची कार्यकारणमीमांसा सापडत नाही. अशा वेळी या अकल्पित, अनपेक्षित घटनेचे कारण इहलोकात तर सापडत नाही, मग कोठे शोधावे? एक तरुण व एक तरुणी दोघांनी विवाहबद्ध व्हावयाचे ठरले, दोघांतही काहीही दोष नाही. दोघेही देखणे. निरोगी. निर्व्यसनी. सुशिक्षित. सुदृढ. आदर्श जोडपे. लग्न होताच पंधराच दिवसांनी तरुण मरण पावतो. बुद्धिवादी नसलेले भाबडे लोक म्हणतात, मुलीचा मंगळ मुलाला बाधला. मंगळ तर बुद्धिवादात बसत नाही. मग या घटनेचे कारण कशात शोधावयाचे? तेव्हा मानवी जीवनाचा विचार करावयाचा असेल तर तो केवळ इहलोकापुरताच करून चालत नाही. मानवी जीवन हा समग्र दृश्यादृश्य अशा वैश्विक जीवनाचा एक अंश आहे. त्या दृष्टीनेच त्याचा विचार करणे आवश्यक आहे. तसे असल्यामुळे, प्रत्येक धर्मात, प्रत्येक संप्रदायाच्या वा पंथाच्या तत्त्वज्ञानात पहिला विचार विश्वाची उत्पत्ती, विश्वाची स्थिती व विश्वाचा संहार यासंबंधीचा असतो. तो जीवनाचा सामग्र्याने विचार करण्याच्या दृष्टीने अपरिहार्यच ठरतो. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना परिचित असलेली अगदी जवळचीच उदाहरणे पाहा : महानुभाव पंथाचे प्रवर्तक श्री चक्रधरस्वामी यांनी विश्वाच्या उत्पत्तीचा, स्थितीचा व संहाराचा विचार आपल्या तत्त्वज्ञानात केलेला आहे. ज्ञानदेवांच्या अमृतानुभवात सुद्धा पहिल्याच प्रकरणात हा विचार आलेला आहे. या विचाराशिवाय धर्ममीमांसेला पूर्णताच येऊ शकत नाही. म्हणून दप्तरींचा केवळ इहलोकनिष्ठ स्वरूपाचा धर्मविचार हा अपूर्ण धर्मविचार आहे. त्या अपूर्णतेमुळेच तो निश्चितच अविश्वसनीय झालेला आहे; बेभरवंशाचा झालेला आहे. इहलोकापलीकडे जे काही आहे त्याचेही ज्याला आपल्या अतींद्रिय शक्तीच्या बळावर ज्ञान होऊ शकते असाच मनुष्य धर्मविचार मांडू शकतो; धर्मप्रवर्तक होऊ शकतो. जगातले आतापर्यंतचे सगळे धर्मप्रवर्तक हे दिव्य अतींद्रिय शक्तींनी संपन्न होते हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. धर्मविचाराची तळमळ आहे, पण अतींद्रिय शक्ती तर जवळ नाही, अशा व्यक्तींनी धर्मविचार करताना, अतींद्रिय शक्ती असलेल्या धर्मपुरुषांच्या शब्दावर श्रद्धा ठेवणे आपोआपच आवश्यक होऊन बसते; पण असा विश्वास ठेवणे हे दप्तरींच्या बुद्धिप्रामाण्यवादात बसत नाही आणि अडचण तर अशी आहे की असा विश्वास ठेवल्याशिवाय धर्मविचार पूर्ण होऊ शकत नाही.

वासनारहित सुख हे दप्तरींनी धर्माचे प्राप्तव्य मानलेले आहे. वासनाभाव हा त्यांनी धर्मानुसार जगावयाच्या जीवनाचा घटक मानलेला आहे. कोणत्याही गोष्टीची अभावात्मक व्याख्या करणे कितपत योग्य आहे ? पुन्हा, सगळ्याच वासनांना त्याज्य समजून कसे चालेल ? क्षुधानिद्रादी वासना दप्तरींनी जगण्यासाठी आवश्यक मानलेल्या आहेत. श्रेयस्कर जीवन जगण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या आणि अनावश्यक असलेल्या वासना यांतील भेदरेषा कशी ठरवावयाची ? पुन्हा वासना कशा उत्पन्न होतात, त्या त्याज्य का, त्यांच्या प्रभावातून मुक्त कसे व्हावे यासंबंधी प्रो. डोळ्के यांच्या पुस्तकावरून तरी, दप्तरींनी काहीही मार्गदर्शन केलेले आढळत नाही. अलीकडे जगद्गुरू जे. कृष्णमूर्ती हे ज्या मूलगामी पद्धतीने वासनांचे विश्लेपण करतात आणि त्यांच्या तावडीतून कसे सुटावे यासंबंधी विचार मांडतात, त्या पद्धतीचे, प्रत्येक मनुष्यमात्राला श्रेयस्कर जीवन जगण्याचा मार्ग दाखविणारे विवेचन दप्तरीं-जवळ मुळीच आढळत नाही.

मानवी जीवनाची अंगे तीन : कर्म, ज्ञान व भावना. दप्तरींनी जीवनाचे जे भावनांग आहे त्याची दखलच घेतलेली नाही. कर्माला किंवा ज्ञानाला जर भावनात्मकतेची, प्रेमाची जोड नसेल तर ते व्यर्थ ठरणार आहे. शुद्ध बुद्धिवादी दृष्टीने विचार केला तरी हे एकदम पटण्या-सारखे आहे की प्रेम हाच धर्माचा गाभा आहे. ज्ञान काय किंवा कर्म काय, हे, त्याला प्रेमाचे अधिष्ठान नसेल तरच रुजणार नाही, जीवनात मूळ धरणार नाही. ज्ञानाने अद्वैताची जी प्रतीती येईल ती गौण स्वरूपाची राहणार आहे; अद्वैताचा जिवंत साक्षात्कार हा प्रेमानेच शक्य आहे. धर्माचे प्राणतत्त्व असलेले जे प्रेम त्याला दप्तरींच्या धर्मविचारात स्थानच नाही. त्यामुळे त्यांचा धर्मविचार हा मुळीच स्वीकारार्ह वाटत नाही.

जीव म्हणजे ब्रह्माचे विकसित स्वरूप, हा दप्तरींचा सिद्धान्त. या सिद्धान्तात धर्मविचाराने शीर्षासनच केलेले आहे. जीवाची अत्यंत विकसित अवस्था म्हणजे ब्रह्म, हा प्रस्थापित सिद्धान्त, दप्तरींनी तो उलटाच करून टाकला. हा सिद्धान्त उलटा करताना आपण कसे पेचात सापडलो आहोत हे त्यांच्या लक्षात आलेले दिसत नाही. जीवाने वासनारहित व्हावे असे ते सांगतात. ब्रह्म जेव्हा वासनांनी व्यापून जाते, वासनाग्रस्त होते तेव्हा ते जीव या अवस्थेला येते; आणि जीव जेव्हा वासनामुक्त होतो तेव्हा तो ब्रह्म होतो. अशा स्थितीत वासना-रहित सुख हे, जीवाचे दप्तरींनी मानलेले ध्येय स्वीकारल्यानंतर, ब्रह्माचे विकसित रूप म्हणजेच जीव हा सिद्धान्त कसा बरे स्वीकारर्ह राहू शकतो ?

दप्तरींचा इहलोकनिष्ठ धर्मविचार हा असा लंगडा आहे, अपूर्ण आहे. त्याचा सर्वांगीण परामर्श घेणे हे एका परीक्षण लेखाच्या मर्यादित जागेत अशक्य आहे. वस्तुतः आद्य शंकराचार्य आणि डॉ. दप्तरी यांच्या धर्मविचारांचे तुलनात्मक अध्ययन, या विषयावर एक सविस्तर, विवेचक प्रबंध निर्माण होणे आवश्यक आहे. अशा प्रबंधातूनच दप्तरींच्या धर्ममीमांसेचे यथान्याय्य मूल्यमापन होणे शक्य आहे. सर्व खऱ्या धर्मप्रेमींनी ज्याच्यावर कडाडून हल्ला करून ज्याला नष्ट करून टाकावे असा दप्तरींचा धर्मविचार आहे. तो लंगडा

असल्यामुळे फार दिवस चालू शकणार नाही, तो अगतिक होऊन वाटेतच विकलांग उपेक्षित अवस्थेत पडून राहील हेही शक्य आहे तेव्हा तो हल्ला आवश्यक नाही असे म्हणता येण्यासारखे आहे. असो. प्रा. डोळके यांनी डॉ. दत्तरींच्या प्रश्नोमक धर्मविचाराचा, विशेष परिश्रम घेऊन, परिचय करून दिला याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

— डॉ. अ. ना. देशपांडे

## सप्तदशी

**श्री. लालजी पेंडसे**

प्रकाशक : अभिनव प्रकाशन, मुंबई १४
पृष्ठे २७४. मूल्य दहा रु.

श्री. लालजी पेंडसे याच्या लेखांचा हा संग्रह आहे. यांत एक कविताही आहे. या लेखांचे स्वरूप फारच विविध आहे. विघ्नहर्त्या गणेशाची कुळकथा, संत–वाङ्मयाचा सामाजिक पाया, साहित्य व त्याच्या प्रेरणा, केशवसुत, आर्यांचे मूलस्थान हे लेख लेखकाच्या अभ्यासू प्रवृत्तीचे निदर्शक आहेत. इतिहास, साहित्य, राजकारण, वाङ्मय आदी विषयांची विविधता त्यांत भरपूर आली आहे. प्रौढ कामगारांत साक्षरता प्रसार यामध्ये त्यांच्यातील ' शिक्षक ' दिसून येतो तर ' ललकार ' या कवितेत श्री. लालजी पेंडसे यांचा राजकीय रंग दिसून येतो.

' रणधुरंधर बाजीराव पेशवा ', ' मेरी झाँसी नही दूंगी ', १८५८ च्या उठावाचे मूल्यमापन यांत श्री. लालजी पेंडसे यांचा राष्ट्राभिमान दिसून येतो. लाल भारताचे दोन ध्रुव या लेखात त्यांनी भाई डांगे आणि रणदिवे या दोन कम्युनिस्ट पक्षातील नेत्यांची व्यक्तिचित्रे रंगविली आहेत. " भारतीय कामगार ही डांगे यांची प्रेरक व संरक्षक शक्ती आहे तर पक्षसंघटनेतील मर्मस्थाने पारखून त्यावर आपली पकड ठेवून राहणे यातून रणदिवे यांना शक्तीचा पुरवठा होतो......डांगे यांचा ध्येयवाद प्रायोगिक आहे तर रणदिवे यांचा ध्येयवाद ग्रांथिक आहे. " आज कम्युनिस्ट पक्षाच्या चिरफळ्या उडालेल्या आहेत. त्याच्या पाठीमागे जी अनेक कारणे आहेत त्यांपैकी डांगे–रणदिवे यांच्यातील फरक, हे एक महत्त्वाचे कारण आहे. श्री. लालजींच्या लेखांतून अशी खूपच माहिती मिळते. भाई व्ही. डी. चितळे यांच्यावरील लालजींचा लेख हृद्यच आहे. १९४२ च्या लढ्याच्या वेळी भाई चितळे यांच्यासारख्या कम्युनिस्टांना किती वैचारिक मानसिक यातना सहन कराव्या लागल्या, याची कल्पना त्यावरून येते. " जनशक्तीचे नानाविध आविष्कार ओळखण्याची कुवत आताच्या पक्षपुढाऱ्यांना कधी येणारच नाही का ? " असा प्रश्न त्यांनी हताश होऊन विचारलेला दिसतो.

या पुस्तकाला डॉ. वि. भि. कोलते यांनी ' मंगलाचरण ' लिहिलेले आहे. त्यांत ते म्हणतात, " त्यांचे प्रदीर्घ वाचन, हातात घेतलेल्या विषयांचा गाढ अभ्यास, विषयाच्या प्रतिपादनाची तर्कशुद्ध पद्धती, परिणामकारक मांडणी आणि अभिजात भाषाशैली यापुढे अभ्यासकांचेच नाही तर सामान्य वाचकांचेही अन्तःकरण आनंदित होईल. " वाचक या मताशी सहमत होतील यात शंकाच नाही.

— पां. श्री. घारे

## सोनार बांगला
**ग. प्र. प्रधान**

प्रकाशक : साधना प्रकाशन, पुणे ३०
पृष्ठे १४०; मूल्य पाच रुपये

इ. स. १९७१ चा भारत-पाक संघर्ष ही प्रत्येक भारतीयाला स्फूर्ती देणारी घटना आहे. बांगला देशाला मिळालेले स्वातंत्र्य व पाक सैन्याची संपूर्ण शरणागती या दोन गोष्टी इतिहासात आता अमर झाल्या आहेत. या विजयामुळे भारतीयांनी शेफारून जाता कामा नये त्याचप्रमाणे गाफील राहता कामा नये. आपल्या सहकारी मित्रांसमवेत प्रा. प्रधान हे बांगला देशामध्ये सुमारे १७–१८ दिवस हिंडून आले. त्यांनी अनेकांच्या गाठीभेटी घेतल्या; कत्तली व अत्याचारांच्या हकीकती ऐकल्या. भारतीय जवानांचा पराक्रम, मुक्तिवाहिनीचे शौर्य व कार्य यासंबंधीच्या कथा त्यांनी ऐकल्या. या सर्वांतून " जीवनातील उदात्तता व भव्यता, क्रूरता व निर्घृणता, मृत्यूची कृष्णछाया आणि नवजीवनाचा प्रकाश यांचे अपूर्व दर्शन मला घडले " असे लेखक म्हणतात. सोनार बांगला या ग्रंथाच्या द्वारे प्रा. प्रधान यांनी हेच दर्शन वाचकांना घडविले आहे.

एकीकडे हिंदूंना वाटणारी मानसिक असुरक्षितता तर दुसरीकडे बंगाली मुसलमानांनी दिलेली त्यांच्या सुरक्षिततेची हमी; बिहारी मुस्लिमांचा धूर्तपणा; खुल्ना, जेसोर आदी ठिकाणी पाकिस्तानी सैनिकांनी आणि बिहारी मुस्लिमांनी केलेले अत्याचार; डाक्का विद्यापीठात घडलेल्या अत्याचारी घटना इत्यादी विविध गोष्टींची माहिती या पुस्तकात मिळते. शिवाय ' The Social History of East Pakistan ' या पुस्तकातील माहितीही उपयुक्त ठरेल. ' वेदांत व जैनांच्या पुराणांत ' वंग ' जमातीचा उल्लेख आहे. हे लोक द्रविडियन वंशाचे होते, आर्यांनी त्यांना हुसकल्यामुळे ते गंगा–ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यात जाऊन राहिले ' इ. इ. विद्यापीठातील प्राध्यापकांपासून चतुर्थ श्रेणीच्या नोकरापर्यंतच्या मुलाखती लेखकाने घेतल्या. चतुर्थ श्रेणीचा एक सदस्य म्हणतो – " ... अनेक लोक खोटारडे आहेत. त्यांनी पूर्वी पाकिस्तानला पाठिंबा दिला होता...लबाड माणसं आता टोप्या फिरवून आपला फार छळ झाला, असं सांगत सुटली आहेत. " हे सनातन सत्य त्याने सांगितले. चितगांगपासून बारा मैलावर असलेल्या सीताकुंड गावी शिवलिंगावर घाव घातल्यावर ज्वाला येऊ लागल्या म्हणून ते वाचले; ही एक अद्‌भुतच कथा होय.

साध्या सोप्या भाषेतून ' सोनार बांगलाच्या ' ज्या हकीकती प्रा. ग. प्र. प्रधान यांनी लिहिल्या आहेत त्या उद्‌बोधक आणि वाचनीय आहेत.

—पां. श्री. घारे

अनुक्रमणिका

**करवीर सरदारांच्या कैफियती**
**संपादक : खं. आ. गायकवाड,**

प्रकाशक : खं. आ. गायकवाड, कोल्हापूर
पृष्ठे ३०४. मूल्य आठ रुपये

सुमारे सव्वाशे वर्षांपूर्वी लिहिलेला, कैफियतीच्या स्वरूपातील इतिहास, प्रकाशात आणण्याचे महत्त्वाचे आणि उपयुक्त कार्य श्री. खं. आ. गायकवाड यांनी केले आहे. इंग्रजांची सत्ता स्थिर झाल्यावर त्यांनी कोल्हापूरचे लष्कर बरखास्त केले; पण सरदार जहागिरदार कायम राहिले. त्यांचे सरंजाम कायम ठेवून, नोकरीबद्दल पंधरा टक्के रक्कम कापून घेण्याचे ठरले हा जो निवाडा झाला, त्या वेळी संबंधित लोकांकडून माहिती मागविण्यात आली. कैफियतींचा आरंभीचा मजकूर वाचला ( मेहेरबान पोलिटिकल एजंट साहेब बहादुर यांजकडून...) म्हणजे ही गोष्ट लक्षात येते. या पुस्तकात बेचाळीस सरदारादी लोकांच्या कैफियती संग्रहित करण्यात आल्या आहेत. त्यांत करवीरच्या घोरपडे, चव्हाण, जाधव, घाटगे, पाटणकर, भोसले, गायकवाड आदी प्रमुख सरदारांच्या कैफियती आहेत. कैफियती सादर करताना संबंधितांनी प्रायः थोरले छत्रपती शिवाजी महाराज यांच्या कालखंडापासून आपल्या घराण्याचा इतिहास दिलेला आहे. आपल्या पूर्वजांनी लढाईत व अन्यत्र केलेली कामगिरी व त्याबद्दल मिळालेली बक्षिसे ( म्हणजे जहागिऱ्या व सनदा या स्वरूपांत ) व त्यांत पुढे झालेल्या वाटण्या, त्यातील आपली बाजू इत्यादी गोष्टी मांडलेल्या आहेत.

या कैफियतीवरून इतिहासावर काही नव्याने प्रकाश पडतो. सरदारांची बाजू समजते, हे तर खरेच; परंतु कैफियती ह्या पूर्णपणे विश्वसनीय ठरू शकत नाहीत. आपली बाजूच न्याय्य व खरी आहे हे दाखविण्यासाठी "सत्य माहिती दडपून टाकणे व असत्य सूचित करणे" हा दुर्गुण त्यात येऊ शकतो. परंतु त्यामुळे कैफियतींना अगदीच किंमत न देणे योग्य ठरणार नाही. त्यांतील घटना, प्रसंग, अन्य ऐतिहासिक कागदपत्रांवरून तपासून खरे-खोटे पारखून घेता येते. कैफियतीतील अतिशयोक्ती व संदिग्धता ही मनुष्यस्वभावाला धरूनच असते. यातले 'राजकारण' वगळून अन्य माहिती वाचली, तरी तीही उपयुक्त ठरते उदाहरणार्थ, तत्कालीन समाजस्थिती, आर्थिक व्यवहार, धार्मिक प्रथा आणि परंपरा, कुलधर्म-कुलाचार, हुद्दे, लोक-समजुती, दत्तविधानाच्या वेळचा तक्ता व त्यावरून सरदारांच्या दरबारात बसण्याच्या जागा व एकंदर दरबाराचे स्वरूप इत्यादी विविध स्वरूपाची माहिती मिळते. अन्य समाजांच्या तुलनेने आपल्या समाजांत कोणकोणत्या गोष्टी नव्हत्या, याचीही कल्पना यावरून येऊ शकते.

महाराष्ट्राला दुहीचा शाप आहे, असे जे नेहमी म्हणण्यात येते, त्याला भरपूर आधार मिळतात. घोरपडे घराण्यातील तंटा हे याचे उत्तम उदाहरण आहे. या भांडणात अन्य लोकांनी हस्तक्षेप करावयाचा, एखाद्याची बाजू घ्यावयाची व त्यातून भांडणे, संघर्ष, हेवा, सूड इत्यादी सर्व गोष्टी निर्माण व्हावयाच्या हे ओघानेच आले. दोघांच्या भांडणात तिसऱ्याचा लाभ होऊन सरदारवर्ग दुर्बल झाला, त्याचा घातक परिणाम साऱ्या महाराष्ट्राला भोगावा

अनुक्रमणिका

लागला. कैफियतींमधील भाऊबंदकीची कारणे वाचली की मन विषण्ण होऊन जाते.

या ग्रंथाला छत्रपती शहाजी महाराज – करवीर यांनी प्रोत्साहन दिले. श्री. स. मा. गर्गे यांनी उत्तम प्रस्तावना लिहिली आहे. हा ग्रंथ अभ्यसनीय व संग्राह्य झाला आहे. कैफियती प्रकाशात आणण्याची कामगिरी सुयोग्य प्रकारे पार पाडल्याबद्दल श्री. खं. आ. गायकवाड यांना जेवढे धन्यवाद द्यावेत तेवढे कमीच होतील.

— पां. श्री. घारे



**ध्वनिसिद्धान्त**
**डॉ. मधुकर आष्टीकर,**

प्रकाशक : हिंदुधर्म-संस्कृति मंदिर नागपूर
पृष्ठे २२७. मूल्य ३० रुपये.

संस्कृत काव्यशास्त्रातील ध्वनिसिद्धान्ताची पूर्वपीठिका आणि त्याचे परिणाम सांगणारा ग्रंथ लिहून डॉ. आष्टीकरांनी संस्कृतातील काव्यशास्त्राचा एक महत्त्वाचा विचार मराठीच्या वाचकांपर्यंत नेटक्या रूपात आणून पोहोचविला आहे. डॉ. आष्टीकरांचे उद्दिष्ट सुनिश्चित ( well-defined ) आहे आणि ते साध्य करताना त्यांनी आपल्या उद्दिष्टांचे भान जराही कुठे सोडलेले नाही. त्यांनी ध्वनिसिद्धान्तांचा हा अभ्यास भारतीय साहित्यशास्त्राचे सुप्रसिद्ध मराठी अभ्यासक व विवेचक डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांच्या मार्गदर्शनाखाली पुरा केला. आणि याची एक सुस्पष्ट खूण ही की, भामहापासून तो जगन्नाथपंडितापर्यंतच्या जवळ जवळ सर्वच संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी ध्वनिसिद्धान्तांचा या ना त्या स्वरूपात स्वीकार केलेला होता हे त्यांचे एककोटिक ( monolistic ) प्रतिपादन. डॉ. देशपांडे यांनी हे सारे साहित्यशास्त्रकार परस्परविरोधी किंवा स्वतंत्र संप्रदायप्रवर्तक नसून त्यांनी काव्यातील सौंदर्याचेच एककेंद्रगामी ( convergent ) विवेचन केले या मताचा त्यांनी ( म्हणजे डॉ. आष्टीकरांनी ) मागोवा घेतला. आपल्या गुरूच्या प्रतिपादनाचे सुस्पष्ट परीक्षात्मक विवेचन ( verification ) त्यांनी केले आहे ( जे पुरेसे असायला हवे होते ! ). मराठी वाचकांची ही एक मोठीच सोय झाली.

डॉ. आष्टीकरांच्या विवेचनाचे सार हे असे :– अलंकार संप्रदायाचा प्रवर्तक मानला गेलेल्या भामहाच्या ग्रंथांतरी ध्वनितत्त्वाची प्रथम चाहूल लागते ती वक्रचारुता आणि व्यंजनचारुता या शब्दात. रससिद्धान्तांचा भामहाच्या तुलनेने पाहता अधिकच स्पष्टपणे स्वीकार करणारा आचार्य दण्डीसुद्धा वाच्यार्थाच्या जोरकस आधारावर ध्वनि-तत्त्वाला बैठक मिळवून देतो. रीतितत्त्वाचा पुरस्कार करणारा आचार्य वामनही रीतीतून रस-तत्त्व व्यंजित होते, असे प्रतिपादीत असता ध्वनितत्त्वाकडे झुकलेला आढळतो. हीच गोष्ट उद्‌भटाचीही. वास्तविक अलंकारांचा सर्वप्रथम जोरदार पुरस्कार उद्‌भटानेच केला—जरी पुष्कळांनी भामहाला अलंकारवादी लेखकांत पहिला मानले असले तरी ! उद्‌भटाला ( तोही काश्मीरमधलाच ! ) ध्वनितत्त्वाची चर्चा चालू असलेली माहीत असावी असे दिसते, परंतु

ध्वनि या संज्ञेचा वापर करायला त्याचे मन तयार नव्हते. व्यंग्यार्थांचा अलंकारामध्ये अंतर्भाव करून त्याने या जोम धरू लागलेल्या ध्वनितत्त्वाला आवर घालण्याचा प्रयत्न केला. आनंदवर्धनाने ध्वनितत्त्वाचे सांगोपांग विवेचन आणि व्यवस्थापन करण्यापूर्वीची ही स्थिती. आनंदवर्धनानंतर उद्भटाच्या ग्रंथावर लघुवृत्ती लिहिणारा प्रतिहारेंदुराज याने वामन आणि उद्भट हे काव्यातील सौंदर्यतत्त्वाची मांडणी करीत असतानाच ध्वनितत्त्वाचे स्वतःच्या मनावर उमटलेले ठसे कसे पुसून टाकू शकले नाहीत ते पाहिले. स्वतःच्या काळी प्रचलित असलेल्या ध्वनिकारिका (काही स्वतः आनंदवर्धनाच्याही) प्रतिहारेंदुराजाला परिचित होत्याच, आणि त्यामुळेच ध्वनितत्त्वाचा त्याला अव्हेर असा करवेना, आणि स्वीकार करायला तर त्याच्या मनाची तेवढीशी तयारी नव्हती. आस्वाद्य रसतत्त्वाची अभिव्यंजना होते असे त्याचे प्रतिपादन या अंतःसंघर्षातून उद्भवते. धनंजय–धनिकांनाही ध्वनितत्त्वाचा (ध्वनिकारिकांचाही) परिचय होता खरा, परंतु दशरूपक–अवलोकांमध्ये त्यांनी ध्वनितत्त्वाला दुबळाच विरोध केल्याचे आढळते. महिमभट्टाचा प्रखर ध्वनिविरोध हट्टाच्या पोटीच उद्भवला आहे. कुन्तकाचा वक्रोक्तिविचार ध्वनीला पुरेसा समर्थ प्रतिकार करू शकत नाही वा पर्याय देऊ शकत नाही. पुढीलच्या स्वयंप्रज्ञ शास्त्रवेत्त्यांच्या विचारांचे मम्मटादी संकलक या ना त्या रूपात ध्वनिविचाराचीच मांडणी करताना आढळतात. ध्वनिविचाराला अल्पमात्र आरंभ होऊन त्याचा सुविस्तार आनंदवर्धनाच्या काळापर्यंत होत राहिला, आणि त्याचे सारे बारकावे अभिनवगुप्ताच्या समर्थ लेखणीने सुस्पष्ट करून सांगितले.

ध्वनिसिद्धान्ताची पूर्वपीठिका आणि आनंदवर्धन व अभिनवगुप्त यांनी त्या सिद्धान्ताची स्थापना केल्यावर त्याचा झालेला परिणाम या अशा प्रकारे कथन करणारे डॉ. आष्टीकर आनंदवर्धन आणि अभिनवगुप्त या दोघांनी ध्वनितत्त्वाचे जे विवरण केले त्याचा साररूपाने परिचय करून द्यायला विसरलेले नाहीत. तसेच वैयाकरणांनी स्फोटवादाचे विवेचन करताना 'ध्वनि' या संज्ञेचा केलेला वापरच ध्वनिसिद्धान्ताला दार्शनिक रूप व अभिधान देण्याचे कारण झाला हेही त्यांनी स्फोटवादाच्या साराचा आधार घेऊन स्पष्ट केले. हे करीत असतानाच 'ध्वन्यालोकातील ध्वनिकारिका आनंदवर्धनाने लिहिल्या की दुसऱ्या कुणी ?' या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा लक्षणीय प्रयत्नही त्यांनी केला.

डॉ. आष्टीकरांचे हे विवेचन काहीसे एककोटिक ( monolistic ) आणि अभिनिवेशयुक्त आहे. काहीसे धिटाईचे (यासाठी त्यांचे अभिनंदन करायला हवे.) आणि काहीसे अपुरे किंवा असमाधानकारकही आहे. भामहाची वक्रोक्ति म्हणजे व्यङ्ग्यतत्व हे समीकरण त्याच्या विविध उदाहरणांची पुरेशी चर्चा करूनच मग मांडणे शक्य वा अशक्य ते पाहता आले असते. रीतिविचारांचा आत्मा तर सौंदर्यतत्त्व = अलंकार. या अलंकारतत्त्वाचे विवेचन वामनाने 'सौन्दर्यमलङ्कारः । स च दोषगुणालङ्कारहानोपादानाभ्याम् ।' या दोन सूत्रांनी केले व त्यातूनच रीतिविचार आकारला. रसात पर्यवसन हेही वामनाने अभिप्रेत मानले. परंतु व्यंजनाव्यापाराची वा ध्वन्यर्थाची कल्पना मात्र त्याने स्पष्ट केलेली नाही. ती

कल्पना रीतींमध्ये अस्फुटशी प्रकटली होती हे ध्वनिकारिकेतील विधान निःसंदिग्धपणे व पूर्णतया वामनालाच तेवढे लागू होते असे म्हणता येणार नाही. रीतींचा विचार दण्डी व भामह यांनीही केला होताच. एवढेच नाही तर व्यंजनाव्यापार स्वीकारल्याविना या तिघांचा काव्यसौंदर्यविचार प्रकट होऊ शकला नाही, हे काही डॉ. आष्टीकरांनी पुरेशा पुराव्यांनी स्पष्ट केले नाही. ' स्फोटवाद्यांशी कट्टर वैर करणारे भामह व उद्भट व्यंजनाव्यापाराविषयी तर अरुची दाखवीत नाहीत ना ? ' हा प्रश्नही त्यांनी चर्चिला पाहिजे होता. नुसते वैर होते म्हणून भागत नाही, ते का होते व कसे होते याचेही विवेचन आवश्यक होते. महिमभट्टाच्या संबंधातही ' तो पूर्वसूरींबद्दल अनादर बाळगून वाचकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचा प्रयत्न करतो ' असे म्हणताना डॉ. आष्टीकर रुय्यकाचा हवाला देतात खरे, पण तो हे कसे करतो ते मात्र उदाहरणांची चर्चा करून स्पष्ट दाखवीत नाहीत. का ही आवश्यकताच नाही ? महिमभट्टाच्या मताचे अधिक विस्तृत परीक्षणही या संदर्भात आवश्यकच होते. नुसते विधान करण्याने वा कुणाचा हवाला ( त्याच्या पुरेशा विधाना-शिवाय ) दिल्याने मुद्दा सिद्ध होत नसतो. मला वाटते, डॉ. आष्टीकरांना हे करता आले असते. हे त्यांनी करायला हवे होते.

मला असेही वाटते की, विस्ताराची भीती त्यांना वाटत असावी ! ती त्यांना वाटते हे यावरून दिसते की, त्यांनी ध्वनिकार आणि वृत्तिकार हे वेगळे होते किंवा कसे या प्रश्नाची आपल्या आधीच्या लेखकांनी केलेली चर्चा वाचकांनी स्वतःच पाहावी असे त्यांनी प्रतिपादिले. मात्र या प्रश्नावरची आपली मते त्यांनी आनंदवर्धनाची वृत्ति व कारिका यांच्या परस्पर-संबंधाची विस्तृत चर्चा करून मांडली आणि या प्रश्नाला वेगळी दिशा दिली हे विसरता कामा नये. विस्तार टाळण्याच्या इच्छेनेच की काय त्यांनी काव्यमीमांसेतील ध्वनिसिद्धान्ताचा उपयोग वा अनुपयोगिता आधुनिक काव्याच्या संदर्भात चर्चेत आणली नाही. डॉ. आष्टीकरांच्या ग्रंथाचे प्रस्तावनालेखक प्रा. डॉ. माईणकर यांनी ' संधी व संध्यंगे' यावर नाट्यशास्त्रीय ग्रंथ लिहिला तेव्हा आधुनिक नाटकांचे परीक्षण त्या दृष्टीने केले होते, हे थोडेसे विषयांतर करूनही सांगायला हवे. आणखीही एक गोष्ट नोंदून ठेवावीशी वाटते ती ही की, या साऱ्या ध्वनिचर्चेत पूर्वकवींच्या ग्रंथांतरीचे उतारे कुठे चर्चेसाठी घेतलेले नाहीत, जसे अगदी आनंदवर्धनानेही ! क्षेमेंद्राने मात्र आपल्या विवेचनासाठी असे केले होते !

डॉ. आष्टीकरांच्या या ग्रंथाची नवी आवृत्ती येवो, सुधारलेली व परिपूर्ण आवृत्ती येवो, पानोपानी आढळणाऱ्या असंख्य अशुद्धींचा त्याग करून ती आवृत्ती येवो आणि मातबरांशी असलेले विरोध अधिक स्पष्ट रेखांनी आणि तपशिलांसह प्रकट करीत येवो ही आशा आहे.

— शांताराम जोग

## वनफूल

**म. म. देशपांडे,** मौज प्रकाशन, मुंबई ४

म. म. देशपांडे यांनी काव्यलेखनाला प्रारंभ केला १९४७ मध्ये!. १९६५ साली त्यांचा पहिला काव्यसंग्रह ' वनफूल ' या नावाने प्रसिद्धही झाला.

कवीनेच म्हटल्याप्रमाणे हे वनफूल

गोड रंग, उग्रवास
तयाचा न कुणा त्रास
कधी कधी पांथाला
पडते पण भूल
वनफूल— ( पृ. ६३ )

कधी कधी पांथाला या वनफुलाची भूल पडायला हरकत नाही.

काव्यनिर्मिती कशी होते व रसिकांनी काव्याचा रसास्वाद कसा घ्यावा या बाबतीत एका मुलाखतीत कवीने आपले विचार व्यक्त केले आहेत. काव्य हे काही नेहमीच प्रबळ भावनेच्या उत्स्फूर्त उद्रेकासारखे हृदयातून धावून बाहेर येणारेच असते असे नाही. त्यातून अलीकडे काव्याला बुद्धी म्हणा, चिंतन म्हणा याची जोड प्रामुख्याने दिली जाऊ लागलेली आहे.

एकेकाळी काव्यात चिंतनाचा भाग कमी होता. रंजनाचा, भावोद्रेकाचा भाग अधिक असे. तथाकथित जे चिंतन असे त्यात अध्यात्म आणि तत्त्वज्ञान यांच्या छटा अधिक असत. आत्मा–परमात्मा, माया–ब्रह्म असल्या शाब्दिक ठोकळ्यांनीच ते चिंतन चाले.

म. म. देशपांडे यांच्या काव्यात जी चिंतनशीलता आहे त्यामध्ये एक प्रकारची दैवी असंतुष्टता ( Divine Discontentment ) आहे त्यामुळे त्या चिंतनातून काव्याचा जन्म होऊ शकतो आहे. या चिंतनशील प्रवृत्तीमुळेच देशपांडे पूर्णपणे निराशावादी कवी बनले नाहीत. त्यांना वास्तवाचाही कधी विसर पडला नाही.

कवीच्या बहुतेक कवितांचा जन्म चिंतनातून झाला आहे. त्यांनी दिलेल्या एका मुलाखतीत त्यांनीच म्हटले आहे की " विश्व, वस्तू, प्राणी, मी आणि ईश्वर इत्यादींचा मी विचार करतो. या चिंतनाला जीवनातील अनुभव मी जोडीला घेतो. या अशा चिंतनातून कलाभावना निर्माण होते. अशा वेळी जर प्रतिभा भावनेच्या मदतीला आली, तर कविता हाती पडते. " ( प्रतिष्ठान, डिसें. ६६ )

विश्व, वस्तू, प्राणी, मी, यांचा विचार करताना देशपांडे यांना जीवनाचे कोडे उलगडले नाही. ( तसे ते कुणाला संपूर्णपणे उलगडले आहे म्हणा ? ) पण ते प्रश्न निर्माण करतात.

दिक्कालाच्या प्रचंड घुमटात
एकटाच असतो तेव्हा मी पुकारतो.
" कुठे आहेस ?"
...............
प्रतिध्वनींनी हवेचा कण न् कण निनादतो
खरोखर मला कोण हवे असते ? (पृ. ५)

त्यांना हाक येते—ती अशी

दुरून कुठून तरी हाक येते
( माझ्यातूनच येते ती )
म्हणते की वर ये
वर ये तू आपल्यातून
आपल्या तू चिखलातून वर ये (पृ. ४६)
काळ्या कुट्ट अंधाराचे
उत्तर एक हाक फक्त !
नाही उत्तर देता येत
घावरतो गणिताला
बुद्धाच्याही डोळा अंती
शून्याचाच थेंब आला ! (पृ. ३६)

जीवनाच्या या चिंतनाला भावनेची उत्स्फूर्तता फारशी चिकटलेली नाही. भावनेची विवशताही नाही. तत्त्वज्ञानातील शब्द रूपके वा प्रतिमा यांचा वापर नसल्यामुळे काव्यात कुठे दुर्बोधता आलेली नाही. सांकेतिकपणाही सहजपणे टळला आहे. जीवनाचे वास्तव दर्शन सामान्यांच्या दृष्टिकोणातूनच घेतल्यामुळे फार मोठा गूढगुंजनाचा भाव त्यात नाही. जीवनातील मूल्यांचा विचार करणाऱ्या द्रष्ट्याची इथे वृत्ती नसल्यामुळे फार मोठी ध्येयदर्शने नाहीत. कवी स्वप्नरंजनातही रमून जात नाही. आयुष्याच्या चिंध्या झाल्या आहेत पण त्याही

कामी येतात
पुसायला
आपल्या नि इतरांच्याही
जखमांमधले
अमोल रक्त ! (पृ. ३८)

काही झाले तरी कवी म्हणतो " जगायचे आहे मला म्हणूनीच अर्थ खोटे...लावूनिया जगतो मी "; ( पृ. २६ ) या वृत्तीमुळे कवी उगाच हळवा होत नाही. रोमँटिक कवीप्रमाणे त्याला भावनांचा फुलोरा फुलवता येत नाही. त्याला उदासीनपणाचे वा मरण्याचे मोठे

आकर्षण नाही !

कवीच्या भावनांचा प्रवाह मोठा संथ व संयत आहे. ( बहर फुलांचा ६०, स्वच्छ जळा मध्ये ४८, संसार ४१ ) अर्थात यामुळे कवीच्या एकूण प्रवृत्ती अंतर्मुख आहेत. तो अधिक तटस्थपणे जीवनाकडे किंवा त्यातील प्रश्नांकडे पाहतो.

श्री. देशपांडे पुण्या-मुंबईपासून बरेच दूर ग्वाल्हेरसारख्या हिंदी भागात राहतात. स्वभाव व त्यांचा पेशा याचाही काही परिणाम झाला असेल. यीटस्‌च्या चिंतनशीलतेचा व ईलियटच्या अध्यात्मनिष्ठेचा प्रभावही त्यांच्या विचारावर पडला आहे. यामुळे असेल कदाचित पण १९४० ते १९६५ या वीस वर्षांत मर्ढेकर, मुक्तिबोध, अनिल, कुसुमाग्रज अशा कवींनी जे नवेनवे विषय आणले, आविष्करणाचे अनेक प्रयोग केले त्यापासून श्री. देशपांडे दूर व बरेच अलिप्त राहिलेले आहेत. १९४७ नंतर म्हणजे स्वातंत्र्योत्तर काल-खंडात वाङ्मयातही केवढी तरी परिवर्तने झाली. त्यापासून देशपांडे यांची कविता कटाक्षाने दूर राहिलेली दिसते.

वनफूल या संग्रहात तुरळक सामाजिक कविता आहे. पण त्यातही तीव्रता नाही. संघर्षाचे चित्रण नाही ! कामगार, हरिजन, दुष्काळ, आक्रमण, दारिद्र्य, भ्रष्टाचार अशा विषयांवर कवीने कविता केल्याच पाहिजेत, त्याबद्दलच्या प्रतिक्रिया कुठेतरी त्याने व्यक्तविल्याच पाहिजेत, असा कुणी आग्रह धरू शकणार नाही, तसा आग्रह धरणे योग्य होणार नाही, हे मान्य करूनही चिंतनशील म्हणून स्वतःला संबोधणाऱ्या कवीच्या चिंतनात असल्या विषयांना जागा नसावी ( अथवा त्याने ते बुद्धया टाळावे ) हे जरासे खटकतेच.

जे सामाजिक विषयाबद्दल तेच निसर्ग अथवा प्रेम या संदर्भात म्हणता येईल. येथेही कुठल्याप्रकारे नावीन्य नाही, कुठलीही उत्कट वा उदात्त भावना नाही ! प्रेमाला त्याने काम अथवा वासना अशा भावनेचे पुट चढवले नाही. अथवा प्रेमाला मोठी दैवी आणि आत्मिक ओढ, असेही स्वरूप दिलेले नाही. संसार ( ४१ ) व इवला स्वेटर विणताना ( ४२ ) या कवितांत आढळून येणारी प्रीतिभावनेची नर्म गंभीरता, प्रौढता खरोखरीच वाखाणण्याजोगी आहे. पण अशी स्थळे अपवादात्मकच आहेत. अनिलांची प्रांजळ आणि उत्कट प्रीती आणि कुसुमाग्रजांचे प्रणय-चातुर्य ( रोमँटिक वृत्ती ) यांचा मधून मधून साक्षात्कार होतो. पाहा या दोन कविता उदाहरणादाखल–

( १ ) तुझ्या आवडत्या मोगऱ्याचा वास
संथ पावलांनी फिरे आसपास पृ. ३४

( २ ) सारे घेतलेस माझे
सारे काही हिरावून
मागे ठेविली परंतू
एका जखमेची खूण पृ. ३५

आविष्काराच्या बाबतीत कवीने काहीही नवीन प्रयत्न किंवा प्रयोग केलेले दिसत नाहीत. १९४७ ते ६५ हा काल बालटिका, कणिका, भावगीते, गजले, मुक्तछंद, मुक्तके, अशा अनेक काव्यप्रकारांचा असूनही या संग्रहातील ७३ कवितांपैकी ५०–५५ कविता ओवी, अभंग अशा प्रकारच्या आहेत. यमकांची आवड–ओढ काव्यातून विशेषपणे जाणवते. प्रतिमा–रूपके, शब्दयोजना यांचा विचार करताना देखील वाटते की, कवी अजून पारंपरिकतेच्या आधीन आहे. पारंपरिकता अनाकर्षक असते असे नाही. रसिक वाचकांचा एक मोठा वर्ग अशा कवितांचा स्वभावतःच चाहता असतो. " पावलांचे ठसे, दिक्कालाचा प्रचंड घुमट, अश्रूसरिता, हास्याच्या वागा, आयुष्याची गुंतावळ, डोळे मिटून प्यायाचा आला पुढे विपत्रेला मनाची बंद दारे– इ०– " हे सगळे संकेत नित्य परिचयाचे असल्यामुळे एकापरी कवीचा भावार्थ समजायला सुलभ जाते, पण एकापरी त्यात नावीन्याची झळाळी नसल्यामुळे थोडासा हिरमोडही होतो.

कवीने फारच क्वचित नवीन प्रतिमांचा वापर केला आहे.

सुकलेल्या आसवांचा<br>
मनी दाटला सुवास (११)<br>
जागृतीच्या वृक्षाखाली<br>
स्वप्न पाकळ्यांचा सडा (१५)<br>
संध्येचा शामल हात कोवळा<br>
पकडू पाहतो ! नदीकाठचा उडता बगळा (३०)<br>
कुत्रा बनुनिया मन<br>
जीवनांग चाटे (४९)

अशा काही संमिश्र, काही नवीन प्रतिमा कवी उपयोजतो, परंतु हे प्रमाण एकंदरीने बरेच कमी आहे !

मोटार, एड, पब्लिकपार्क, प्रमोशन, रेडियो, ॲम्ब्युलन्स अशा इंग्रजी शब्दांचा वापर करणे आक्षेपार्ह नाही हे खरे असले, तरी ज्या ज्या ठिकाणी ते शब्द आले आहेत ती ठिकाणे तपासली तर सदर शब्दांची अपरिहार्यता प्रस्थापित करता येईलच असे म्हणवत नाही. यमकासाठी कवीने सून आणि धुणं असा प्रयोग केला आहे तोही रसहानी करणारा वाटतो.

काव्यातील लयतत्त्व, भावनांचा समतोल, शब्द–संकल्पना यांतील सम–विषम रचना या संदर्भात कवीने स्वतःच कबूल केले आहे की, आपण या बाबतीत अनभिज्ञ आहो व या क्षेत्रात आपण काही प्रयोग केलेले नाहीत. तरी देखील सांज ( ३१ ), संध्यागीत ( ३३ ) अशा काही कवितांत कवीकडून न कळत एक ' लय ' पकडली गेलेली वाटते व त्यामुळे या व आणखी दोनचार कवितांना असे लयीचे सौंदर्य लाभलेले जाणवते.

कवीवर त्याने म्हटल्याप्रमाणे गु. ह. देशपांडे यांच्या शब्दलालित्याचा व अंशतः गेयात्मकतेचा परिणाम झालेला दिसतो. नाच ( ७२ ) तूही, तूही ह्या दोन कविता त्या दृष्टीने पाहाव्यात.

गीतांतून अंतरंग
जसे ओलेतीचे अंग (पृ. १८)
साठवलेले आटते संथ
आणि उरते रिकामी खंत (पृ. २४)
दिवस मिटतो हळूच पापणी
गालात हासते शुक्राची चांदणी (पृ. ३०)

असल्या काही ओळीमधले शब्दलालित्यही, गु. ह. देशपांडे किंवा रविकिरणमंडळाच्या धर्तीवर गेले आहे असे मनात येते.

देशपांडे यांच्या काव्यातील अनुभूती पुष्कळशी खाजगी व व्यक्तिगत वाटते. पूर्वीचे कवी ' कशावर ' तरी, म्हणजे एखादा विषय घेऊन तत्संबंधीची अंशतः आपल्या अनुभूतीच्या रंगाने व व्यापक – विस्तृत रसिकवर्गाला आवाहन होईल अशा ढंगाने कविता लिहीत. आत्मप्रकटन व रंजन असे त्यांचे प्रायः दोन्ही हेतू असत.

अलीकडच्या काळात काव्याला विषय लागत नाही. कवीची अनुभूतीच महत्त्वाची ठरते. यालाही रसिकाची हरकत नाही. ही अनुभूती पुष्कळ वेळा कवीलाच मुळात दुर्बोध असते. म्हणून वाचकालाही ती दुर्बोध वाटते. त्याबद्दलही चांगला वाचक तक्रार करीत नाही. या मुळात दुर्बोध अनुभूतीसाठी वापरलेले शब्द, शब्दसंहती, संकल्पना व प्रतिमा, त्याचे आकारबंध हेही दुर्बोध असण्याची शक्यता नाकारता येत नाही. कालांतराने हे सारे सवयीचे व समजण्याजोगे होते.

परंतु पुष्कळ कवींची अनुभूती केवळ व्यक्तिगत राहते, तिला वैश्विक स्वरूप घेता येत नाही. ज्या समाजात तो कवी वावरतो त्या समाजाची बौद्धिक किंवा कलानुभूतीची पातळी कवी गाठू शकत नाही. अथवा अनेक अनुभूती क्षीण असतात अथवा गौण असतात. त्यांना केवळ शब्दांकित केले म्हणजे त्यांना " काव्य " स्वरूप प्राप्त होतेच असे नाही. मग तो कवी मागे राहतो, बाजूला पडतो.

देशपांडे यांना जुन्या पिढीतला रसिक वाचकही मिळालेला नाही आणि नव्या पिढीतला अत्यंत तरल संवेदनाक्षम असलेला तरुण रसिक वाचकही पुरेसा मिळालेला नाही ( किंवा नसावा ! ! ) त्यांच्या चिंतनशील कवितेला अनुभूती व प्रतिभा यांची पुरेशी साथ लाभलेली नाही. जुने विषय, वा आविष्कारण पटत नाही, नवे अनुभव, आशय व प्रयोग हे पेलवत नाही, चिंतन कधी अपूर्ण तर कधी संकीर्ण त्यामुळे तेही आकर्षणीय वा आस्वाद्य झालेले नाही !

तरीदेखील चिंतनात्मक स्वभाव, संयत भावना–शीलत्व, अंतर्मुखता, एक सहृदय, ताटस्थ्य यांची ज्यांना अभिरुची आहे त्या वाचकाला ही कविता आवडेल. जुन्या–नव्या आविष्करणातील समतोलही या काव्यातून त्यांना आढळल्यासारखा वाटेल ! आणि त्यांना हे ‘ वनफूल ’ खचितच भूल घालील.

**प्रा. बा. शि. आपटे**



**लोकहितवादी / काल आणि कर्तृत्व**
**प्रा. निर्मलकुमार फडकुले,**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन,
पाने ३६०, किं. वीस रुपये.

लोकहितवादींच्या जीवनकार्यावर नव्या दृष्टिकोणातून सुमारे ४० वर्षे लेखन होत आहे. १९३५ च्या सुमारास प्रभाकर पाध्ये व टिकेकर यांनी या उपक्रमाला सुरुवात केली. त्यानंतर आचार्य जावडेकर, प्रा. गं. बा. सरदार यांनी आपले ग्रंथ प्रकाशित केले. १९३५–४० च्या सुमारास महाराष्ट्रात समाजवादी विचारांची जी नवी पिढी निर्माण झाली, त्यांनी मुख्यतः या उपक्रमास हातभार लावला. परंतु गेल्या ४० वर्षांत लोकहितवादीं-वर मराठीत जे साहित्य प्रकाशित झाले आहे, त्यापेक्षा प्रा. निर्मलकुमार फडकुले यांच्या या ग्रंथाचे एक वैशिष्ट्य आहे. आतापर्यंत लोकहितवादींचे मुख्यतः शतपत्रे किंवा निबंधसंग्रह हे ग्रंथ डोळ्यासमोर ठेवूनच त्यांच्यावर लिखाण झाले किंवा त्यांच्या इतर ग्रंथांवर अलगपणे विचार झाला. परंतु लोकहितवादींनी आपल्या ४०–४५ वर्षांच्या काळात जे विविध आणि विपुल लेखन केले, त्याचा समग्र विचार करण्याचा प्रथमच प्रयत्न या ग्रंथामध्ये झाला आहे. या दृष्टीने गेल्या ४० वर्षांतील लोकहितवादींवरील सर्व लिखाणामध्ये या ग्रंथाचे हे वैशिष्ट चटकन वाचकांचे लक्ष वेधून घेते.

या ग्रंथामध्ये लोकहितवादींच्या काही वैचारिक अंगावर प्रथमच हा प्रकाश फेकला जात आहे. या दृष्टीने या पुस्तकातील इतिहासलेखन, या प्रकरणाचा उल्लेख करता येईल. लोक-हितवादींनी भारताच्या इतिहासावर लहानमोठी ८–१० पुस्तके तरी लिहिलेली आहेत. या पुस्तकांतून लोकहितवादींचा इतिहासाकडे पाहण्याचा दृष्टिकोण व्यक्त होतो. त्यांच्या सम-कालीनापेक्षा त्यांचे इतिहासाचे तत्त्वज्ञान वेगळे आहे हेही लक्षात येते. भारताचा अधःपात का झाला ? याची मीमांसा त्या काळी चक्रनेमिक्रमाच्या सिद्धान्ताप्रमाणे केली. इतिहासाचे रहाट–गाडगे फिरत राहते. त्यातून आजची अवस्था निर्माण झाली, असे त्यांनी सांगितले. लोकहितवादी यांनी यापेक्षा वेगळी भूमिका घेतली. आपल्या पराभवाची, अधःपाताची बीजे त्यांनी आर्थिक, सामाजिक परिस्थितीमध्ये शोधण्याचा प्रयत्न केला. आपल्याकडे ज्ञानाची पिछेहाट झाली. त्यातून आपला खरा अधःपात सुरू झाला, असे लोकहितवादींनी सांगितले. त्याचप्रमाणे जातिभेद, अस्पृश्यता यांच्यामुळे समाजातील एकजिनसीपणा कमी

झाला, असेही त्यांनी सांगितले. प्रा. फडकुले यांनी या दृष्टिकोणातून लोकहितवादींच्या इतिहासाच्या तत्वज्ञानाची केलेली मीमांसा विचारप्रवर्तक ठरणारी आहे. मराठीतील अशा प्रकारचा पहिलाच प्रयत्न म्हणूनही त्यांचा उल्लेख करावा लागेल.

लोकहितवादी यांच्या शैलीसंबंधीची प्रा. फडकुले यांची मीमांसादेखील नवीन व विचारप्रवर्तक ठरणारी आहे. १८४८ साली लोकहितवादी यांची शतपत्रातील मराठी शैली अधिक स्वाभाविक व अस्सल मराठी होती. ही शैली त्यामुळे जिवंत व प्रभावी होती. मराठी भाषेची वाढ याच पद्धतीने झाली असती तर आजची मराठी अधिक नैसर्गिक व प्रभावी वनली असती. परंतु येथील मराठी भाषा नको इतकी संस्कृतच्या प्रभावाखाली गेली. त्याच्या बरोबर इंग्रजी ग्रंथांची छापही मराठीवर पडू लागली. त्यामुळे एका बाजूला संस्कृतचा प्रभाव व दुसऱ्या बाजूला इंग्रजी वळणाची छाप यामध्ये मूळची अस्सल मराठी शैली दुबळी झाली असा विचार त्यांनी मांडला आहे. या संदर्भात विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या शैलीची त्यांनी चर्चा केली आहे. पुढील मराठी काहीसे कृत्रिम व बोजड झाले, असेही त्यांनी म्हटले आहे. त्यांची ही मीमांसा अनेकांच्या विचारांना खाद्य पुरवील यात शंका नाही.

लोकहितवादी यांच्या विचारांत काही बदल झालेले आहेत. आयुष्याच्या उत्तरार्धात ते स्वामी दयानंद सरस्वती यांच्या विचाराकडे अधिक आकृष्ट झालेले दिसतात. प्रा. फडकुले यांनी या दृष्टीने २३९ ते २४४ पानामध्ये केलेले विवेचन महत्त्वाचे मानावे लागेल. दयानंद सरस्वती यांच्या कार्याचे मूल्यमापन करताना लोकहितवादी लिहितात, " विलायतेत बुद्धीचे सागर किंवा बुद्धिमत्त्वाचे खनी असे अडाम स्मिथ, बेकन, मिल्ल वगैरे जे महापंडित युरोपात होऊन गेले आणि ज्याप्रमाणे आपल्याकडे पूर्वी कणाद, गौतम, शंकराचार्य यांच्यासारखे वेदशास्त्रपारंगत व धर्मसंस्थापक होऊन गेले त्यांच्या तोडीची स्वामीजींची मूर्ती होती असे म्हणायास आम्हांला लवमात्र शंका वाटत नाही. "( पा. २४३ ) स्वामी दयानंद सरस्वती यांच्या या गौरवामध्ये त्यांच्या विचारांचा लोकहितवादींवर किती प्रभाव पडला होता याची कल्पना येते. त्याचप्रमाणे १८८० च्या सुमारास त्यांनी वेदविद्येचा जो गौरव केलेला आहे, त्यामध्येही आर्यसमाजाचा त्यांच्यावरील प्रभावच दिसून येतो. भारताचा अधःपात झाला, कारण आपण वेदातील ज्ञानाची उपेक्षा केली व भारताचा उद्धार व्हायचा असेल तर पुन्हा वेदांचा आपण गौरव केला पाहिजे, असे विचार त्यांनी स्वाध्याय या ग्रंथातून मांडले आहेत. युरोपमधील राष्ट्रे विकासाकडे वाटचाल करू लागली. कारण त्यांनी प्राचीन आर्यविद्यांचे ज्ञान आत्मसात केले असेही त्यांनी म्हटले आहे. संस्कृत साहित्याकडे पाहण्याच्या त्यांच्या दृष्टिकोणातही पुढे बदल झालेला आहे. प्रा. फडकुले यांनी निरनिराळ्या ठिकाणी लोकहितवादींच्या विचारांचा मागोवा घेताना त्यांच्या ग्रंथातील उतारे दिलेले आहेत. यातूनही आपल्याला याचा प्रत्यय येतो. प्रा. फडकुले यांनी याबाबत ग्रंथातून दिलेली माहिती अतिशय उपयुक्त व दुर्मिळ आहे.

प्रा. फडकुले यांनी लोकहितवादींच्या सर्व जीवनकार्याचे व विचारांचे मूल्यमापन करतांना सध्याच्या परिस्थितीचे अवधान मुद्दाम दिलेले नाही. त्यांच्या विचाराचा आजच्या जीवनाशी कुठे संबंध आहे हे त्यांनी जागोजाग दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे हे विवेचन जिवंत व उद्‌बोधक झाले आहे.

त्यांच्या विवेचनपद्धतीचे दुसरे वैशिष्ट्य असे की, त्यांच्या कार्याचे मूल्यमापन करतान त्यांच्या काळातील सामाजिक, आर्थिक परिस्थिती त्यांनी सतत डोळ्यासमोर ठेवलेली आहे. १८४० ते १८९० या काळातील महाराष्ट्रातील परिस्थिती काय होती व या परिस्थितीचा त्यांच्या जीवनावर काय परिणाम झाला याची त्याने चांगल्या प्रकारे मीमांसा केली आहे. त्याचबरोबर त्यांच्या विचाराचा, कार्याचा या परिस्थितीवर कोणता परिणाम झाला याचीही त्यांनी चर्चा केली आहे. लोकहितवादींच्या सर्जनशील व्यक्तिमत्त्वाचा त्यांच्या काळावर झालेला परिणाम आणि परिस्थितीचा त्यांच्या जीवनकार्यावर पडलेला प्रभाव याचे एकत्रित दर्शन या ग्रंथामध्ये पाहावयास मिळते. त्यांचे सर्व विवेचन त्यामुळे 'शास्त्रीय' व मूलगामी स्वरूपाचे वाटते. ग्रंथाला त्यांनी लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व असे नाव दिले आहे, त्यातच त्यांची ही भूमिका स्पष्ट झालेली आहे.

मराठी भाषेमध्ये एका चांगल्या ग्रंथाची भर घातल्याबद्दल प्रा. फडकुले याचे मनःपूर्वक अभिनंदन केले पाहिजे.

**— डॉ. मा. प. मंगुडकर**



**रंगगंढ**
**रंगनाथ नरहर होनप**

प्रकाशक : रं. न. होनप
पृष्ठे १००, मूल्य ३ रुपये.

हा कवितासंग्रह कविवर्य रंगनाथ तथा बगाराम म्हणजे श्री. रंगनाथ नरहर होनप यांचा असून, त्यांतील कवितांची निवड कै. आचार्य प्र. के. अत्रे आणि कै. न. ग. ऊर्फ बन्याबापू कमतनूरकर या गोविंदाग्रजांच्या सांप्रदायिकांनी केलेली आहे, एवढे लक्षात घेतले तरीसुद्धा हा कवितासंग्रह कोणाच्याही वाचण्यात आलाच पाहिजे असा आहे, हे निराळे सांगण्याची आवश्यकताच उरत नाही. त्यातून या पुस्तकास चोखंदळ चिकित्सक प्रा. श्री. के. क्षीरसागर यांची प्रस्तावना आहे, ती वाचल्यावर हे पुस्तक समग्र वाचल्याशिवाय खाली ठेववणार नाही, आणि खाली ठेवताना प्रा. क्षीरसागरांच्या गुणग्राहकतेशी आपण समरस असल्याचाच निर्वाळा प्रत्येक रसिक देईल.

श्री. रंगनाथ होनप हे चित्रशाळेत मुद्रित-तपासनीस म्हणून शुद्धलेखनतज्ज्ञ म्हणून गणले गेले असले तरी त्यापेक्षाही " वेष असावा बावळा । परी अंतरी नाना कळा ॥ " या समर्थोक्तीचे प्रात्यक्षिकच कविवर्य होनप आहेत याचे प्रत्यंतर त्यांच्या या कवितासंग्रहातही येते. " रंग–ढंग " या पुस्तकाच्या नावावरूनही " साध्याही विषयात आशय कधी मोठा किती

आढळे।" हा जो होनपांच्या परिचितांचा त्यांच्या व्यक्तित्वाचा प्रवोध तोच रसिकांना या पुस्तकातील कवितांचे मथळे वाचले तरी होतो. "मन परक्यांचे वटीक बनते। **नको असे हे ज्ञान** ॥" म्हणणारे कवी "ही पहा अंगना नामे 'शांता' जरी। का क्रोधानल परि धगधगतो अंतरी?॥" अशी **विषमता** वेचून काढण्यात साहजिकच पटाईत आहेत. **शोभा** आणि प्रभा यांचा संवाद करणाराच कवि **सुंदरीस बोध** करताना सांगू शकतो की, "शालू सखे! भरजरी जरि नेसशील। ते रेशमी तुज किडे नित पाहतील॥" असेच गंभीर आणि जीवनतत्त्वज्ञानात्मक विवेक कवीने आपल्या **शब्द आणि कृती, जीवनभैरवी, राजमान्य राजश्री, दगडांचे पुतळे, ग्रहांचे युद्ध, मातृभोजन, वठलेले झाड, चलेजाव, सीतेचा पश्चात्ताप** इत्यादी कवितांतून प्रकटविला आहे. "जो करी नित्य जनकाजा। तो खरा जगाचा राजा॥" हा कवींचा जीवननिष्कर्ष असून **मरणाच्या वेळी** "हे दृश्य पहाया धीर मिळो।" अशी "अभयं सत्त्वसंशुद्धिः" ची प्रार्थना करणारा हा कवी आहे.

कवी छंदोबद्ध रचना करतात, म्हणून ते आधुनिक नाहीत किंवा अद्ययावत नाहीत असेही म्हणण्याचे कारण नाही. केवळ नादमधुर, त्रोटक व तुटपुंज्या शब्दसमूहांच्या आशयहीन नादमाधुर्यांचा भोक्ता मात्र हा कवी नाही. '**मला काय त्याचे?**' या कवितेत त्यांचे अद्ययावत समाजनिरीक्षण स्वराज्यातीलही रंजल्यागांजल्यांच्यापर्यंत जसे पोहोचले आहे तसेच "**वाढा झणि सांजा!**" या कवितेतील त्यांचा विडंबनोत्साह अत्याधुनिकांची बरोबरी करणारा तरी खास आहे. त्यांची "**सासुबाईंची आरती**" हे एका जीर्णशीर्ण वडिलीकीची हुकूमशाही सांगणारी कहाणी वाटणारे जसे काव्य आहे तसेच आधुनिक सून किती खट्याळपणे स्पष्टवक्ती झाली आहे, हे स्पष्ट करणारी ही चुणूक आहे.

तात्पर्य, कविवर्य वगाराम ऊर्फ रंगनाथ होनप अंतरिचा ज्ञानदिवा न मालवता, जगाकडे डोळसपणे बघणारे, त्यातील वारकाव्यावर सूक्ष्म नजर ठेवणारे आणि भावप्रधानतेने वत्सल प्रबोधन करतानाही काव्यसृष्टीतील चढउतारावरच नव्हे, तर आविष्कारकौशलयोगावरही मार्मिकपणे लक्ष ठेवणारे अभ्यासू गृहस्थ असल्याचा प्रत्यय रंग-ढंग वाचनाने विनचूक येतो आणि त्यांच्या रसात्मक काव्यसंपदेला धन्यवाद दिल्याशिवाय राहवत नाही.

— **पुरुषोत्तम पांडुरंग गोखले**

---

**शंकरराव देव / वि. म. बेडेकर /** पृष्ठ १२० वरून चालू

शंकररावांच्या राजकारणातील कर्तृत्वाच्या बुडाशी कोणत्या मूळ उत्कट अंतःप्रेरणा होत्या, त्यांचा स्रोत मूळ कसा आध्यात्मिक होता, ह्या आध्यात्मिक स्रोताची ओढ समाजजीवनाकडे कशी होती, या अंतःप्रेरणांचा स्रोत गांधीजींच्या महान युगप्रवर्तक चैतन्यशाली सत्संगामुळे कसा बलशाली व व्यापक बनत गेला, त्या अंतःप्रेरणांचा प्रवाह त्यांनी लिहिलेल्या वाङ्मयात कसा चैतन्याने सळसळत आहे, याचे थोडे दिग्दर्शन वर केले आहे. केदारनाथजी म्हणतात तेच खरे—असा गांधीदर्शनाचा महान साधक विरळाच!



# कै. शंकरराव देव : गांधी-दर्शनाचा महान् साधक

**वि. म. बेडेकर**

एका वेळचे भारताच्या राजकारणातील अखिल भारतीय कीर्तीचे नेते, जीवनाच्या अखेरीपर्यंत सर्वोदयवादाचे उत्कट तत्त्वचिंतक व निरलस कार्यकर्ते श्री. शंकरराव देव (जन्म* ३१ जानेवारी १८९५) यांचे दुःखद निधन पुणे येथे ३० डिसेंबर १९७४ रोजी पहाटे ५॥ वाजता झाले. त्यांच्या निधनाने सर्वांगीण गांधीवादाचा—गांधीवादानुसार सत्याग्रही राजकारण आणि सामाजिक ऐक्य व संघटन आणि प्रबोधन घडवून आणणारा विधायक कार्यक्रमक अशा समग्र गांधीवादाचा, गांधीवादी जीवनदर्शनाचा कायावाचामनाने उत्कटत्वाने पुरस्कार करणारा, अखिल भारतीय कीर्तीचा एक ज्येष्ठ व श्रेष्ठ महाराष्ट्रीय तत्त्वचिंतक व कार्यकर्ता कायमचा दृष्टीआड झाला आहे.

सर्वसामान्य बहुश्रुत सुज्ञ वाचकांना शंकररावांनी महाराष्ट्रात व अखिल भारतात जे एकेकाळी राजकीय क्षेत्रात असामान्य नेतृत्व गाजविले त्याची माहिती असली पाहिजे असे धरून चालावयास हरकत नाही. गांधीयुग १९२० सालापासून सुरू झाले असे साधारणतः म्हणता येईल. गांधीवादी राजकारणाला व समाजकारणाला महाराष्ट्रीय बहुजनमानसात स्थिर पद व जोमदार वाटचाल प्राप्त करून द्यायला ज्या महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांचे धडाडीचे प्रयत्न कारणीभूत झाले त्यांत केंद्रस्थान शंकररावांना द्यावे लागेल. त्यांनीच प्रामुख्याने अविश्रांतपणे दौरे काढून, भाषणांच्या फैऱ्या झाडून, 'स्वराज्य', 'लोकशक्ति' यांसारखी वर्तमानपत्रे चालवून त्याकरिता सहन करावा लागणारे कष्ट, सायास, कारागृहवास सोसून गांधी-नेतृत्वाखाली आलेली कॉंग्रेस महाराष्ट्रात बलाढ्य केली. कॉंग्रेसचे पहिले ग्रामीण अधिवेशन १९३६ साली फैझपूर (खानदेश) येथे भरून अत्यंत यशस्वी झाले. त्याचे श्रेय शंकररावांच्या नेतृत्वालाच द्यावे लागेल. या त्यांच्या यशामुळे त्यांच्या हाती

---

*शंकरराव देवांच्या जन्मतारखेविषयी प्रसिद्ध झालेल्या लेखात एकवाक्यता आढळून येत नाही. पंचांगाप्रमाणे त्यांचा जन्म माघ शुद्ध ५ वसंतपंचमीला झाला. १८९५ साली वसंतपंचमी ३१ जानेवारीला होती.

अनुक्रमणिका

महाराष्ट्रीय राजकारणाची सूत्रे आली, व तेव्हापासून अखिलभारतीय काँग्रेसच्या नेतेमंडळीत त्यांचा मानाने समावेश झाला. हे त्यांचे अखिल भारतीय नेत्यांमधील स्थान त्यांनी सर्वोदय-कार्याला वाहून घेण्याकरिता १९५५ साली काँग्रेस सोडीपर्यंत कायम होते. अखिल भारतीय काँग्रेसच्या कार्यकारिणीचे चिटणीस, घटनासमितीतील एक सदस्य ही पदे त्यांच्याकडे आपणहून चालून आली. त्यांनी या पदांचा, तसेच स्वातंत्र्योत्तर स्थापन झालेल्या सरकारी सत्तेत भाग मिळविण्याचा कधीच हव्यास धरला नाही. फैझपूर काँग्रेसनंतर महाराष्ट्र काँग्रेसच्या प्रांतीय अध्यक्षपदाचे स्थान त्यांच्याकडे चालून आले होते. परंतु महाराष्ट्रात बहुजनसमाजाची संघटना होऊन त्याला काँग्रेसमध्ये आत्मसात करून घ्यावे म्हणून त्यांनी जेधे यांनाच ते मिळावे म्हणून प्रांतीय अध्यक्षपदाचा स्वीकार केला नाही. त्यांच्या जीवनात मोठे पद किंवा अधिकार याबद्दल त्यांना एकदाच मोह झाला. स्वातंत्र्योत्तर काळात अखिल भारतीय काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी झालेल्या निवडणुकीत त्यांनी हिरीरीने भाग घेतला. या निवडणुकीत त्यांचा पराभव झाला व पुरुषोत्तमदास तण्डन निवडून आले. निवडणुकीत पडण्याचा आपणास मोह झाला व आपल्या चारित्र्याला तो एकमेव डाग लागला असे त्यांनी ' आपली जीवनयात्रा—मैत्री-यात्रा ' या पुस्तकात प्रांजळपणे लिहून ठेवले आहे.

शंकररावांनी राजकारणात हिरीरीने पुढाकार घेऊन काम केले, त्यामागे त्यांना, सत्तेची, अधिकाराची व संपत्तीची बिलकूल अभिलाषा नव्हती. भारतास स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावर स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेतलेले कित्येक लहानथोर नेते सरकारी अधिकारांच्या व संपत्तीच्या स्थानी वर्षानुवर्षे जाऊन बसलेले आहेत. पण शंकरराव त्यापासून अलिप्त राहिले हेच त्यांच्या असामान्य व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्ट्य होय. त्यांचा पिंड जात्याच अध्यात्मप्रवण होता. व्रतस्थ, संयमी, विषयविकाररहित राहून आश्रमीय अपरिग्रही जीवन जगावे अशी त्यांची मनातील प्रेरणा होती. पण हे त्यांचे अध्यात्म समाजविमुख नव्हते. असे त्यागी व्रतस्थ जीवन अंगीकारून स्वातंत्र्यसंग्रामात उडी घ्यावी व समाजसेवा करावी ही स्फूर्ती आपण आपल्या ऐन तारुण्यात लो. टिळकांपासून घेतली व तिचे जीवनभर आचरणात आणण्याचे मार्गदर्शन आपणांस म. गांधींकडून मिळाले असे त्यांनी अनेक ठिकाणी म्हणून ठेविले आहे. म. गांधींचाही पिंड आध्यात्मिक होता व ते आपले आध्यात्मिक सत्याग्रही प्रयोग सामाजिक चळवळीच्या प्रवाहात राहून शेवटपर्यंत करीत राहिले. म. गांधी अशा अध्यात्मनिष्ठ सत्याग्रही सामाजिक संघटनेचे प्रचंड चैतन्यशाली विद्युत्केंद्र होते. या विद्युत्केंद्राशी शंकररावांसारख्या अध्यात्मनिष्ठ समाजसेवकाच्या चैतन्य लहरीं ( wave-length )चा संवाद आपोआप जमला व गांधीदर्शनामुळे त्यांच्या जीवनाला एक असामान्य ओज व सार्थकता प्राप्त झाली. त्यांच्या पहिल्या मुळशी ( १९२२ ) कारागृहापासून अगदी अखेरच्या (१९६३) 'मैत्री-यात्रेपर्यंत' म. गांधींच्या चैतन्यमय आंदोलनांनी त्यांची अहिंसा, प्रेम, माणुसकी यावरील श्रद्धा दृढ झाली व

तदनुसारी आचरण अधिकाधिक सुसंस्कारी व उन्नतोन्नत बनत गेले असे त्यांच्या जीवन-सरणीवरून व भाषणलेखनांवरून दिसून येते.

शंकररावांचे जीवन पहिल्यापासूनच कष्टमय खडतर होते. आईबापांचे सुख त्यांना मिळाले नाही. आपल्या जीवनात कौटुंबिक सौख्याच्या ओलाव्याचा कधीच अनुभव आला नाही असे त्यांनी म्हटले आहे. घरची गरिबी. तुलनेने काही इतर पुढाऱ्यांच्या वाट्याला आलेली असामान्य बुद्धिमत्ता, खानदानी कुटुंब, संपत्ती ह्यांपैकी काही त्यांच्या जवळ नव्हते. एवढ्या खडतर, कष्टमय दारिद्र्याच्या परिस्थितीतून त्यांनी आपले जीवन कमळाप्रमाणे सुरभि व विकसित केले, यातच शंकररावांच्या व्यक्तित्वाचे असामान्यत्व होय. त्यांच्या मनाची ओढ आध्यात्मिक जीवनाकडे, अपरिग्रह वृत्तीकडे उत्कटत्वाने कशी होती याचे एक उदाहरण देता येण्यासारखे आहे. राजकीय जीवनाच्या रगाड्यातून त्यांना उसंत मिळे ती त्यांना मधून मधून शिक्षा म्हणून झालेल्या अनेक कारागृह-वासांत. हे कारागृहवास म्हणजे त्यांना चिंतन–मनन–वाचन–सत्संग याकरिता तपोभूमी-सारखे किंवा मंदिरासारखे वाटत. अशाच एका १९२७-२८ च्या कारावासात आपल्या जीवनाविषयी चिंतन करीत असताना त्यांना आपण आपले जीवन अगदी अपरिग्रही बनवावे, आपण कोरडी भिक्षा मागून राहावे असे त्यांच्या मनाने घेतले. तुरुंगातून सुटल्यानंतर ते श्री. नारायणशास्त्री मराठे (मागाहून हे स्वामी केवलानन्द झाले) यांच्याकडे वाईला गेले व त्यांना आपला मनोदय सांगून भिक्षाव्रताची दीक्षा घेतली. अर्थात समाजात आपले राजकारण व समाजकारण यांत व्यग्र असलेले जीवन कंठीत असताना त्यांना हे व्रत पाळता आले नाही. 'भिक्षा मागायचा मला संकोच वाटे, संकोच सोडण्याइतका मी निरहंकारी बनलो नाही' अशी खंत त्यांनी भिक्षाव्रत का पाळू शकलो नाही याबद्दल व्यक्त केली आहे. इतके ते अंतर्मुख व वृत्तीने लीन होते. बुद्धीच्या बाबतीत विनोबांशी तुलना करून ते नेहमी व्याख्यानातून उघड बोलत असत की विनोबांच्या बुद्धीची सर मला अनेक जन्म घेऊनही येणार नाही. आचार्य जावडेकर व आचार्य भागवत यांच्यासारखे कुशाग्र बुद्धीचे व त्यांच्या विचारसरणीशी समरस होणारे त्यांना परममित्र लाभले होते. वर उल्लेखिल्याप्रमाणे कारावासातच त्यांचे वाचन, मनन, चिंतन चालू असे. १९३२–३४ च्या कारागृहवासात आपणास उपनिषदांचा सूक्ष्म अभ्यास करण्यास राधाकृष्णन् यांच्या 'फिलॉसफी ऑफ दि उपनिषद्स' हा ग्रंथ वाचून स्फूर्ती झाली असे त्यांनी नमूद केले आहे. त्या स्फूर्तीमुळे उपनिषदे वाचून 'उप-निषदांतील गोष्टी' हे त्यांनी पुस्तक लिहिले. पुढे १९४० सालच्या वैयक्तिक सत्याग्रहात कारावासात असताना आचार्य वि. प्र. लिमये हे साथीदार त्यांना मिळाले. त्यांच्याजवळ त्यांनी ब्रह्मसूत्रभाष्याचे अध्ययन केले व उपनिषदांचा अभ्यास सूक्ष्मपणाने केला. या त्यांच्या उपनिषदांच्या अभ्यासाचे फळ म्हणजे त्यांचे १९५० साली 'उपनिषत्सार' हे प्रकाशित झालेले पुस्तक होय. 'उपनिषत्सार' हे पुस्तक खरोखरीच प्रमुख उपनिषदांतील

विचारांचे उत्कृष्ट सार आहे. त्यातील प्रकरणांची नावे—जन्मसाफल्य, आत्मा, ब्रह्म, सृष्टी, जीव, मोक्ष, दुःख, कर्मविपाक, साधना, नीती इत्यादी–ही मोठी सूचक असून त्यावरुन शंकररावांनी उपनिषदांतील विचारांची कशी सूत्रबद्ध विभागणी केली आहे, याची कल्पना येऊ शकेल. शंकररावांनी केलेले त्या त्या विषयांचे प्रतिपादन रेखीव–खाली ती ती वचने उद्धृत करून साधार–केले असून त्यांची प्रतिपादनशैली ते त्या विषयाशी किती समरस झाले होते हे दाखविते. उपनिषदांचा सामान्यतः जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण निराशावादी (pessimistic) नसून आशावादी व आनंदवादी आहे हे त्यांनी आवर्जून मांडले आहे. भगवद्गीता शंकररावांनी लहानपणी ते वाई तालुक्यातील आपल्या बावधन या गावी असताना कोणा वामन तात्या करंदीकर नावाच्या शास्त्र्यांच्या प्रेरणा-प्रोत्साहनाने मुखोद्गत केली होती. वेदान्त–तत्त्वज्ञानाची विश्वाशी एकरूपता साधण्याची तळमळ–त्यांना लहान वयातच लागली. टिळकांचे ‘ गीतारहस्य ’ प्रसिद्ध झाल्याबरोबर आपण तीन रुपये कसेबसे जमवून ते विकत घेतले त्या वेळी झालेला आनंद त्यांनी वर्णन केला आहे.

१९४२ च्या कारावासात शंकररावांनी ‘ भगवान बुद्धासाठी ’ हे पुस्तक लिहिले—(ते १९४७ साली प्रसिद्ध झाले.) हे पुस्तक लिहिण्याची कल्पना त्यांना कशी सुचली याचे त्यांनी जे वर्णन केले आहे त्यावरून त्यांच्या मननचिंतनाचे कोणते विषय प्रामुख्याने होते हे कळून येते. त्यांनी जे प्रस्तावनेत म्हटले आहे त्याचा सारांश असा : “ मी माझ्या जाड्याभरड्या आवाजात उपनिषदांतील काही मंत्र गुणगुणत होतो व माझे विचारचक्र निराळेच सुरू झाले होते. सुप्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यूएनत्संग (इ. स. ६०२–६६४) भगवान बुद्धाच्या शिकवणीने इतका आकर्षित झाला की, आपल्या आराध्य महापुरुषाचे निर्वाणस्थान प्रत्यक्ष पाहण्याच्या ईर्षेने चीनपासून वाटेतील जंगले, वाळवंटे, डोंगर तुडवीत, हालअपेष्टा सोशीत, भारतामध्ये आला. मैत्री, करुणा यांचा संदेश देणाऱ्या भगवान बुद्धाच्या वसतिस्थळांना डोळ्यांखालून घालण्याची केवढी या साधकाची तळमळ असली पाहिजे असे माझ्या मनात विचार आले. ‘ अथांग अशा रणरणत्या मरुभूमीतून प्रवास करताना या यात्रेकरूला स्वतःच्या सावलीशिवाय कोणीही वाटाड्या नव्हता. ’ केवढी ही अपार अढळ श्रद्धा व असीम धैर्य !” हे विचार मनात येऊन त्या विचारांनी शंकरराव इतके प्रभावित झाले की ह्यूएनत्संगाच्या प्रवासवर्णनाचे इंग्रजीतील पुस्तक मिळवून त्याचा अनुवाद त्यांनी मराठीत मोठ्या भक्तिभावाने आणला. ह्यूएन-त्संग, फाहेन इत्यादी चिनी बौद्ध प्रवासी व बौद्ध धर्माचे प्रमुख ग्रंथ व तत्त्वे यांचा परिचय करून घेण्यात कारावासातील साथी आचार्य नरेन्द्र देव यांचे जे साहाय्य झाले त्याचा शंकररावांनी आदरपूर्वक निर्देश केला आहे.

शंकररावांचे जीवन राजकीय कार्यात मुख्यतः व्यतीत होत आले तरी चिंतन-मनन-वाचन व निरनिराळ्या विचारवंतांचे सत्संग यामुळे त्यांच्या जीवनाला वैचारिक सखोलता

प्राप्त झाली होती. कारावासातून बाहेर पडल्यावर पुन्हा विचारांनी ताजेतवाने होऊन पूर्वीच्याच जोराने ते कामाला लागत. गांधींचा खादी, जातीजातीमधील ऐक्य, शिक्षण, व इतर सर्वोदयवादी कार्यक्रम पार पाडण्याकरिता महाराष्ट्रात ठिकठिकाणी त्यांचे संघटित प्रयत्न चालूच असत. त्याचबरोबर समाजामध्ये वैचारिक जागृती व्हावी, उत्तमोत्तम विचार समाजाच्या सर्व स्तरापर्यंत जाऊन पोहोचावेत म्हणून त्यांनी काही वाङ्मयविषयक संघटना सुरू केल्या. 'सुलभराष्ट्रीय ग्रंथमाला' काढून, त्याला 'सुलभ मुद्रणालया'ची जोड देऊन, तिच्यातर्फे त्यांनी राष्ट्रीय प्रबोधन करणारे, आचार्य जावडेकर यांचा 'आधुनिक भारत,' 'नेहरूंचे आत्मचरित्र' इत्यादी अनेक महत्त्वाचे ग्रंथ प्रकाशित केले. आधी 'स्वराज्य' व नंतर 'लोकशक्ति' हे दैनिक यांचे त्यांनी बरीच वर्षे संचालन केले. आचार्य जावडेकरांच्या संपादकत्वाखाली चाललेल्या या दैनिकांत तेही लिहीत असत. १९४७ साली भारत स्वतंत्र झाला. हा काळ भारतीय विचारप्रबोधनाला अत्यंत अनुकूल आहे असे त्यांना व त्यांच्या विचारवंत मित्रांना वाटले. १९२० सालापासून गांधीजींनी चालू केलेल्या स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेणारे नागपूरचे एक तळमळीचे कार्यकर्ते विचारवंत कै. हरि कृष्ण मोहनी (हे मोहनी गांधीजींच्या दांडीयात्रेतील एक यात्रिक निवडले गेले होते, यावरून त्यांच्या स्वातंत्र्यसंग्रामातील श्रेष्ठ कार्याची कल्पना येईल.) शंकरराव देवांचे मोठे चहाते व घनिष्ठ स्नेही होते. स्वातंत्र्यचळवळीबरोबर महाराष्ट्रात वैचारिक प्रबोधनही व्हावे अशी मोहनींची तळमळ असून त्यांनी 'तेजस्वी शिक्षण', 'खादीमीमांसा' इत्यादी पुस्तके लिहिली होती. स्वातंत्र्योत्तर काळात मोहनींनी, शंकरराव देवांजवळ विचारवंतांना एकत्र आणून त्यांच्या लेखद्वारा समाजप्रबोधन साधण्याचा प्रयत्न करण्याकरिता एक उच्च प्रतीचे मासिक सुरू करावे, असे आपले मनोगत प्रकट केले. शंकररावांना मोहनींचे म्हणणे पटले व त्यांनी आपल्या नेहमीच्या धडाडीने एक मासिक सुरू करावयाचा चंग बांधला. त्याप्रमाणे त्यांचे परममित्र आचार्य जावडेकर व आचार्य भागवत यांच्याशी विचार-विनिमय करून एक 'नवभारत' मासिक विषयक संघटना तयार केली. आचार्य जावडेकर, आचार्य भागवत व हरि कृष्ण मोहनी यांचे संपादक-मंडळ बनवून त्यांनी 'नवभारत' मासिक १९४७ च्या २ ऑक्टोबरपासून चालू केले. प्रस्तुत लेखकाला या 'नवभारता'च्या संपादकमंडळात कार्यकारी संपादक म्हणून आरंभापासून कार्य करण्याची भाग्यशाली संधी मिळाली व त्यामुळे शंकरराव देवांना जवळून पाहण्याचा त्याला सुयोग प्राप्त झाला. आपल्या संचालकत्वाखाली 'नवभारत' मासिक काढताना व चालविताना शंकर-रावांनी जे असांप्रदायिक धोरण ठेवले, ते त्यांच्या वैचारिक महत्तेचे द्योतक होते. 'नवभारता'त लेख लिहिण्याकरिता सर्व प्रकारच्या विचारवंतांना—समाजवादी, साम्यवादी, उदारमतवादी, गांधीवादी, राष्ट्रवादी इत्यादी विविध प्रवृत्तींच्या अभ्यासू लेखकांना—त्यांनी आवाहन केले. त्यामुळे 'नवभारत' मासिक समाजप्रबोधनाचे एक 'असांप्रदायिक वैचारिक मुक्त व्यासपीठ' बनले. दि. के. बेडेकर, गं. बा. सरदार,

त.ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, गोवर्धन पारीख, अ. रा. कामत, पु. ह.(रावसाहेब) पटवर्धन, इत्यादी भिन्नभिन्न विचारवंतांचे सहकार्य जोडून 'नवभारता'ने नियतकालिकसृष्टीत एक अग्रगण्य स्थान अल्पावधीतच मिळविले. शंकररावांच्या संचालकत्वाखाली 'नवभारता'ने १९५६ सालापर्यंत अनेक वैशिष्ट्यपूर्ण भरदार, दर्जेदार विशेषांक काढले. (१९५१ साली पुणे येथे अखिलभारतीय तत्त्वज्ञानपरिषदेच्या अधिवेशनाच्या निमित्ताने) पाश्चात्त्य व पौरस्त्य भिन्नभिन्न तत्त्वज्ञानप्रवाहांचा वेध घेणारा तत्त्वज्ञानविशेषांक, आचार्य जावडेकर विशेषांक, लोकशाही विशेषांक, मानवेन्द्रनाथ रॉय विशेषांक इत्यादी विशेषांकांची उदाहरणे देता येतील. आंतरभारतीचे एक कार्य म्हणून सुप्रसिद्ध कन्नड नाटककार कैलासन् यांच्या एका नाटकाचा के. नारायण काळे यांनी केलेला अनुवाद एका विशेषांकाच्या द्वारे 'नवभारत'ने सादर केला. १९५५ साली शंकररावांच्या षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त 'नवभारता'चा एक विशेषांक त्यांचे विविध क्षेत्रांतील कार्य व त्यांचे व्यक्तिमत्त्व यांचे आलोचन करणारा काढावा असे संपादकमंडळाच्या मनात होते. पण शंकररावांनी त्यांच्या ध्येयवादी, व्यक्तिनिरपेक्ष, निःस्वार्थी वृत्तीनुसार असा त्यांच्यावर विशेषांक काढणे पसंत नव्हते. त्यांनीच त्या वेळी जोरात असलेल्या 'भूदान–आंदोलना'वर 'नवभारता'ने विशेषांक काढावा असे सुचविले. त्यांच्या सूचनेनुसार १९५५ फेब्रुवारीचा 'नवभारता'-चा 'भूदान-विशेषांक' निघाला. शंकररावांनी त्या वेळी भूदानकार्याला संपूर्ण वाहून घेतले होते. 'नवभारता'ने काढलेल्या 'भूदान-विशेषांका'त 'नवभारता'च्या धोरणानुसार 'भूदान-आंदोलना'चे व त्याच्या फलनिष्पत्तीचे सडेतोड, आकडेवारीने युक्त असे वर्णन व वस्तुनिष्ठ मूल्यमापन करण्याचा प्रयत्न आढळून येईल.—'नवभारता'त शंकररावांनी तत्कालीन समस्या व त्यांचे आवडते विषय गीता व श्रीअरविंद, गांधी यांचे विचार इत्यादीसंबंधी विचारप्रवर्तक लेख अनेक लिहिले आहेत. ते लेख एकत्र करून छापल्यास त्यांचा एक मोठाचा भरदार लेखसंग्रह होईल यात शंका नाही. शंकरराव सन १९५५ पर्यंत 'नवभारता'चे संचालक होते. संचालक म्हणून 'नवभारता'ची संपूर्ण आर्थिक जबाबदारी त्यांनी वाहिली. या आर्थिक जबाबदारीत कार्यालय, छपाई वगैरेंचा खर्च याबरोबर लेखकांना अल्प मानधन देण्याचाही अन्तर्भाव होता. 'नवभारत' आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होऊ शकले नाही. १९५५ नंतर शंकररावांना 'नवभारता'च्या आर्थिक तुटीची जबाबदारी पेलणे शक्य झाले नाही. १९५६ सालापासून 'नवभारता'च्या संचालकत्वाची धुरा तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी अध्यक्ष असलेल्या वाई येथील प्राज्ञपाठ-शाळामंडळाने उदार मनाने उचलली. 'नवभारत' प्राज्ञशालामंडळाच्या संचालकत्वाखाली आजही चालू आहे. 'नवभारता'च्या संचालकत्वाची धुरा पतकरण्यात त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी विचार व ज्ञानप्रसार यांबद्दलची आपली अभिजात अभिरुची व उत्कट आस्था प्रकट केली याबद्दल ते व त्यांचे प्राज्ञपाठशालामंडल धन्यवादास पात्र आहेत यात शंका नाही. पण त्याचबरोबर शंकररावांच्या संचालकत्वाची ही धुरा अंगीकारण्याइतकी मोलाची

आहे असे शास्त्रीजींना वाटले यात शंकररावांच्या कार्याचे चीज झाले व आपण १९४७ साली लावलेला ज्ञानदीप अजूनही शास्त्रीजी व त्यांचे सहकारी यांनी तेवत ठेविला आहे याचे शंकररावांना समाधान वाटले असेल.

' नवभारत ' काढण्यामागे समाजातील विचारवंतांत विचारांचे आदान-प्रदान होऊन समाजाचे प्रबोधन व्हावे हा शंकररावांचा हेतू होता. राजकारण, सर्वोदयकार्य, भूदान इत्यादी कार्ये करीत असतानाही शंकररावांना ज्ञानक्षेत्रातील नवनव्या विचारांचे मनापासून आकर्षण होते व या आकर्षणामुळे निरनिराळ्या विचारसरणीच्या विचारवंतांची व कार्यकर्त्यांची वेळोवेळी संमेलने ते बडवून आणीत असत. कोल्हापूरचे दानशूर कै. प्रभाकरपंत कोरगावकर यांनी द्रव्यनिधीचे दान करून एक विश्वस्तसंस्था स्थापन केली होती. त्या विश्वस्तसंस्थेचे शंकरराव अध्यक्ष होते. या संस्थेतर्फे शंकररावांच्या अध्यक्षतेखाली अनेक संमेलने भरली व विविध विचार-कार्यक्षेत्रातील विचारवंतांच्या व कार्यकर्त्यांच्या देशापुढील प्रचलित समस्यांवर मोकळ्या चर्चा होत असत. या चर्चांतून शंकररावांची विचाराबद्दलची आस्था, असांप्रदायिकता व वृत्तीचे औदार्य व विचारवंतांविषयी सौहार्द उठून दिसत असे.

शंकरराव १९५६ सालानंतर राजकारणातून निवृत्त झाले असले तरी भूदानकार्य व सर्वोदयी सर्वसेवासंघाचे कार्य याबद्दल त्यांना उत्कट तळमळ होती व गांधीजींच्या अहिंसा, सत्याग्रह आदी तत्त्वांचा अधिकाधिक विकसित स्वरूपात सामाजिक प्रबोधनाकरिता व समाजापुढील समस्या सोडविण्याकरिता कसा उपयोग व प्रसार करावा याबद्दल त्यांचे विनोबा, भाऊ धर्माधिकारी इत्यादी श्रेष्ठ विचारवंतांशी विचारविनिमय व विचारमन्थन सदैव चालू असे. याच विचारमन्थनातून, त्यांच्या गांधीवादी आध्यात्मिक व्यक्तिमत्त्वाचा त्यांच्या जीवनातील अत्यंत भव्य व उत्तुंग असा आविष्कार १९६३ साली प्रकट झाला. १९६३ साली चिनी सरकारने अकल्पितपणे भारताच्या ईशान्य सीमेवर आक्रमण केले! 'हिन्दी चिनी भाई भाई ', ' पंचशील ' या घोषणांना मूठमाती मिळाली. पं. जवाहरलाल नेहरू व भारतीय जनता या विश्वासघाती आकस्मिक आक्रमणाने हादरून गेली ! या अकल्पित चिनी आक्रमणाला भारत-सरकार लष्करी दृष्ट्या तोंड देत होतेच. भारतराष्ट्रावर कोसळलेल्या या अकल्पित प्रसंगी, सर्वोदयी सर्वसेवासंघाचे प्रमुख कार्यकर्ते शंकरराव यांच्या मनात आले की आपण काही सर्वोदयी कार्यकर्त्यांना बरोबर घेऊन ' मैत्री-यात्रा ' काढावी, व पदयात्रा करीत ईशान्य सरहद्द ओलांडून चीनमध्ये प्रवेश करावा. या मैत्री यात्रेचा उद्देश असा होता : सुमारे दीड हजार वर्षांपूर्वी भारतात जन्मलेल्या भगवान बुद्धाने करुणा, मैत्री या गुणांनी प्रेरित झालेल्या मानवतेच्या संदेशाने चिनी जनमानसाची जी विलक्षण पकड घेतली होती तिचा आधार घेऊन हल्लीच्या चिनी जनतेशी सौहार्द जोडावे, मैत्री करावी व अशा रीतीने त्याच्या बळावर चिनी जनतेत मैत्रीचे आंदोलन उठवून, चिनी सरकारला आपले आक्रमण मागे घ्यावयास लावावे व आम्ही

भारतीय केवळ चिनी जनतेचेच मित्र नसून सगळया जगातील लोकांचे आम्ही मित्र आहोत असे हे ' मैत्री-यात्रे 'चे ध्येय होते. शंकररावांना युरोप-अमेरिकेतील काही नागरिक या त्यांच्या कार्यात सहकारी मिळाले. शंकरराव व इतर सुमारे १५ यात्रिक मैत्री-यात्रेकरिता दिल्लीहून पदयात्रा करीत गावोगाव आपल्या ' मैत्री ' उद्दिष्टाचा प्रचार करीत भारताच्या ईशान्य सरहद्दीपर्यंत जाऊन पोहोचले. पण पाकिस्तान व ब्रह्मदेश सरकारने त्यांची पद-यात्रा बंद केली ! व काही महिन्यांतच मैत्रीयात्रिकांचे मनोरथ मुळाशीच खुडले गेले ! शंकररावांचे मैत्रीयात्रेचे स्वप्न वास्तविक परिस्थितीमुळे विरून गेले असले, तरी त्यामागे त्यांचे केवढे भव्य, उत्तुंग, आध्यात्मिक असामान्य, व्यक्तिमत्त्व उभे आहे, गांधीवादातील अहिंसा, सत्याग्रह आदी तत्त्वांना राष्ट्राराष्ट्रातील व्यवहारापर्यंत परमोच्च स्थान देण्याचा केवढा भव्य प्रयत्न आहे याची प्रतीती येऊन आपली बुद्धी स्तिमित होते. स्वतः महात्मा गांधींनीसुद्धा अशा प्रकारच्या उपक्रमाला हात घातला असता की नाही याची शंका येते. पुढे ऐन दुसऱ्या महायुद्धाच्या काळात गांधींनी त्या वेळच्या व्हॉईसरायला असेंही कळविले होते की 'तुम्ही मला जाऊ देत असल्यास मी हिटलरसमोर अहिंसक सत्याग्रही म्हणून जावयास तयार आहे ! ' पण व्हाइसरायने त्याला अनुमती दिली नाही. दुसऱ्या महायुद्धात गांधींनी हिटलरला उद्देशून त्याचे मानव्य जागृत करण्याच्या उद्देशाने ' हरिजना 'त एक पत्र लिहिले होते. पण गांधींची झेप त्या पत्राबरोबरच थांबली. ' जय जगत 'चा मंत्र देणारे विनोबा यांनी या मैत्रीयात्रेला आशीर्वाद दिला असला तरी ते स्वतः या मैत्रीयात्रेत सामील होऊ शकले नाहीत. ह्या ' मैत्रीयात्रे 'निमित्त दिल्लीपासून आसामपर्यंत पदयात्रा करीत असताना ठिकठिकाणी शंकररावांनी आपल्या मैत्रीयात्रेमागील भूमिका विशद करणारी हिंदीतून प्रवचने दिली. ती 'मेरी जीवनयात्रा : मैत्रीयात्रा ' (सर्वसेवासंघ प्रकाशन, राजघाट, वाराणशी) (१९६३) या पुस्तकात प्रसिद्ध झाली आहेत. त्यातल्या काही प्रवचनांच्या नावावरूनच शंकररावांची केवढी उन्नत भूमिका आहे याची कल्पना येते. उदाहरणार्थ 'परस्परं बोधयन्तः' 'श्रेयः परमवाप्स्यथ', 'यत्र विश्वं भवत्येकनीडम्', 'युद्धका विकल्प : मैत्री', 'अहिंसा का नया आयाम मैत्री'.—शंकररावांची ही प्रवचने वाचताना ते किती निर्भय, निरहंकारी, वैश्विक भूमिकेवरून विचार करीत आहेत हे प्रत्ययास येते. विश्वातील मानव सर्व एक आहेत, त्यांच्यात सामंजस्य, सुसंवाद, मैत्री, प्रेम यांनाच स्थान आहे, असे प्रतिपादन करताना ते तन्मय झालेले दिसतात. उपनिषदे, बुद्ध यांच्या शिकवणीबरोबर ते आधुनिक वैज्ञानिकांचेही म्हणणे व अनेक युक्तिवाद आपल्या प्रतिपादनाच्या समर्थनार्थ मांडतात ( मराठी अनुवाद : ) " आइन्स्टाईन एक महान ऋषि होत. त्यांनी मृत्यूपूर्वी असें सांगितलें कीं मीं सर्वसंहारक अणुशक्ति शोधून काढली खरी पण तिच्यामागें कोणीं जाऊं नये. ज्यानें अहिंसा, प्रेम यांची शक्ति निदर्शनास आणली त्या गांधींच्या मार्गानें जा. " पृ. ३३ ) " अणुबॉंबचा जन्म १९४५ मध्यें झाला. पण त्याहिपूर्वी ३७ वर्षें एक अणुबॉंब जन्माला आला होता. प्रेम व करुणा यांच्या द्वारे

मानवांना परस्पर जोडणाऱ्या गांधींच्या सत्याग्रहप्रयोगाचा आविर्भाव दक्षिण आफ्रिकेत १९०८ सालीं झाला ! " ( पृ. ३३ ) "बुद्धानें ज्याचा प्रारंभ केला त्याचा पुढचा विकास गांधीजींनीं केला असें आल्बर्ट श्वाइट्झर ( नोबेल पारितोषिक-विजेता ) यानें म्हटलें आहे. " (पृ. ४१) "आपली जनता असें मानते कीं आपले भाग्यविधाता सरकार आहे. पण असें मानणें चूक होय. खरोखरी लोक किंवा जनता जागृत होऊन लोकनीति किंवा खरें लोकशासन स्थापन झालें पाहिजे. असें खरें लोकशासन प्रस्थापित झालें तर विश्व-शांतीची आशा करतां येईल." ( पृ. ४५ ) " स्नेह व अहिंसा यांचा शोध हें सरकार करूं शकणार नाहीं. तो शोध करून अमलांत आणणें जनताच करूं शकेल " (पृ. ६४) " आजचा संन्यासी असा पाहिजे कीं, ज्याचें निष्काम फलाशाविरहित कर्म मानव-जीवनाच्या प्रत्येक अंगावर परिणाम घडवून आणूं शकेल " (पृ. ६५) "आज कोणत्याहि राष्ट्राची कोणत्याहि प्रकारची संपत्ति–मग ती भौतिक असो वा आध्यात्मिक असो–ती फक्त त्या राष्ट्राचीच नाही; सर्वांचीच ती आहे. बुद्ध व महावीर जितके आम्हा भारतीयांचे तितकेच ते सर्व जगाचे आहेत. " (पृ. ८२) " याबाबतींत विनोबांशीं माझें बोलणें झालें, व माझा विचार पक्का झाला. भारत–चीन संघर्ष जर नाहींसा करावयाचा असेल तर— आधीं त्या संघर्षाच्या भूमिकेवरून त्या वरच्या अहिंसेच्या उच्च स्तरावर गेलें पाहिजे. " ( पृष्ठ ८७ ).

शंकररावांच्या 'मैत्रीयात्रे'च्या उपक्रमात त्यांची जी उत्कट विश्वात्मैक्याची प्रेरणा दिसून आली, तिचे मोठेमोठे विचारशील गांधीवादी केदारनाथजी, दादा धर्माधिकारी यांनी सविस्मय कौतुक केले. केदारनाथजी आज नव्वद वर्षांचे आहेत. त्यांनी शंकररावांना मैत्रीयात्रेच्या वेळी जे पत्र लिहिले, त्यात 'तुमच्यासारखा ध्येयनिष्ठ, त्यागी, खऱ्या आध्यात्मिक प्रेरणेने समाजाशी एकरूप होण्याचा प्रयत्न करणारा माझ्या पाहण्यात नाही व पुढेही होईल असे मला वाटत नाही ' अशा अर्थी लिहिले आहे. शंकररावांना आपण केवढी उत्तुंग झेप घेत आहोत याची कल्पना होती. त्यांनी केदारनाथजींना पाठविलेल्या उत्तरात म्हटले आहे : "माझे संकल्प महान्, पण शक्ति अत्यल्प हीच माझ्या जीवनाची शोकांतिका आहे. "

'मैत्रीयात्रे'हून शंकरराव परतले, तेव्हा त्यांची प्रकृती खूप ढासळली होती. पदयात्रेचा शीण, महान आकांक्षांचा मनावर ताण यामुळे त्यांना शारीरिक क्षीणता खूप आली. तेव्हापासून त्यांची प्रकृती पूर्वीसारखी राहिली नाही. १/२ वर्षे तर अत्यंत शारीरिक-मानसिक क्षीणतेत गेली. या अवस्थेत त्यांना भेटायला गेलेल्यांना ते अत्यंत विषण्ण, शून्य-दृष्टी, विमनस्क, जणू संवदेनाशून्य बसलेले दिसायचे. जणू डोक्याकडे जाणारे मज्जातंतू काम करीनासे झाले होते. परंतु दोन-तीन वर्षांच्या काळात औषधोपचाराने व त्यांच्यातील दांडग्या संकल्पशक्तीने ते बरे झाले व हिंडूफिरू लागले. प्रकृतीत थोडा जोम आल्यावर त्यांच्या अंतःप्रेरणा पुन्हा प्रबळपणे काम करू लागल्या. समाजप्रबोधन घडून आले

अनुक्रमणिका

पाहिजे या तळमळीने त्यांच्या पुढाकाराने ' समाजप्रबोधन ' नावाची संस्था पुणे येथे सुमारे १५ वर्षांपूर्वी स्थापन झाली. या समाजप्रबोधनसंस्थेत काम करायला वसंत पळशीकर, ग. प्र. प्रधान, दे. अ. दाभोलकर, भा. शं. भणगे, पन्नालाल सुराणा, मे. पुं. रेगे असे नवीन दमाचे विद्वान कार्यकर्ते मिळाले. 'समाजप्रबोधनसंस्थे'ने भा. शं. भणगे यांच्या संपादकत्वाखाली ' समाजप्रबोधन ' नावाचे अत्यंत विचारप्रवर्तक व आधुनिक समस्यांचा ज्ञानविज्ञानपूर्वक वेध घेणारे मासिक चालविले आहे. १९७३ मध्ये शंकरराव देवांच्या ७८ व्या वाढदिवशी समाजप्रबोधनसंस्थेच्या कार्यकर्त्यांनी ' भारतीय प्रबोधन ' या नावाचा अनेक नामवंत विचारवंतांचे लेख असलेला अभिनंदनग्रंथ शंकररावांना सासवडच्या त्यांच्या राहत्या आश्रमात जाऊन अर्पण केला.

गेल्या ५।६ वर्षांत शंकररावांची प्रकृती मधून मधून बिघडत असे. मधल्या, बरी प्रकृती असतानाच्या अवस्थेच्या काळात त्यांच्यातील अंतःप्रेरणा पुन्हा चैतन्यशाली बनली व त्यांनी गांधीजींचे ( गांधीजींच्याच शब्दात ) ' बृहत् आत्मचरित्र ' त्यांचे सहकारी भाऊ धर्माधिकारी यांच्या सहकार्याने तयार करून १९७० साली त्याचा पहिला खंड प्रसिद्ध केला. या गांधीजींच्या ' बृहत् आत्मचरित्रा 'ला त्यांनी जी प्रस्तावना लिहिली आहे तिला ' ऋणनिर्देश ' असे नाव आहे. त्यात त्यांच्या जीवनातील प्रमुख प्रेरणांचे दर्शन स्वतःच त्यांनी करून दिले आहे : " गांधीजींचे माझ्यावर मोठे ऋण आहे. ते ऋण फेडावयाचे तर त्यांचा सामान्य माणसापुढे संदेश ठेवला पाहिजे. तो संदेश हा की, श्रद्धा व चिकाटी असेल तर सामान्य माणसालासुद्धा सिद्ध करता येणार नाही असा एकही पुरुषार्थ नाही. गांधीजींचा विशेष हा की ते जीवनाला सदा सन्मुख राहिले. " प्रसिद्ध इतिहासकार टॉयनबी व नोबेल पारितोषिकविजेता आल्बर्ट श्वाइट्झर यांचे उतारे देऊन गांधीजींचे मोठेपण आधुनिक थोर विचारवंतांनाही कसे मान्य आहे हे शंकररावांनी साधार दाखविले आहे : ' राजकारणातच साधुत्वाची खरीखुरी कसोटी होय. '–टॉयनबी. ' भगवान बुद्धांनी ज्याचा प्रारंभ केला तेच गांधीजींनी पुढे चालविले '–श्वाइट्झर. 'टिळकांचे शठंप्रति शाठ्यं' (' ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ') असे धोरण होते. याउलट ' अक्रोधेन जयेत् क्रोधं असाधुना साधुना जयेत् ' अशी गांधीजींची भूमिका होती. या दोन भूमिकांचा विचार करून शंकररावांनी म्हटले आहे: " हे जग साधूंच्याकरिता नाही असे समजणे जडतेचे लक्षण आहे. सर्व धर्मांचे सार पुरुषार्थांना प्रेरणा देणे हे आहे. पुरुषार्थ म्हणजे साधू होण्याचा जिवापाड प्रयत्न करणे. सारे वैयक्तिक जीवन सामाजिक जीवनाची प्रयोगशाळा होय. "

शंकररावांनी आपले ' आत्मचरित्र ' व ' संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ' हे दोन ग्रंथ गेल्या दोन-तीन वर्षांपासून लिहायला घेतले होते. पण ते त्यांच्या हातून वाढत्या प्रकृतिक्षीणतेमुळे पुरे होऊ शकले नाहीत.—दोन्हीही ग्रंथ हस्तलिखित अवस्थेत अपूर्ण असे पडून आहेत. (पृ. ११० पाहा)

# परिषद वार्ता

## सुवर्ण महोत्सवी मराठी साहित्य संमेलन इचलकरंजी

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे सुवर्ण महोत्सवी अधिवेशन महाराष्ट्र साहित्य परिषदेने भरविण्यास मराठी साहित्य महामंडळाने अनुमती दिल्यानंतर इचलकरंजीच्या उत्साही कार्यकर्त्यांनी इचलकरंजीस रौप्य-महोत्सवी संमेलन भरवावे अशी आग्रहाची मागणी केली. इचलकरंजीकर कार्यकर्त्यांची जिद्द व धडाडी पाहून परिषदेने इचलकरंजीस संमेलन भरविण्यास आनंदाने संमती दिली. श्री. वसंतराव दातार, श्री. सदाशिवराव सुल्तानपुरे, डॉ. मर्दा इत्यादि प्रमुख कार्यकर्त्यांनी अस्थायी समिती स्थापन करून कामास सुरवात केली व अत्यंत अल्पावधीत सुसूत्रपणे विविध समित्या स्थापन करून संमेलनाच्या यशाची मुहूर्त-मेढ रोविली. महामंडळाकडून श्री. पु. ल. देशपांडे यांच्या एकट्याच्याच नावाची शिफारस इचलकरंजी संमेलनाच्या कार्यकारी मंडळाकडे झाली व संमेलन-कार्यकारिणीने आपल्या बैठकीत श्री. पु. ल. देशपांडे यांचे संमेलनाध्यक्ष म्हणून नाव कायम केले; व त्याचबरोबर श्री. रणजित देसाई यांची स्वागताध्यक्ष म्हणून निवड केली. येथूनच इचलकरंजीकरांच्या उत्साहास भरती येऊ लागली. श्री. पु. लं. सारखे मराठीतील सर्वप्रिय व सिद्धहस्त साहित्यिक व श्री. रणजित देसाई यांच्यासारखे स्वागताध्यक्ष संमेलनास लाभल्याचे निश्चित झाल्याने कार्यकर्त्यांत उत्साहाचे वारे संचरले. संमेलनाच्या कार्यकारिणीच्या सतत बैठका भरून, संमेलनाच्या विविध समित्या स्थापून कामास वेगाने प्रारंभ झाला. महामंडळाच्या घटकसंस्थांच्या सर्व सदस्यांना निमंत्रणे पाठविण्याचा विक्रम यंदा करण्यात आला. संमेलनाची हजारो निमंत्रणे साहित्य परिषदांच्या सर्वच सदस्यांना खास पाठविण्यात आली होती. आमंत्रणाची ही नवी पद्धत अत्यंत उपकारक ठरली. परिषदेचे कार्यवाह श्री. रा. ज. देशमुख, श्री. वासू देशपांडे व कार्याध्यक्ष. डॉ. भीमराव कुलकर्णी, कोषाध्यक्ष श्री. मधुकाका कुलकर्णी यांनी वारंवार इचलकरंजीस जाऊन संमेलनाच्या कार्यक्रमाबाबत व एकूण व्यवस्थेबाबत सल्ला दिला. परिषदेचे कार्यवाह श्री. रा. ज. देशमुख हे तर जवळजवळ एक महिना इचलकरंजीसच

राहिले होते. व एकाद्या मोठ्या सल्ल्यापासून बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष देऊन अखंड काम करीत होते. श्री. अनंतराव भिडे, श्री. गजाननराव कांबळे व्यवस्थेत गर्क होते. श्री. वसंतराव दातार आणि स्वागत समितीचे अनेक सभासद अहोरात्र परिश्रम करीत होते याची जाणीव उपस्थितांना होत होती.

५० वे संमेलन असल्याने ते तेवढ्याच थाटामाटाने व संस्मरणीय व्हावे म्हणून संमेलन-कार्यकारिणीने व अनेक कार्यकर्त्यांनी जवळजवळ शेवटचा महिना दीड महिना अहोरात्र राबून सर्व व्यवस्था केली. ठिकठिकाणाहून सभासदांची नोंदणी मोठ्या प्रमाणावर होऊ लागली व सभासद नोंदणीवरून संमेलनास अभूतपूर्व स्वरूप येणार याची आधीच कल्पना संमेलन-कार्यकारिणीस आली व त्या दृष्टीने व्यवस्था करण्यात इचलकरंजीकर मंडळी दंग झाली.

संमेलन दि. २६ डिसेंबर १९७४ पासून सुरू होणार होते. दि. २५ डिसेंबरलाच अनेक मंडळी इचलकरंजीस येऊन पोचली. दि. २६ डिसेंबर रोजी सकाळीच हातकणंगले स्टेशनवर अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे यांचे आगमन होताच त्यांचा कार्यकारी मंडळातर्फे व अनेक संस्थांतर्फे सत्कार करण्यात आला.

गोविंदराव हायस्कूलच्या प्रांगणात अतिभव्य सुशोभित असा मंडप उभारला होता. संमेलनास उपस्थित राहण्यासाठी एकसारखी प्रतिनिधींची भर पडत होती. कार्यकर्ते सर्वांची सोय व्यवस्थित करण्यात अखंड व्यग्र होते.

दि. २६ डिसेंबर रोजी सायंकाळी ४॥ वाजता तुडुंब भरलेल्या भव्य मंडपात संमेलनास महाराष्ट्रगीताने सुरवात झाली. शारदास्तवन, शाहिरीमुजरा व सरस्वतीपूजन झाल्यावर संमेलनाचे कार्याध्यक्ष श्री. वसंतराव दातार यांनी अत्यंत थोडक्यात परंतु खुसखुशीत भाषेत 'होऊ द्या रंगांची बरसात' असे म्हणून आपले प्रास्ताविक सादर केले. महामंडळाचे अध्यक्ष श्री. आ. रा. देशपांडे यांच्या भाषणानंतर स्वागताध्यक्ष श्री. रणजित देसाई यांनी आपले स्वागताध्यक्षांचे भाषण सादर केले. रणजित देसाई यांच्या स्वागताच्या भाषणास श्रोत्यांनी उत्स्फूर्त दाद देऊन संमेलनाच्या चढत जाणाऱ्या कार्यक्रमाची जणू नांदीच केली. त्यानंतर श्री. वि. स. खांडेकर यांनी आपल्या खणखणीत वाणीने या संमेलनाचे उद्घाटन करणारे भाषण करून उत्कंठित श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले. हारसमर्पण कार्यक्रमास नगराध्यक्ष श्री. पंडितराव कुलकर्णी यांनी सुरवात करून विविध संस्थांतर्फे अध्यक्षांना हार-गुच्छ अर्पण करण्यात आले. श्री. ना. म. वाटवे यांनी संदेशवाचन केले. सुवर्णमहोत्सवी संमेलनाच्या निमित्ताने 'ऐसी अक्षरे' ही खास स्मरणिका तयार करण्यात आली होती. ही स्मरणिका सिद्ध करण्यासाठी संपादक डॉ. भालचन्द्र फडके व श्री. ह. नी. केळकर व कल्पना मुद्रणालयाचे श्री. चिंतामणराव लाटकर यांनी सतत परिश्रम केले. शेवटच्या बारा तासात आलेल्या जाहिराती समाविष्ट करून श्री. लाटकरांनी विक्रमच केला. अतिशय सुबक, व मोहक छपाई हे या स्मरणिकेचे वैशिष्ट्य होते. शिवाय पु. ल. विषयक लेख, सर्व संमेलनाध्यक्षांची छाया-

चित्रे, संमेलनाध्यक्षांनी मांडलेल्या विचारांचे संकलन इ. मुळे ' स्मरणिके 'ला संग्राह्य स्वरूप प्राप्त झाले. स्मरणिका व इतर ग्रंथांचे प्रकाशन मा. अध्यक्षांचे हस्ते करण्यात आले व नंतर ज्याकडे साऱ्या सभा मंडपाचे लक्ष लागले होते ते अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे आपल्या भाषणास उठून उभे राहिले. आधी तयार केलेले भाषण श्री. पु. ल. देशपांडे यांनी वाचावयास सुरवात केली. आणि जसजसे ते बोलू लागले तसतशी हास्याची कारंजी मंडपात उडू लागली. दीड तास चाललेले श्री. पु. लंचे भाषण केव्हा संपले हे श्रोत्यांना समजले नाही, इतके श्रोते भाषणात रंगून गेले होते. भाषण संपले आणि टाळ्यांचा कडकडाट झाला. पसायदान होऊन पहिल्या दिवसाचा कार्यक्रम संपला.

रात्री मुंबई मराठी साहित्य संघाचे ' अजब न्याय वर्तुळाचा ' हे गाजलेले नाटक सादर करण्यात आले.

दि. २७ पासून संमेलनाच्या भरगच्च कार्यक्रमास खरीखुरी सुरुवात झाली. सकाळी ९ वाजता संमेलन मंडपात '**ललित साहित्य आणि सामाजिक जाणिवा**' या विषयावर श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. प्रा. गंगाधर पानतावणे, प्रा. ल. रा. नसिराबादकर, प्रा. सरोजिनी वैद्य व प्रख्यात गुजराथी साहित्यिक श्री. गुलाबदास ब्रोकर यांनी या परिसंवादात भाग घेतला.

त्यानंतर आयोजित केलेल्या गटवार चर्चांना आरंभ झाला. पहिली चर्चा ' स्त्रिया आणि विनोद ' या विषयावर झाली. प्रा. गंगाधर गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली चर्चेस सुरुवात झाली. या चर्चेत प्रा. अनंत काणेकर, श्री. पु. ल, देशपांडे, डॉ. स. गं. मालशे, सौ. शकुंतला फडणीस, सौ. अंबाडे, सौ. कुलकर्णी, सौ. गडकर व प्रा. सौ. मनीषा दीक्षित यांनी भाग घेतला.

नंतर दुपारी २॥ वाजता संमेलनात नेहमीच यशस्वी होणाऱ्या कविसंमेलनास श्री. बा. भ. बोरकर यांचे अध्यक्षतेखाली सुरुवात झाली. सर्वश्री पु. ल. देशपांडे, यांनी सुरुवातीस कै. साने गुरुजी यांची कविता म्हणून दाखविली व नंतर प्रा. विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर, वसंत बापट, प्रा. रा. श्री. जोग, सौ. इंदिरा संत, प्रा. देविदास सोटे, ना. धों. महानोर, राम गोसावी यांनी आपल्या कविता म्हणून दाखविल्या.

संमेलनाने खास आयोजित केलेला परप्रांतीय साहित्यिक व माजी संमेलनाध्यक्ष यांच्या सत्काराचा कार्यक्रम होय. दुपारी ५ वाजता या कार्यक्रमास सुरवात झाली. संमेलनास उपस्थित असलेले अनेक माजी अध्यक्ष डॉ. द. वा. पोतदार, डॉ. वि. भि. कोलते, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. वि. द. घाटे, प्रा. रा. श्री. जोग, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. आ. रा. देशपांडे, प्रा. अनन्त काणेकर, वि. वा. शिरवाडकर व त्यांचा श्री. पु. ल. देशपांडे यांनी करून दिलेला प्रत्येकाचा परिचय ऐकून व मराठी सारस्वताच्या या मानकऱ्यांना प्रत्यक्ष समोर पाहून श्रोत्यांचे भान हरपून गेले. हा दुर्लभ प्रसंग प्रत्येकाने आपल्या अंतःकरणात कोरून ठेवला. परप्रांतीय साहित्यिकांचा सत्कारही असाच हृद्य झाला. गुजराथी

लेखक श्री. गुलाब दास ब्रोकर व नामवंत सिंधी लेखिका प्रा. पोपटी हिरानंदानी या भाषा-भगिनीय लेखकांचा सत्कार करण्यात आला.

हा कार्यक्रम संपून मंडप थोडा रिता होतो न होतो तोच रात्री होणाऱ्या कुमार गंधर्वांच्या गायनाचे सूर आधीच मंडपात पसरू लागले व मंडप पुन्हा गच्च भरला. कुमारांनी तांबे यांची गीते तसेच नाट्यसंगीत व रागदारी यांनी श्रोत्यांचे कान तृप्त करून सोडले.

दि. २८ डिसेंबर हा संमेलनाचा शेवटचा दिवस. म्हणूनच जणू काय प्रत्येक क्षणाचा कार्यक्रमात समावेश होताच; परंतु एकाच वेळी तीन चार ठिकाणी वेगवेगळ्या कार्यक्रमांची मेजवानी होती. ज्याच्या त्याच्या आवडीनुसार रस चाखावा अशी सोय होती. पण सारेच कार्यक्रम रंजक असल्याने श्रोत्यांची विलक्षण धांदल उडाली. गटवार चर्चा चार ठिकाणी सकाळी ९ ला सुरू झाल्या. गटवार चर्चा पुढीलप्रमाणे झाल्या. ( १ ) ज्ञानेश्वरचरित्र-विषयक काही प्रश्न : अध्यक्ष म. म. द. वा. पोतदार, चर्चक डॉ. स. गं. मालशे, प्रा. पां. ना. कुलकर्णी, डॉ. वि. रा. करंदीकर, प्राचार्य अनंतराव आठवले, डॉ. वसंत जोशी, व इचलकरंजीचे संतवाङ्मयाभ्यासक श्री. नानासाहेब कुलकर्णी

( २ ) दलित साहित्य : अध्यक्ष अनंत काणेकर, चर्चक : प्रा. गंगाधर पानतावणे, डॉ. सं. सा. भोसले, प्रा. सौ. छाया गोडबोले, डॉ. डी. टी. माने, प्रा. रमेश दीक्षित, प्रा. अनिल सोनार, विलास राशिनकर.

( ३ ) मराठीतील प्रकाशक अज्ञानी आहेत काय ? अध्यक्ष : श्री. वि. पु. भागवत, चर्चक श्री. रा. ज. देशमुख, श्री. द. प. जोशी, इ.

( ४ ) आजच्या लेखिका आपल्या ( ! ) आहेत काय ?

अध्यक्ष : सौ. पद्मा गोळे, चर्चक डॉ. अनुराधा पोतदार, प्रा. कु. तारा भवाळकर, प्रा. सौ. मनीषा दीक्षित, इ.

या गटवार चर्चांना सर्वत्र भरपूर उपस्थिती लाभली होती.

गटवार चर्चा संपताच कथाकथनाचा सार्वत्रिक आवडीचा कार्यक्रम सकाळी ११॥ वाजता मुख्य मंडपात सुरू झाला. या कथाकथनाचे अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे होते. कथाकथनात श्री. रणजित देसाई, श्री. व पु. काळे, श्री. व्यंकटेश माडगूळकर, प्रा. गंगाधर गाडगीळ, वसंत सबनीस यांनी आपल्या कथांचे कथन केले, शेवटी श्री. पु. ल. देशपांडे यांनी स्वतःही आपली कथा सांगितली. कथाकथनात रंगलेल्या श्रोत्यांना वेळेचे तर भान नव्हतेच परंतु भोजनाची वेळ टळून चालल्याचे सुद्धा भान नव्हते, एवढा हा कार्यक्रम रंगला होता.

कविसंमेलनाचा आदल्या दिवशीचा अर्धा झालेला कार्यक्रम दुपारी ३ वाजता परत सुरू झाला. सुरवातीला महानुभाव पंथाचे संस्थापक श्री. चक्रधरस्वामी यांना संमेलनाने अभिवादन केले. नव्या जुन्या अनेक कवींनी हजेरी लावून श्रोत्यांकडून दाद घेतली. या संमेलनाचे संयोजक श्री. पु. ल. देशपांडे हे होते.

अनुक्रमणिका

दुपारी ४॥ वाजता इचलकरंजी नगरपालिकेतर्फे संमेलनाध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे यांचा संमेलनमंडपात खास सत्कार समारंभ आयोजित केला होता. तुतारीच्या निनादात या समारंभास सुरुवात झाली. नगराध्यक्ष मा. पंडितराव कुलकर्णी यांनी मानपत्र अर्पण केले व अध्यक्षांचा सत्कार केला. सत्कारास श्री. पु. ल. देशपांडे यांनी उत्तर दिले. श्री. पंडितराव कुलकर्णी यांचे भाषण व उत्तराचे श्री. पु. ल. देशपांडे यांचे या प्रसंगीचे भाषण ऐकल्यानंतर अत्यंत जिव्हाळ्याचा समारंभ कसा असतो याचे प्रत्यंतरच श्रोत्यांना पाहावयास मिळाले.

सत्कार व मानपत्राचा कार्यक्रम संपल्यानंतर ६ वाजता संमेलनाचा शेवटचा समारोपाचा कार्यक्रम सुरू झाला. खुले अधिवेशन प्रथम सुरू झाले. विषयनियामक समितीने मंजूर केलेले ठराव संमेलनापुढे मांडण्यात आले. दिवंगतांना श्रद्धांजली वाहणारा ठराव सर्वप्रथम संमत झाल्यानंतर विविध विषयांवरील महत्त्वाचे असे आठ ठराव एकमताने संमत झाले. महाराष्ट्र शासनाने तसेच विद्यापीठांनी सर्व कारभार मराठीतून करावा अशी विनंती करणारा ठराव; महामंडळ घटक संस्था व विद्यापीठांची मौलिक प्रकाशने व प्रबंध यांच्या वितरणाची सुव्यवस्थित सोय करणे, बेळगावचा व अन्य भाषिक सलग मराठी प्रदेशांचा समावेशही महाराष्ट्रात व्हावा अशी मागणी करणारा ठराव, कोकणी मराठीची बोली असून तिला वेगळी भाषा म्हणून साहित्य अकादमीने मान्यता देण्याचा प्रश्नच उद्भवत नाही अशी ठाम भूमिका घेणारा ठराव, याशिवाय तेलुगु भाषेचे जागतिक संमेलन व विश्व हिंदी संमेलनास शुभचिंतन करणारे ठराव संमत झाले. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या दाते सूचि मंडळातर्फे मराठीतील नियतकालिकांची व नियतकालिकांतील लेखांची सूची सिद्ध करून प्रसिद्ध करण्याचे जे मौलिक कार्य चालू आहे त्याला शासनाने व जनतेने मदत करण्याचे आवाहन एका ठरावावाटे करण्यात आले. यानंतर समारोपाच्या कार्यक्रमास सुरुवात झाली. संमेलन कार्याध्यक्ष श्री. वसंतराव दातार यांनी अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे व स्वागताध्यक्ष श्री रणजित देसाई यांना चांदीच्या समया व महावस्त्रे सत्कारपूर्वक अर्पण केली. खास कोल्हापुरी फेटे अध्यक्ष व स्वागताध्यक्ष यांना देण्यात आले. संमेलनास साहाय्य केलेल्या इतरही व्यक्तींना श्रीगणेशाची सुवर्ण प्रतिमा भेट म्हणून देण्यात आली. महामंडळाचे कार्यवाह डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी संमेलन पार पाडण्यात ज्यांचे ज्यांचे सहाय्य झाले त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानले. श्री. पु. ल. देशपांडे यांनी समारोपाचे भाषण केले. महामंडळाचे कार्यवाह डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी संमेलनाचा सतत तीन दिवस चाललेला आनंद सोहळा आता संपणार याची खंत व्यक्त केली व तशीच जाणीव असंख्य श्रोत्यांना झाली. तीन दिवस चाललेला हा सोहळा रात्री ८॥ वाजता संपला आणि संमेलनाचे सूप वाजले.

रात्री राष्ट्र सेवादलाचे ' शिवदर्शन ' हे नृत्यनाट्य सादर झाले व आलेले प्रतिनिधी मंडपाचे दर्शन मनात साठवून घेऊन जड अंतःकरणाने परतू लागले.

संमेलन पदाधिकारी :– श्री. वसंतराव दातार, कार्याध्यक्ष, डॉ. श्री. प्रे. मर्दा, कार्योपाध्यक्ष, श्री. सदाशिवराव सुलतानपुरे, कार्योपाध्यक्ष, श्री. गोपाळराव कुलकर्णी, कार्योपाध्यक्ष, श्री. मनोहरपंत न. भावे, कोषाध्यक्ष, श्री. प्रताप गाडे कार्यवाह, श्री मोहन उत्तुरकर, कार्यवाह, श्री. विजय रा. जगताप, कार्यवाह, श्री. वि. ना. शेळके कार्यवाह, श्री. ना. म. वाटवे ( प्रमुख कार्यक्रम समिती ) श्री. श्रीकांत रा. भिडे ( प्रमुख करमणूक समिती ) सौ. शशिकला मराठे ( प्रमुख स्टेज व डेकोरेशन ) श्री. ह. नी. केळकर ( प्रमुख स्मरणिका ) श्री. मधुमामा वेंगुर्लेकर ( प्रमुख मंडप व्यवस्था ) श्री. रामराव नकाते ( प्रमुख भोजन समिती ) डॉ. रा. द. कुलकर्णी ( प्रमुख निवास व्यवस्था ), डॉ. शा. कृ. कल्कडकर ( प्रमुख वाहतुक व्यवस्था ), सौ. वानुत्री पठाण ( प्रमुख निधि समिती ), श्री. मल्हारराव वावचकर ( प्रमुख स्वयंसेवक ), श्री. गंगाधर वि. महाजन ( प्रमुख प्रसिद्धी ), श्री. वापूसाहेब मोटे ( प्रमुख आरोग्य ), डॉ. उ. आ. लांडे ( प्रमुख वैद्यकीय मदत ), श्री. वाळ मकवाना ( प्रमुख पत्रकार व प्रसिद्धी ) सौ. दुर्गाताई भिडे ( प्रमुख स्त्री प्रतिनिधी ), श्री. डी. के. कुलकर्णी ( समन्वय समिती ).

संमेलन यशस्वी होण्यास इचलकरंजीच्या लहानथोर कार्यकर्त्यांनी घेतलेले परिश्रम अतुलनीय होते.

## दुखवटा सभा :

वृत्तांताच्या काळात विविध क्षेत्रांतील तीन थोर व्यक्ती काळाच्या पडद्याआड झाल्या खास सभा घेऊन परिषदेने त्यांना श्रद्धांजली अर्पण केली.

दि. ९ जानेवारी १९७५ रोजी कै. शंकरराव देव यांच्या दुखवट्याची सभा श्री. नानासाहेब गोरे याचे अध्यक्षतेखाली झाली. आचार्य वि. प्र. लिमये, डॉ. व्यंकटेशशास्त्री जोशी, श्री. रा. ता. फडणीस, व डॉ. भीमराव कुलकर्णी यांची या प्रसंगी भाषणे झाली.

दि. ११ जानेवारी १९७५ रोजी किर्लोस्कर स्त्री, मनोहर, मासिकांचे संस्थापक व संपादक कै. शं. वा. किर्लोस्कर यांच्या दुःखद निधनाबद्दल डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या अध्यक्षतेखाली सभा होऊन श्री. रा. ग. जाधव, श्री. श्री. ज. जोशी व श्रीमती आनंदीबाई शिर्के व वा. कृ. गल्गली यांनी कै. शंकररावजींना श्रद्धांजली अर्पण केली.

दि. १५ जानेवारी १९७५ रोजी दुर्मिळ ग्रंथांचे संग्राहक व संशोधकांना तत्परतेने ग्रंथसाहाय्य उपलब्ध करून देणारे कै. पां. रा. तथा तात्यासाहेब ढमढेरे यांना श्री. स. मा. गर्गे यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. या प्रसंगी श्री. म. म. केळकर, श्री. व. वि. वेलसरे, प्रा. द. दि. पुंडे, श्री. प्रभाकर कुलकर्णी व डॉ. भीमराव कुलकर्णी यांची भाषणे झाली.

## सत्कार :

परिषदेचे एक विश्वस्त व अनेक वर्षे परिषदेशी संबंधित असलेले श्री. वि. द. घाटे यांचा, त्यांच्या वयाला ८० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल दि. १८ जानेवारी १९७५ रोजी परिषदेतर्फे प्रकट सत्कार समारंभ आयोजित करण्यात आला होता. महाराष्ट्रकवि यशवंत या प्रसंगी अध्यक्ष होते. सौ. पद्मा गोळे, सौ. संजीवनी मराठे श्री. मो. ज्ञा. शहाणे, डॉ. भीमराव कुलकर्णी व डॉ. अनुराधा पोतदार यांची या प्रसंगी भाषणे झाली. श्री. विठ्ठलराव घाटे यांनी आपले भावपूर्ण मनोगत डॉ. अनुराधा पोतदार यांच्याकरवी व्यक्त केले.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी पंचाहत्तराव्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल त्यांच्या अमृतमहोत्सवाचा सोहळा दि. १५-२-७५ रोजी वाई येथे मोठ्या थाटात साजरा झाला. याप्रसंगी परिषदेतर्फे डॉ. भालचंद्र फडके यांनी भाग घेऊन पुष्पहार अर्पण करून त्यांचे अभीष्टचिंतन केले.

## श्री. चक्रधर प्रयाण सप्तशताब्दी

महानुभाव संत श्री. चक्रधरस्वामी यांच्या प्रयाण शताब्दीनिमित्त दि. १ मार्च ७५ रोजी डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे ' श्री. चक्रधरस्वामी ' या विषयावर अभ्यासपूर्ण भाषण झाले.

## म. सा. परिषद् शाखा कोल्हापूर अहवाल

या शाखेने दरवर्षीप्रमाणे सभासद वाढीची मोहीम हाती घेतली असून ती यशस्वी होत आहे.

राजर्षी शाहू जन्मशताब्दीनिमित्त शाखेने दि. १८ डिसें ७४ ते ३० डिसें. ७४ अखेर नामवंत वक्त्यांची राजर्षींच्या जीवनकार्यावर व्याख्यानमाला आयोजित केली. व्याख्यानमालेचे उदघाटन शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरू बॅ. पी. जी. पाटील यांच्या व्याख्यानाने झाली. बॅ. पाटील ' राजर्षी शाहू : एक द्रष्टा राजा ' या विषयावर बोलले. अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध विचारवंत भाई माधवराव बागल होते. महाराष्ट्राचे अॅड जनरल श्री रामराव आदिक यांच्या व्याख्यानाने मालेचा समारोप झाला ' राजर्षी शाहूंचे क्रांतिकारकत्व ' या विषयावर श्री. आदिक यांनी या प्रसंगी विचार व्यक्त केले.

या व्याख्यानमालेत पुढीलप्रमाणे व्याख्याने झाली.

( १ ) अनिरुद्ध कुलकर्णी : बहुजन समाजाच्या चळवळी आणि शिस्त.

( २ ) रा. ना. चव्हाण : महर्षी शिंदे; काळ, विचार, आणि कार्य.
अध्यक्ष-प्रा. म. द. देशपांडे.

( ३ ) माधव गडकरी : राजर्षी शाहूंच्या कार्यांचे महत्त्व.
अध्यक्ष कुलगुरू डॉ. पवार.

अनुक्रमणिका

( ४ ) प्रा. अशोक कामत : राजर्षी शाहूंनी आम्हाला काय दिले ?
अध्यक्ष ॲड. बाबा कदम.

( ५ ) डॉ. निर्मलकुमार फडकुले : राजर्षी शाहूंच्या चळवळी, प्रेरणा व कार्य.
अध्यक्ष–आम. पी. बी. साळुंके.

( ६ ) प्रा. म. द. नलावडे : राजर्षी शाहू व हरिजनोद्धार.
अध्यक्ष–प्रा. म. द. देशपांडे.

( ७ ) प्राचार्य गोपाळराव मयेकर : महाराष्ट्रातील सुधारकांचे वैचारिक अधिष्ठान, कार्य व फलश्रुती. अध्यक्ष–डॉ. एस्. एस्. भोसले.

( ८ ) सौ. सुशिलाबाई पाटील : राजर्षी शाहूंचे वेगळेपण.
अध्यक्ष–के. जी. सूर्यवंशी.

( ९ ) प्रा. सौ. मीना कुलकर्णी : राजर्षी शाहूंचे आर्थिक धोरण.
अध्यक्ष–प्रा. चंद्रकुमार नलगे

(१०) श्री. के. जी. सूर्यवंशी : राजर्षी शाहूंची दृष्टी.
अध्यक्ष–बाळासाहेब माने.

सदरची व्याख्यानमाला कोल्हापूर जिल्हा परिषदेच्या सहकार्याने झाली. राजर्षी शाहू–महर्षी शिंदे व्याख्यानमालेसाठी कोरेगावकर ट्रस्टने शाखेला रु. ५००१-ची देणगी दिली आहे. त्याबद्दल शाखा, या सुहृदांची मनःपूर्वक आभारी आहे.

शाखा नवनवे उपक्रम हाती घेऊन यशस्वीपणे पार पाडीत आहे.

**सं. सा. भोसले**, अध्यक्ष

**वाङ्मय चर्चा मंडळ–बेळगाव** : दि. ८ मार्च ७५ रोजी सौ. इंदिरा संत यांचे अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले–श्री. प्रा. कृ. ब. निकुंब यांनी या कविसंमेलनाचे संचलन केले. सौ. इंदिरा संत, प्रा. कृ. ब. निकुंब, प्रा. अरुण शहा, प्रा. काकिरडे, प्रा. अरविंद याळगी, श्री. संतराम पाटील, प्रा. मधुसूदन गोखले व प्रा. मधुसूदन फडके, श्री. वसंत राजस, श्री. किल्लेदार बंधू, सौ. शालिनीबाई सोमण, श्री. वि. गो. साठे, श्री. गोपाळराव दळवी. या कवींनी कविसंमेलनात भाग घेतला.

मंडळाचे प्रमुख प्रा. भी. य. संभाजी यांनी प्रास्ताविक निवेदन केले व भाषा–शाखा चिटणीस, प्रा. विजया धोपेश्वरकर यांनी आभार मानले.

# वैदग्ध्य, वास्तववाद आणि वीरगाथा

संपादक 'साहित्य पत्रिका' यांस स. न. वि. वि.

पत्रिकेच्या मागील अंकात सेवानिवृत्त एंजिनियर घाटे यांच्या शिवाजीभारताचे परीक्षण आले आहे. अर्थात ते पूर्ण काव्याचे नव्हे, तर काव्यांशाचे परीक्षण आहे. त्यात प्रो. रा. श्री. जोग यांनी जो एक दोष दाखवला आहे, त्याच्यापुरतेच या पत्रात लिहावयाचे आहे. घाटे यांच्या काव्यासंबंधी मी सुमारे सात-आठ वर्षांपूर्वीच 'केसरी'-तील माझ्या स्तंभात लिहिले आहे. प्रो. जोग यांचे म्हणणे, "या काव्याची भाषा सर्वत्र संस्कृतप्रचुर आणि एकाच व्यक्तीची असल्यासारखे वाटते...सर्वच, कवीच्या भाषेत बोलतात असे वाटते." याच काव्यविभागाचे प्रस्तावनाकार डॉ. वि. रा. करंदीकर हेही या काव्यातील भाषेवर हाच आक्षेप घेतात. "...हे सारेच उपमालंकारात बोलतात व संस्कृत वळणाची मराठी भाषा वापरतात, हे खटकते. त्या-त्या व्यक्तीच्या भाषेत काही निराळेपणा हवा होता."

महाकाव्यातील पात्रांनी आधुनिक कादंबऱ्यांतील पात्रांप्रमाणे देशकालव्यवसायानुसार वास्तववादी आणि नाटकी संवाद करावेत काय, हा प्रश्न यामुळे उपस्थित होतो. आजचा जमाना वास्तववादाचा आहे. त्यामुळे साहित्यातील अन्य मूल्ये आणि अन्य चित्रणप्रकार यांच्या औचित्याकडे चांगल्याचांगल्यांचेही दुर्लक्ष होते. तांत्रिक साहित्यविषयक विचारात अधिक न शिरता मुद्द्याला हात घालायचा म्हटल्यास, रामायण आणि महाभारत यांसारख्या महाकाव्यांतील संवादात पात्रानुसारी आणि 'कलोक्विअल' भाषा योजलेली आढळते काय ? नाटकांची गोष्ट वेगळी आहे. संस्कृत नाटकात प्रतिष्ठित पुरुष-पात्रे संस्कृतात बोलतात, तर स्त्रिया प्राकृतात बोलताना आढळतात. परंतु महाकाव्यात सर्व पात्रे एकाच तोलाची प्रौढ संस्कृत भाषा वापरतात.

"व्रजन्ति ते मूढधियः पराभवं भवन्ति मायाविषये न मायिनः।"

हे 'किरातार्जुनिया'तील उद्गार केवळ त्यातील शैलीवरूनच ओळखायचे झाले, तर द्रौपदीचे आहेत की युधिष्ठिराचे आहेत, की एखाद्या दासीचे आहेत, हे ओळखणे अशक्य आहे ! ही गोष्ट झाली अभिजात पंचमहाकाव्यांची. रामायणमहाभारतातील संवादांची हकीकत तीच आहे. जटायूसारख्या पक्ष्याचे भाषण, वालिसुग्रीवासारख्या वानरवीरांची भाषणे, कांचनमृगाच्या प्रसंगात सीतेने आपल्या दिराशी केलेले आक्रस्ताळे-पणाचे भाषण, अथवा रामलक्ष्मणांची भाषणे, या सर्वांचीच शैली प्रौढ आणि उदात्त असल्याचे आढळेल. याचे कारण प्राचीनांना वास्तववादी संवाद साधत नव्हता असे नव्हे, तर 'Epic'मध्ये किंवा वीरगाथेत नाटकीपणाला आणि सलगीच्या संवादाला स्थान नसते, हे आहे. वीरगाथांची पातळीच वेगळी असते व त्यात नाटकी वास्तव-वादाला जागा नसते, हे आधुनिक साहित्यिकांनी ओळखलेले नाही.

माधवराव पटवर्धन यांनी Epic किंवा वीरकाव्य लिहिले नसले, तरी संस्कृत थाटाचे 'विरहतरंग' हे विदग्ध काव्य लिहिले आहे. पण त्यातही सार्वकालीन महत्त्वाचे वैदग्ध

अनुक्रमणिका

आणि समकालीनत्वाचे आकर्षण असलेला वास्तववाद, यांची भेसळ केल्याने अनेक जागी रसभंग झाला आहे.

**" वेडे काय तरी तरुण अगदी काही तरी बोलती ! "**

हीं ओळ काय, किंवा.

**" घेते मीच कशी ! परी कप दिला टेवून मेजावर,**
**' काढा घ्या तुमचा तुम्हीच !' दिधले दाटून मी उत्तर. "**

यासारख्या ओळी वैदग्ध्यापेक्षा विडंबनात शोभणाऱ्या आहेत. पण चालू जमान्यातली गुदगुल्या करणारी दृश्ये अशा ओळींत दिसतात, म्हणून कित्येक संस्कृत पंडितही ( वैदग्ध्याचा विचार विसरून ) त्यांना माना डोलावतात !

' एपिक् 'मध्ये वेगवेगळ्या पात्रांच्या स्वभावाचा विचार करायचा असला, तरी त्यांची उंची वीरगाथेला शोभेशीच ठेवायची असते.

"The epic scale of being transcends at every point that of ordinary life," म्हणजे वीरगाथेतील बरीवाईट सर्वच पात्रे ' महाकाव्याच्या मापाची ',— Epic scale ची रंगवावी लागतात. वास्तवता नव्हे, तर दूरस्थता Remoteness ही वीरगाथेतील चित्रांची सार्वत्रिक पार्श्वभूमी असावी लागते.

" With this remoteness goes a freedom in the treatment of the epic stuff..."

आपला

**श्री. के. क्षी.**

---

# महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका

माहितीपत्रक तक्ता—४ नियम ८

**प्रसिद्धिस्थान :** महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०. **प्रसिद्धि-प्रकार :** त्रैमासिक. **मुद्रणस्थळ :** चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ३०. **मुद्रक-प्रकाशक :** राम जयवंत देशमुख, **राष्ट्रीयत्व :** भारतीय. **पत्ता :** महाराष्ट्र-साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ३०. **संपादक :** भालचंद्र दिनकर फडके. **राष्ट्रीयत्व :** भारतीय. **पत्ता :** पुणे विद्यापीठ क्वार्टर्स, पुणे ७. **मालकी :** महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०.

मी राम जयवंत देशमुख असे जाहीर करतो की, मी वर दिलेली माहिती बरोबर व खरी आहे.

१५ मार्च १९७५

**रा. ज. देशमुख**
कार्यवाह,
महाराष्ट्र-साहित्य परिषद

आणि समकालीनत्वाचे आकर्षण असलेला वास्तववाद, यांची भेसळ केल्याने अनेक जागी रसभंग झाला आहे.

**" वेडे काय तरी तरुण अगदी काही तरी बोलती ! "**

हीं ओळ काय, किंवा.

**" घेते मीच कशी ! परी कप दिला ठेवून मेजावर,**
**' काढा घ्या तुमचा तुम्हीच !' दिधले दाटून मी उत्तर. "**

यासारख्या ओळी वैदग्ध्यापेक्षा विडंबनात शोभणाऱ्या आहेत. पण चालू जमान्यातली गुदगुल्या करणारी दृश्ये अशा ओळींत दिसतात, म्हणून कित्येक संस्कृत पंडितही ( वैदग्ध्याचा विचार विसरून ) त्यांना माना डोलावतात !

' एपिक् 'मध्ये वेगवेगळ्या पात्रांच्या स्वभावाचा विचार करायचा असला, तरी त्यांची उंची वीरगाथेला शोभेशीच ठेवायची असते.

" The epic scale of being transcends at every point that of ordinary life, " म्हणजे वीरगाथेतील बरीवाईट सर्वच पात्रे ' महाकाव्याच्या मापाची ',— Epic scale ची रंगवावी लागतात. वास्तवता नव्हे, तर दूरस्थता Remoteness ही वीरगाथेतील चित्रांची सार्वत्रिक पार्श्वभूमी असावी लागते.

" With this remoteness goes a freedom in the treatment of the epic stuff..."

आपला
**श्री. के. क्षी.**

---

## महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका

माहितीपत्रक तक्ता—४ नियम ८

**प्रसिद्धिस्थान** : महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०. **प्रसिद्धि-प्रकार** : त्रैमासिक. **मुद्रणस्थळ** : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ३०. **मुद्रक-प्रकाशक** : राम जयवंत देशमुख, **राष्ट्रीयत्व** : भारतीय. **पत्ता** : महाराष्ट्र-साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ३०. **संपादक** : भालचंद्र दिनकर फडके. **राष्ट्रीयत्व** : भारतीय. **पत्ता** : पुणे विद्यापीठ क्वार्टर्स, पुणे ७. **मालकी** : महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०.

मी राम जयवंत देशमुख असे जाहीर करतो की, मी वर दिलेली माहिती बरोबर व खरी आहे.

१५ मार्च १९७५

**रा. ज. देशमुख**
कार्यवाह,
महाराष्ट्र-साहित्य परिषद



तुम्ही हे
करायलाच हवं








शिवरायाचे स्वराज्य झाले धन्य जाहली धरा
तीच प्रेरणा आज वाहते नव्या युगाची धुरा

माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई.